# भरत खंडाचा प्राचीन इतिहास.




( ख्रि. पू. ६०० ते इ० स० १२०० )

लेखक व प्रकाशक.

**मनोहर विष्णु काथवटे बी. ए. एल् एल् बी.**

पेन्शनर फर्स्टक्लास सब जज्ज.

११३ प्रतापगंज सातारा.

---

मुद्रक:—केशव रावजी गोंधळेकर ‘ जगद्धितेच्छु ’ प्रेस,

शनवार, ४३२ पुणें.

---



---

सन १९१७.

किंमत १—८

ई/१२४



इ. स. ६०३ च्या सुमारास गुजराथेंतील एका राजानें आपल्या मुलाबरोबर शेतकरी, कारागीर, लढाऊ लोक, वैद्य, कारकून वगैरे पांच हजार लोक देऊन जावा बेटांत पाठविलें. जावा बेटांतील बोरोबुदर ठिकाणच्या चित्राचा हा उतारा आहे. ( हें चित्र प्रो. राधाकुमुद मूकरजी यांचे ' इंडिअन शिपिंग ' या पुस्तकावरून घेतलें आहे. )

# शुद्धिपत्र.



| पृ० | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ९ | आलिकडे युरोपखंडांतील | आलिकडे मुसलमान लोक व युरोपखंडांतील |
| ५ | ९ | दास्यूंचा | दस्यूंचा |
| ५ | १६ | असत, | असत. |
| ६ | ४ | इ.स.पू.२०००ते१४०० | (इ. स. पू. २००० १४००) |
| ७ | ३ | पांडव | पांड्य |
| ९ | १० | कारणावरूच | कारणावरूनच |
| १२ | ८ | ह्यूएनत्सांग | ह्यूएनत्संग |
| १६ | १४ | कौसलचें | कोसलचें |
| १६ | १५ | झालें, | झालें. |
| १६ | १९ | हीं नांवें याच शहरांचीं होतीं | ही शहराचें नांव होतें. |
| १६ टीप १ | | | पृष्ठ ८४ पहा. |
| २१ शेवटची ओळ | | रांनीं | स्वारांनीं |
| २३ | १४ | राहिली नाहीं | राहिली नाहीं" |
| २४ | ५ | चालविली | विली |
| २७ | ६ | सल्युकसच्या | सेल्युकसच्या |
| ३० खालून | १० | देत असे | होत असे |
| ,, खालून | ५ | मेगॉस्थिनीलाज | मेगॉस्थिनींजला |
| ३१ | ४ | पश्चिम पश्चिम | पश्चिम |
| ३१ खालून | २ | चाणक्याकृत | चाणक्यकृत |
| ३८ खालून | ९ | सांभाव | स्तंभाव |
| ३९ | १४ | ललिपतन | ललितपाटण |
| ४२ | ८ | हर्षकुमाल | हर्ष, कुमार |
| ४२ खालून | ३ | औषधालयें | औषधालयें आणि |

| पृ. | | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|---|
| ,, | शेवटची | | हिंदुस्थान | हिंदुस्थान, |
| ४३ | | ३ | तिबेटांतील | तिबेटांतील अगर हिंदुकुश पर्वतांतील |
| ,, | खालून | ६ | झाला, | झाला. |
| ४५ | खालून | १० | मध्यमिका चितोड शहरानजिकचें नागरीं शहर | ( चितोड शहरानाजिकचें हल्लींचें नागरी शहर) |
| ,, | खालून | ४ | हिंदुस्थावर | हिंदुस्थानावर |
| ४७ | खालून | १० | त्यांची | त्याची |
| ,, | टीप १ | | भाग १२ | भाग १४ |
| ४८ | खालून | ४ | ऐकम | ऐकू |
| ५० | खालून | ८ | आंटि ओसकनें | आंटिओकसनें |
| ५३ | | ४ | डॉ० फ्लिट | डॉ. फ्लीठ |
| ५४ | | १२ | यांचें | याचें |
| ६० | खालून | ५ | कुाशन | कुशान |
| ७० | खालून | १० | खंडाचा | खंडाच्या |
| ७६ | खालून | १० | निवण्या | निवडण्या |
| ८४ | खालून | ८ | होती, | होती. |
| ८५ | | १ | सम्यक्दृष्टि | सम्यक्दृष्टि, |
| ८७ | खालून | ६ | नव्हते | नव्हती. |
| ८८ | | ३ | बंड मोडून व तें वर्चस्व टाकावयाचे | बंड मोडून टाकावयाचें |
| ८९ | | ४ | इ०स॰० | इ०स० |
| ,, | खालून | ११ | येतो. | येतो[1]. |
| ९४ | खालून | ६ | बसलों. | बसला. |
| ९५ | | १३ | कोरियापर्यंतचा | कोरियापर्यंत |
| ,, | | १६ | घेतला | घेतला. |
| ,, | | २० | त्यांत | त्यानें |
| ९६ | टीप | २ | | १ |
| ,, | ,, | | account | Account |

| पृ. | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|
| १०४ | १ | हात | होतें. |
| १०९ खालून | २ | म्हणतात | म्हटलें आहे |
| ११० खालून | ५ | लिहीलें आहे | टीप हें काव्य वाक्पति कवीचें आहे |
| १११ खालून | ११ | बांधिल्या | बांधल्या. |
| ११३ | ४ | मरण्याची | मारण्याची |
| ११९ खालून | ८ | ११९३ | ११९७ |
| १२० खालून | ३ | शेवट झाला | शेवट झाला ११९९. |
| १२८ | १२ | बसलों.[१] | बसलों.[२] |
| १३० | १० | राष्ट्र कुटांचे | राष्ट्र कूटांचे |
| ,, | ११ | पाहला | पहिला |
| १३२ | ५ | भिराहि | मिाहर |
| १३३ | ६ | आले. | आले, |
| ,, खालून | १३ | केली | केली. |
| १३६ | ६ | घेतलें | घेतलें. |
| १४३ | ४ | साळंकी | सोळंकी |
| ,, | ७ | गुहा | गुहा ) |
| ,, खालून | ३ | सिंघ० | सिंहण |
| १४६ | १ | त्याचें | त्याचे |
| १४८ खालून | ५ | जिनरोन | जिनसेन |
| १५४ खालून | १० | कोकइ | कोर्कई |
| १५८ खालून | ५ | गादविर | गादीविषयीं |
| १६२ | ४ | राजराजानंतर | राजेंद्रानंतर |
| ,, | ९ | केला | केला. |
| १६३ | ६ | राजाचा | राजा |

१६३ वरील शेवटल्या चार ओळी व १६४ वरील पहिल्या दोन ओळी गाळावयाच्या.

| पृ. | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|
| १६६ | १० | पातंजलीचा | पतंजलीचा |
| १६६ खालून | ३ | सौदत्ति | सादत्ति |

| पृ. | | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|---|
| १६८ | टीप | १ | Ekrly | Early |
| १७१ | खालून | ८ | अमीर | अभीर |
| १७६ | | ५ | दुसरा इंद्र | ५ दुसरा इंद्र<br>\|<br>६ दंति दुर्ग |
| | | ६ | दंतिदुर्ग | |
| | | १३ | नित्यवंर्म | १३ नित्यवर्ष |
| १८१ | खालून | ६ | अभिलाषितार्थचितामणि | अभिलषितार्थ-<br>चिंतामणि |
| १८२ | | ८ | अनतापासून | अनीतीपासून |

१८७ ओळ ५ यांत पराभव झाला यापुढें जास्त मजकूर घालावयाचा तो:—‘ व त्याला दक्षिणेंतील राज्य मिळविण्याचा नाद सोडून द्यावा लागला. देवगिरी नगर या **भिल्लमाने** इ. स. ११०९ वर्षीं स्थापन केलें होतें. ’

| पृ. | | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|---|
| १९२ | | ९ | त्यांचे | या तिसऱ्या शाखेच्या |
| १९३ | खालून | १० | बलवडें | वलवडें |
| | खालून | ५ | त्याचा | आपला |
| १९५ | | ३ | लिपुत्तसन्निध | लिपुत्रासन्निध |
| ,, | | | हिंदुस्थनाा | हिंदुस्थाना |
| | | ८ | चंद्रगुप्ता | चंद्रगुप्त |
| २०० | | ४ | इ. स. पूर्वीं०२ | इ. स. पूर्वीं ६०२ |
| २०४ | | ६ | मैर्या | मौर्य |



# प्रस्तावना.

—:o:—

सातारा येथील सन १९१४ सालचे 'विविध व्याख्यानमालेंत' प्राचीन हिंदुस्थानासंबंधानें थोडीशी माहिती मी सांगितली ती कांहीं विद्वान् मित्र मंडळीस पटली व ती माहिती ज्यास्त विस्तृत रीतीनें लिहिल्यास उपयोगी होईल असा त्यांचा अभिप्राय पडला. इंग्रजी भाषेंत या विषयावर पुष्कळ ग्रंथ आहेत परंतु मराठींत फार थोडे आहेत. म्हणून इंग्रजी ग्रंथांच्या आधारें मराठी भाषेंत तशा प्रकारची माहिती देण्याचा हा यत्न आहे. या पुस्तकांत स्वतः माझ्या शोधाचा लवलेशही नाहीं. भाषेचे वगैरे दोष एवढेंच काय तें माझें स्वतःचें आहेत.

हा लेख मुख्यत्वेंकरून मि. विन्सेंट स्मिथ या प्रसिद्ध ग्रंथकाराच्या पुस्तकाच्या आधारानें लिहिला आहे. तथापि मि. ऱ्याप्सन, मि. ऱ्हिस डेविड्स, डा. सर रामकृष्ण भांडारकर, प्रो. मूकरजी, मि. आयंगार वगैरे ग्रंथकारांच्या ग्रंथांची प्रसंगानुसार मदत घेतली आहे.

मूळ आधार पाहून स्वतंत्र इतिहास लिहिण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें, व इंग्रजी ग्रंथांचें भाषांतर केलें असतां विस्तार फार होतो म्हणून त्यापैकीं कोणताच यत्न केलेला नाहीं. मराठींत सांप्रत या विषयावर फारच थोडे ग्रंथ आहेत म्हणूनच हा लेख लिहिण्यांत येत आहे. यांतील कमीपणा दृष्टीस येऊन तरी कोणी चांगला ग्रंथ लिहिल्यास या लेखाचा इष्ट हेतु सिद्धीस गेला असें मी मानीन.

हा लेख छापण्यापूर्वीं माझ्या कांहीं विद्वान् मित्रांनीं तो वाचून पहाण्याची कृपा केली. त्यांचे माझ्यावर उपकार आहेतच. परंतु त्यांतल्या त्यांत विशेषेंकरून रावबहादुर काशिनाथ नारायण साने यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून विशेष काळजीपूर्वक वाचून बरेच दोष काढून टाकले याबद्दल त्यांचे उपकार मानावेत तेवढे थोडेच आहेत. मूळ इंग्रजी व मराठी ग्रंथकर्त्यांचे तर अर्थात् फारच उपकार आहेत हें सांगावयास नको. योग्य ठिकाणीं त्यांचा नामनिर्देश केला आहे.

जगद्धितेच्छु छापखान्याच्या चालकांना इतर महत्त्वाचीं कामें नसतीं तर हें पुस्तक मागेंच प्रसिद्ध करतां आलें असतें कारण तें बहुतेक तयार होऊन एक वर्षावर दिवस होऊन गेले आहेत. त्यांनीं आपल्या वहिवाटीप्रमाणें काम चांगलें केलें आहे हें वाचकांच्या दृष्टीस येईलच.

रा. सहस्रबुद्धे यांना अपरिहार्य अडचणीमुळें नकाशे व चित्रें तयार करण्यास वेळ लागला तथापि त्यांनीं काम मनापासून केलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

पुस्तकाचे छपाईंत बऱ्याच चुका राहिल्या आहेत. त्या छापखानेवाल्यांच्या निष्काळजीपणामुळें झाल्या म्हणण्यापेक्षां प्रुफें तपासण्यांत जितकी काळजी घ्यावयास पाहिजे होती तितकी न घेतल्यामुळें झाल्या हें म्हणणें बरें. त्यामुळें शुद्धिपत्र फार विस्तृत झालें आहे. वाचकांनीं ग्रंथ वाचण्यास आरंभ करण्यापूर्वीं शुद्धिपत्राप्रमाणें दुरुस्ती करावी अशी त्यांस सविनय विनंती करणें भाग आहे.

**मनोहर विष्णु काथवटे.**



# पुरवणी टिपा.

——:o:——

१ हूण लोक—डॉक्टर जीवनजी मोदी यांनीं या लोकांची माहिती दिली आहे ती अशीः—

हे लोक चीन देशाच्या उत्तरेस आमूर व इरलिश नद्यांचे दरम्यान प्रथम रहात होते. पुढें त्यांनीं तारतरी प्रांत जिंकला. तेथें खि० पु० २०० वर्षे त्यांनीं राज्य केलें. ख्रिस्ती शकाचे कांहीं पूर्वी व नंतर त्यांचा जगांतील सर्व मोठमोठ्या साम्राज्यांशीं संबंध आला. रोमचें राज्य त्यांनीं नाहींसें केलें. चिनी लोकांनीं त्यांना प्रतिबंध करण्याकरतां प्रसिद्ध चिनी भिंत बांधली. तेव्हां ते पश्चिमेकडे वळले. त्यांच्याच चेपीमुळें स्याक्सन लोक इंग्लंड देशांत गेले. त्यांचा इतिहास दोन हजार वर्षांचा आहे. तेवढ्या काळांत त्यांनीं इराणांत स्वाऱ्या केल्या व हिंदुस्थानांतील गुप्त साम्राज्य मोडलें. त्यांचा शेवटचा राजा मिहिरगुल नांवाचा होता.

आपले मृतराजे पुरण्याची त्यांची विलक्षण रीत होती. ते कोठें पुरले आहेत हें कळूं नये म्हणून कधीं कधीं ते मोठमोठ्या नद्यांचे प्रवाह फिरवीत व त्या ठिकाणीं त्यांना पुरून पुन्हां त्यावर नद्या सोडीत. ज्या लोकांकडून हें काम ते करून घेत त्यांना ते ठार मारीत.

फ्रान्स, इटली, जर्मनी व युरोपांतील इतर उत्तरेकडील देश त्यांनीं ओसाड केले. खलिफांचें राज्य घेऊन ख्रिस्तांची पवित्र भूमि, पालिस्टाइन, आपले ताब्यांत घेतली.

याच लोकांना पुढें तुर्क हें नांव प्राप्त झालें.

( मुंबई क्रानिकल—१९१६ आगष्ट ३०. )

२—आर्य लोकांविषयीं काश्मीरचे प्रोफेसर जगदीश छतर्जी यांची अगदीं नवी कल्पनाः—

( १ ) हिंदुस्थानांत येण्यापूर्वी आर्य लोक व ब्याबिलोन, ईजिप्त, ईजियन, हिब्रू या लोकांचे पूर्वज एका ठिकाणीं रहात होते. तेथेंच चीन लोकांचे पूर्वजही राहत असत. तें ठिकाण म्हणजे पॉंटस व आर्मिनिआ प्रांताजवळ होतें.

( २ ) वेदांतील व इतर प्राचीन संस्कृत ग्रंथांतील नांवें वास्तविक यापूर्वींच्या प्रांतांतील स्थळांचीं आहेत.

( ३ ) भरतखंडांत आर्य लोक वेदानंतर फार काळानंतर आले इतकेंच नव्हे, तर महाभारत युद्धानंतर आले. रामायणांतील व महाभारतांतील गोष्टी हिंदुस्थानच्या बाहेर आर्यांच्या पूर्व ठिकाणीं घडल्या. हस्तिनापूर, इंद्रप्रस्थ, अयोध्या वगैरे स्थळें हिंदुस्थानांतील नव्हेत; आर्यांच्या पूर्वींच्या वसति—स्थानांतील आहेत. महाभारतांतील गोष्टी व स्थळें जावा व वाली बेटांत आहेत हें जसें त्या बेटांतील लोकांचें म्हणणें आहे त्या प्रकारचेंच म्हणणें हिंदुस्थानांतील लोकांचें आहे. परंतु तें खरें नाहीं.

( ४ ) आर्य लोक हिंदुस्थानांत बुद्धाच्या काळापूर्वीं फार दिवस आले नाहींत व म्हणूनच बुद्धाच्या पूर्वींच्या फारशा प्राचीन खुणा हिंदुस्थानांत सांपडत नाहींत.

( ५ ) कुरु व हियइट लोक एकच आहेत, व त्यांचें मूळ वसतिस्थान पाँटसजवळ होतें.

( टाइम्स ऑफ इंडिया, ११ एप्रिल सन १९१६. )

३ डाक्तर स्पूनरची हिंदुस्थानांत इराणचें राज्य असल्याबद्दलची विलक्षण कल्पना:—

सर दोराब टाटा या धनाढ्य पारशी गृहस्थाच्या मदतीनें डॉक्टर स्पूनर नांवाच्या विद्वान् प्राचीनवस्तुसंशोधकानें पाटणा ( पाटलीपुत्र ) येथें कांहीं खणण्याचे कामास आरंभ केला व त्यांना जमिनींत जें कांहीं दिसून आलें त्यावरून त्यांनीं असा तर्क काढला कीं, तेथें पूर्वीं एक मोठा राजवाडा होता, तो इराणांतील दरायसच्या राजवाड्यासारखा होता; यावरून पाटलीपुत्राचा राजा चंद्रगुप्त हा हिंदू नसून पारशी होता; चाणक्यही पारशी होता; अर्थात् अशोकही पारशीच झाला. मौर्य हा मर्व शब्दाचा अपभ्रंश आहे; मयासूर म्हणजे आहूरमझ्द. परंतु या निवळ कल्पना आहेत. याला आधार म्हणून मुळींच नाहीं हें प्रोफेसर जयस्वाल यांनीं स्पष्टपणें सिद्ध करून दाखविलें आहे.

४ डॉक्टर मोल्टन यांचें म्हणणें आर्य लोकांची मूळ वस्ती डान्यूब नदीच्या उत्तरेस होती.

# अनुक्रमणिका.

—:०:—

भाग १२

उत्तर हिंदुस्थानांतील लहान लहान राज्यें.



भाग १३



भाग १४

# नकाशे

१ प्राचीन संस्कृत वाङ्मयाचें काळाचे भरतखंड.
२ आशोकाचें साम्राज्य.
३ हर्षाचें साम्राज्य.
४ गुप्त साम्राज्य.

# चित्रें

१ प्राचीन राजविलासाची नौका.
२ इ. स. ६०३ चे सुमारास जावा बेटांत रवाना झालेली नौका.
३ प्राचीन नाणीं.
४ नागपुरुष.
५ नागकन्या.
६ बुद्ध देव.
७ बुद्ध नागलोकांस उपदेश करीत आहे.
८ पुलकेशी राजाचे दरबारांत इराणचे राजाचे वकिलांची भेट.



# हिंदुस्तानांतील प्राचीन नाण्यांचे कांहीं नमुने.

हे हिंदुस्थानांतील प्राचीन नाण्यांचे नमुने मि. विन्सेंट स्मिथ यांचे इतिहासावरून घेतले आहेत. एकंदर सतरा नमुने आहेत. त्यांपैकीं सहा नमुने ग्रीक व सिथियन राजांचे आहेत. त्या राजांचा अम्मल ब्याक्ट्रिया प्रांत व हिंदुस्थानचा कांहीं भाग यांत होता. ते नमुने एक ते सहापावेतों आहेत. त्या राजांचीं नावें अनुक्रमें येणें-प्रमाणें आहेतः—( १ ) सोफायर्टाज; ( २ ) युक्रटैडीज; (३) मे-न्यांडर; ( ४ ) हरमाइओस; ( ५ ) पहिला कद्फिसीज, ( ६ ) गोंडोफरीज. यांपैकीं ( १ ) च्या नमुन्याचे व ( २ ) च्या नमुन्याचे मागील व पुढील असे दोन भाग आहेत. ( ३, ४, ५, ६, ) च्या नमुन्यांचे एकेकच भाग आहेत. यांवरील लेख ग्रीक भाषेंत आहेत. संख्याक सातचा नमुना आंध्रवशांतील सिवलकुर नांवचे राजाचे नाण्याचा आहे. त्यावर " राणो माधरी-पुतस शिवलकुरस " अशीं अक्षरें आहेत. ( ८ ) व्या नमुन्याचे दोन भाग आहेत. तें नाणें दुसरा कद्फिसीज या राजाचें आहे. त्याची लिपी खरोष्ठी आहे. एका बाजूस शिव व नंदी यांचीं चित्रें आहेत. दुसरे बाजूस राजाचें चित्र आहे व त्याचे भोंवतालचा लेख ग्रीक भाषेंत आहे. ( ९ ) व्या नमुन्याचे दोन भाग आहेत. तें नाणें कनिष्क राजाचें आहे. एका बाजूस देवीचें चित्र आहे व दुसरे बाजूस भाला व तरवार हातांत धरलेल्या राजाचें आहे. त्याचा पोषाख तुर्की आहे. त्यावरील लेखाची भाषा ग्रीक आहे, ( १० ) चा नमुना समुद्रगुप्ताचे नाण्याचा आहे. राजा आराम खुर्चीवर बसलेला असून हातांत विणा असल्याचें दाखविलें आहे. " महाराजाधिराज

श्री समुद्रगुप्त " अशीं अक्षरें लिहिलेलीं आहेत. ( ११ ) नमुन्याचें नाणें समुद्रगुप्ताचेंच आहे. त्यावर अश्वमेधाचे प्रसंगीं होमकुंडासमोर अश्व उभा राहिलेला दाखविला आहे. ( १२ ) चा नमुना दुसरा चंद्रगुप्त ऊर्फ विक्रमादित्य याच्या नाण्याचा आहे. एका बाजूस सिंहावर आरूढ झालेली देवी दाखविलेलीं आहे, व " श्री सिंह विक्रम " अशीं अक्षरें लिहिलेलीं आहेत. दुसऱ्या बाजूस राजा सिंहाची शिकार करीत असल्याचें दाखविलें आहे. " महाराजाधिराज श्री " अशीं अक्षरें लिहिलेलीं आहेत. ( १३ ) चा नमुना कीर्तिवर्म चंडेल याचे नाण्याचा आहे. एका बाजूस चतुर्भुजा देवीचें चित्र आहे. दुसऱ्या बाजूस " श्रीमत् कीर्तिवर्म देव " अशीं अक्षरें आहेत. ( १४ ) चा नमुना एका पांड्य राजाचे नाण्याचा आहे. एका बाजूस कांहीं अक्षरें आहेत. तीं समजत नाहींत. दुसऱ्या बाजूस एका छत्राखालीं दोन मासे दाखविले आहेत. ( १५ ) चा नमुना राजराज चोल राजाचे नाण्याचा आहे. एका बाजूस एक बसलेली आकृती आहे. " राजराज " अशी अक्षरें लिहिलेलीं आहेत. दुसऱ्या बाजूस राजा उभा राहिला असल्याचे दाखविलें आहे. ( १६ ) चा नमुना एका पल्लव सरदाराचें नाण्याचा आहे. एका बाजूस एक मोठ्या चंबूच्या आकृतीचें भांडें आहे. दुसऱ्या बाजूस सिंहाचें चित्र आहे. ( १७ ) चा नमुना चेर राजाचे नाण्याचा आहे. एका बाजूस छत्री व धनुष्य आहे. दुसऱ्या बाजूस एक बसलेली आकृती आहे.





प्राचीन संस्कृत वाङ्मयातील
हिंदुस्थान
(के. वि. आयंगार यांचे ग्रंथावरून)
मैलांचें प्रमाण
गंधार
मद्र
ब्रह्मावर्त
कुरु
उत्तर पांचाल
दक्षिण पांचाल
वत्स
विदेह
मगध
हिमवत पर्वत
विंध्याद्रि पर्वत
सौराष्ट्र
विदर्भ
कर्नाटक
उत्कल
कलिंग
काशी
प्रयाग

# उपोद्धात.



भूगर्भादि शास्त्रांच्या तज्ञांच्या अर्वाचीन शोधावरून असें समजतें कीं, सहस्त्रावधि वर्षांचे पूर्वीं हिंदुस्थान देशाचा आकार सांप्रत काळीं आहे त्यापेक्षां फार भिन्न होता. हल्लीं हिंदुस्थान, दक्षिण-आफ्रिकाखंड, व आस्ट्रेलिया बेट यांचे दरम्यान महासागर आहे. प्राचीन, काळीं त्या ठिकाणीं पाणी नसून जमीन होती, व आफ्रिकाखंड, हिंदुस्थानदेश, व आस्ट्रेलियाबेट हे सर्व प्रदेश एकमेकांस जोडलेले होते. कालांतरानें मधली जमीन समुद्राखालीं बुडून जाऊन वर सांगितलेले तिन्ही प्रदेश वेगळे झाले, व हिंदुस्थानाला सांप्रतचें द्वीपकल्पाचें रूप आलें. तसेंच हिंदुस्थानच्या वायव्य व ईशान्य सरहद्दींवर हल्लींच्यापेक्षां जाण्यायेण्याचे मार्ग जास्त सोपे होते.

हिंदुस्थानदेशाचे प्राचीन इतिहासाचें महत्त्व विशेष आहे याचें कारण असें आहे, कीं, या देशाचा संबंध फार प्राचीनकाळापासून जगांतील सुधारलेल्या सर्व राष्ट्रांशीं होता. ईजिप्त, ब्याबिलोन, चीन, जावा, ग्रीस, इटली, अरबस्थान वगैरे देशांशीं हिंदुस्थानचा व्यापार होता. त्यामुळें त्या देशांशीं दळणवळण चालू होतें. ही गोष्ट पृथ्वीचे पाठीवरील फारच थोड्या देशांसंबंधानें म्हणतां येईल.

हिंदुस्थानचे मूळ रहिवाशी कोण होते व ते कोठून आले हें अद्याप खात्रीनें सांगतां येत नाहीं. कांहीं शोधकांचें म्हणणें असें आहे कीं, मूळचे रहिवाशी निग्रो ऊर्फ शिद्दी जातीचे असावेत. अद्यापपावेतों कोठें कोठें गारेचीं ओबडधोबड हत्यारें व बिन घडलेले दगडांचीं वर्तुळें हिंदुस्थानचे कांहीं भागांत सांपडतात, तीं या लोकांचे वेळचीं असावींत. या लोकांनंतर 'द्राविड' लोक हिंदुस्थानांत आले. कांहीं लोकांचें म्हणणें ते हिंदुस्थानचे वायव्य

व ईशान्य दिशांच्या मार्गानें परदेशांतून या देशांत आले, तर कांहीं ग्रंथकाराचें म्हणणें ते लोक या देशांतीलच मूळचे रहिवाशी होते. छोटानागपूर प्रांतांतील संतल लोक व मलबारचे पनियन लोक हे मूळच्या द्राविड लोकांपैकीं असावेत. द्रविडी लोकांनंतर चीन देशांतून पिवळट रंगाचे मंगोलियन जातीचे लोक तिबेट मार्गानें व ईशान्येकडील पर्वतांच्या मार्गानें हिंदुस्थानांत आले. त्यांचेनंतर प्रसिद्ध आर्यलोक आले.

आर्य लोकांनंतर ग्रीक, युएची नांवाचे चिनांत राहणारे लोक, शक, पहल्लव व हूण लोक आले व अगदीं आलिकडे युरोपखंडांतील पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज लोक आले.

आर्य लोक आल्यापासून हिंदुस्थान देशाच्या स्थितींत फारच बदल झाला. त्यांच्या शौर्यापुढें व चातुर्यापुढें मूळच्या रहिवाशांचें कांहीं चालेनासें झालें व त्यांपैकीं पुष्कळ जाती डोंगरांत निघून गेल्या. जे लोक राहिले त्यांच्यावर आर्यांचे चालीरीतीचा, धर्माचा, व भाषेचा फारच परिणाम झाला. या आर्य लोकांपासूनच युरोपखंडांतील व मध्य व पश्चिम आशिया खंडांतील मोठमोठालीं राष्ट्रें उत्पन्न झालीं. या आर्य लोकांचें मूळ वसतिस्थान उत्तर ध्रुवाजवळील आर्टिक प्रदेशांत होतें, असें राजश्री बाळ गंगाधर टिळक यांचें मत आहे व तें सिद्ध करण्याकरितां त्यांनीं फार सबळ आधार दाखविले आहेत. अद्यापपावेतों त्यांचें मत सर्व विद्वानांना जरी मान्य झालें नाहीं, तथापि पूर्वींची प्रो. मोक्षमुल्लर वगैरे पौर्वात्य प्राचीन इतिहासज्ञांची जी कल्पना होती कीं, आर्यांचें मूळ वसतिस्थान मध्य आशियांत कास्पिअन समुद्राचे आसपास किंवा काकेशस पर्वतानजीक होतें ती कल्पना निराधार आहे, असें ठरलें आहे. संस्कृत व झेंड भाषेंतील पुष्कळ शब्दांचे ग्रीक, ल्याटिन वगैरे युरोपखंडांतील भाषांतील शब्दांशीं असलेल्या ऐक्यावरूनच



नागपुरुष; पाठीमागचा भाग; नागाची फणा दाखविली आहे.
(प्रो. ऱ्हिस डेव्हिड्स यांचे 'बुधिस्ट इंडिआ' नामक ग्रंथावरून.)

बहुतेक ही कल्पना निघाली होती. परंतु भाषा एक असली म्हणजे जाती एक असलीच पाहिजे असें नाहीं, असें भाषाशास्त्रांतील तज्ञांनीं ठरविलें आहे. आर्य लोक एकत्र होते तेव्हां हिम, हिवाळा, वसंत काळ या अर्थाचे जे शब्द होते ते पौर्वात्य व पाश्चात्त्य भाषांत एक आहेत; परंतु उन्हाळा व हेमंत यांना शब्द नाहींत. यावरून आर्यांचें मूळ वसतिस्थान युरोप खंडाचे उत्तर भागांत होतें हें स्पष्ट होतें. व्याघ्र व सिंह या पशूंना अविभक्त आर्यांचे भाषांत शब्द नाहींत या गोष्टीवरून तीच गोष्ट सिद्ध होते. मूळचे आर्य लोकांजवळ गुरेंढोरें पुष्कळ असल्यामुळें त्यांना चांगल्या चाऱ्याचे मैदानांची आवश्यकता होती व त्यांच्यासारख्या जोमदार, धिप्पाड, गौरवर्णाचे लोकांची उत्तम वाढ होण्यास चांगली हवा, मुबलक मोकळीं मैदानेंच अवश्य होतीं. या सर्व गोष्टींवरून त्यांचें मूळ ठिकाण रशिआ देशांतील उरल पर्वताचे दक्षिणेपासून जर्मनीचे उत्तरभागापर्यंतचा देश असावा असें अनुमान काढलें आहे. त्याचप्रमाणें पूर्वींच्या लोकांच्या सांपडलेल्या डोक्यांच्या कवच्यांवरूनही या अनुमानास बळकटी येते. टेलरचें आर्यांचें मूलस्थान ( Origin of the Aryans) नांवाचे पुस्तकांत या वादाचें साधकबाधक गोष्टींचें थोडक्यांत चांगलें विवेचन केलेलें आहे.

आर्य लोक तेथून युरोप व आशिया खंडांत पसरले. आशियाचे बाजूस जे आले ते आक्सस व जगझार्टिज नद्यांचे बाजूनें खोकंड व बदकशान पर्वतांपर्यंत आले. तेथून त्यांच्यापैकीं कांहीं इराण प्रांतांत गेले. व कांहीं हिंदूकुश पर्वत ओलांडून पूर्व अफगाणिस्थान देशांत येऊन राहिले. तेथून ते पंजाबाकडे वळले. पंजाबांतील मोठमोठ्या नद्या त्यांचे दृष्टीस पडल्या. त्यांना ते सिंधू असें म्हणूं लागले. इराणी लोक या नदीला हेंदू म्हणूं लागले. त्यावरून हिंद हें नांव झालें. इराणी लोकांनंतर जे ग्रीक लोक आले ते या नदीला

इंडीस असें म्हणूं लागले. वं त्या प्रांताच्या रहिवाशांना इंडोई असें नांव दिलें. त्यावरूनच इंडिया हा शब्द झाला.

---

१ झेंड ( इराण देशाची प्राचीन भाषा ), लाटिन व ग्रीक ( युरोपांतील प्राचीन भाषा ) व संस्कृत भाषा या सर्व भाषांत पुष्कळ शब्द एकसारखे आहेत, ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. शब्दसादृश्यावरून जरी निश्चित असा सिद्धांत काढतां येत नाहीं, तरी ती गोष्ट महत्त्वाची आहे यांत शंका नाहीं.

| संस्कृत. | झेंड. | ग्रीक. | लॅटिन. | इंग्लिश. | |
|---|---|---|---|---|---|
| पितर | पाटर | | पाटर | फादर | (बाप) |
| मातर | मतर | | माटर | मदर | (आई) |
| भ्रातर | ब्रातर | | फ्राटर | ब्रदर | (भाऊ) |
| दुहितर | दुग्धर | | | डॉटर | (मुलगी) |
| पशू | पसू | | पेकू | क्याटल | (गुरें) |
| गो | गाव | | व्याका | कौ | (गाय) |
| अश्व | अस्प | ओइस | एक्विस | हार्स | (घोडा) |
| श्वशुर | | | सोसर | फादर-इन्-ला | (सासरा) |
| मूष | | | मस | माउस | (उंदीर) |
| प्रथम | फ्रथेम | प्रोट | प्रायमा | फर्स्ट | (प्रथम) |
| तृतीय | थृत्य | ट्रीट | टर्शिया | थर्ड | (तिसरा) |
| चतुर्थ | तुरिया | टेटर्ट | क्वार्टा | फोर्थ | (चवथा) |
| | इत्यादि | | इत्यादि | | |
| ददामि | दधमी | डीडोमी | डो | गिव्ह | (देतों) |
| ददासि | दधसी | डीडोस | डास | गिव्हेस्ट | (देतोस) |
| ददति | दधते | डिडोटी | ड्याट | गिव्हज् | (देतो) |
| | इत्यादि | | इत्यादि | | |

याचप्रमाणें संख्यावाचक शब्द व क्रियापदांचे प्रत्ययांची पुष्कळ उदाहरणें देतां येतील. ( हर बिलास साडीकृत " हिंदु सुपिरिआरिटी, पृष्ठ२०८ ते २१०) १. के. व्ही. रंगस्वामी आयंगार यांचा हिंदुस्थानचा इतिहास, भाग (१) पृष्ठें १३ व १४.



नागकन्या. ( प्रो. ऱ्हिस डेव्हिड्स यांचे 'बुधिस्ट इंडिआ' नामक ग्रंथावरून.)

या आर्य लोकांच्या चालीरीतींची माहिती, तसेंच त्यांची सामाजिक, राजकीय व धार्मिक स्थिति वेदग्रंथावरून चांगली मिळते. हे वेद वेगवेगळ्या काळीं झाले असावेत. कोणत्या काळीं झाले याबद्दल तीव्र मतभेद आहे. कांहींचें म्हणणें ते इ. स. पूर्वीं दोन हजार वर्षांपेक्षां जुने नाहींत, तर कांहीं विद्वानांचें म्हणणें ते इ. स. पूर्वीं दहा हजार वर्षांच्या सुमारास जाहले. आर्य लोक आरंभीं मोठे शूर व पराक्रमी होते. दस्यू व राक्षस[1] यांना त्यांनीं जिंकले. त्या वेळच्या मंत्रांत ते आपल्या देवांना नेहमीं प्रार्थना करतात कीं तुम्हीं आमची संपत्ति कीर्ति व शौर्य वाढवून दास्यूंचा पराभव करा, कारण ते यज्ञ यागादि कर्में करीत नाहींत; त्यांची तुमच्यावर श्रद्धा नाहीं; व ते मानव जातीचेही नाहींत. आर्य लोक कधीं कधीं आपआपसांत सुद्धां लढाया करीत असत. त्या वेळची त्यांची संस्कृति केवळ ऐहिक प्रकारची होती. आपल्यास पुष्कळ धन, गाई, अन्न, शारीरिक संपत्ति मिळावी अशा प्रकारच्याच प्रार्थना त्या काळांतील मंत्रांत आढळतात. सोम नांवाचे पेयाचें ते पान करीत असत. गोमांस सुद्धां ते भक्षित असत, नर्तन, वादन, यांचाही प्रघात होता.

आरंभीं आर्य व अनार्य एवढेच काय ते वर्णभेद होते. त्या वेळेस लेखनकला नव्हती. व वेदमंत्र शिष्यपरंपरेनें तोंडपाठ करीत असत. मंत्र रचील त्याला ब्राह्मण हें नांव देत. युद्ध करील त्याला क्षत्रिय म्हणत. पुरुषसूक्ताचे काळापर्यंत जातिभेद तीव्रपणें प्रस्थापित झाल्याचें दिसत नाहीं.[2] त्या वेळेस देवळें नव्हतीं.

---

१ याशिवाय पिशाच, नाग, यक्ष, नीच, अपाच्य, आंध्र, पुंड्र, सांबर, पुलिंद वगैरे नांवाचे मूळचे रहिवासी होते.

२. प्रसन्नकुमार बोस यांचा Epochs of Civilisation हा ग्रंथ पृ. २२९.

पूजाअर्चा आपआपले आश्रमांत लोक करीत असत. कुळांतील पराक्रमी पुरुष तो राजा होई. त्याचे जवळ मंत्र म्हणणारे व यज्ञयाग करणारे ब्राह्मण असत. परंतु त्या वेळेस वेगवेगळ्या जाती झालेल्या नव्हत्या.[१] इ. स. पू. २०००-१४०० )

कालांतरानें आर्य लोक गंगानदीचे सुपीक प्रदेशांत आले, तेव्हां त्यांचे धर्मात व संस्कृतींत बदल झाला. त्यांचा आरंभींचा जोम कमी होत गेला. ऐषआराम वाढले. शौर्याचे ऐवजीं वाङ्मय, धार्मिक विचार वृद्धिंगत पावले. मंत्रतंत्राचें महत्त्व जास्त वाढलें. आरंभीं रचलेलें मंत्रांचें खरें रहस्य समजेनासें झालें व मंत्रसंख्याही फार वाढल्यामुळें इतकें पाठ करणें म्हणजे एक स्वतंत्र कामच झालें. साधारण माणसांच्या हातून तें होणें अशक्य झालें. स्वतंत्र ब्राह्मणवर्ग उत्पन्न झाला. ब्राह्मण आणि क्षात्रिय या दोन जातींमधील भेद तीव्र झाले. वेदांची व्यवस्था होऊन ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्वणवेद असे भाग [२]झाले. (इ. स. १४००-१०००)

या वेळेस दिल्लीचे नजीक कुरूंचा देश होता. कंबोजचे आसपास पांचालांचें राज्य होतें. गंगा व गंडकी नद्यांचे दरम्यानचा प्रांत कोसलांचा होता. तिरहुताजवळ विदेह लोक होते. काशी क्षेत्राजवळ काशी नांवाचे लोक होते.[३] यानंतर म्हणजे (सुमारें इ. स. पू १०००—३२०) आर्यन लोकांची प्रगति फार झपाट्यानें झाली. ते बंगाल्यांत व दक्षिण बहार प्रांतांत गेले. चंद्रगुप्तानें मौर्य साम्राज्य स्थापन केलें. पंजाबापासून

---

१. रमेशचंद्र दत्तांचा ग्रंथ Civilisation in Ancient India Vol 1पृ. ६

२. सदर पृ. ३३ ऋग्वेदाचा मंत्रसंख्या १०,४०२ ते १०,६२२ आहे. शब्दसंख्या १,५३,८२६ व वर्ण संख्या, ४,३२,००० आहे.

३ देशांचें व लोकांचें नांव एकच असे.

बहार प्रांतापावेतों त्यानें सर्व उत्तर हिंदुस्थानांत आपला अंमल बसाविला. दक्षिणेंत **आंध्र** राज्य स्थापन झालें. **चोल, चेर** व **पांडव** राज्यें स्थापन होऊन **कांचीस** प्रसिद्ध विद्यापीठ निघालें. ब्राह्मणें व **आरण्यकें** यांतील केवळ तांत्रिक ग्रंथांचे ठिकाणीं सूत्रें झालीं. **यास्कानें निरुक्त** केलें. **पाणिनीनें** आपला प्रसिद्ध व्याकरणाचा ग्रंथ याच काळांत केला. **सांख्य** व इतर दर्शनें झालीं. व **गौतम** बुद्धानें **बौद्ध** धर्माची स्थापना केली.

**मौर्य** वंशाचे सुमारापासूनचा संक्षिप्त इतिहास पुढील लेखांत येईलच. तेव्हां त्याबद्दल येथें कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहीं.



# भाग १ ला.

—:o:—

## भारतवर्षाच्या प्राचीन इतिहासाचीं साधनें.

वर्तमान पत्रांत कधीं कधीं असे उद्गार काढलेले आपल्या वाचण्यांत येतात कीं, हिंदुस्थान देश इतका विस्तृत आहे, त्यांतील लोकांचे भाषेंत व रीतीभातींत इतके भेद आहेत कीं, तो एक देश नसून युरोपखंडासारखें तें एक खंड आहे. परंतु थोडा विचार केला असतां, हें मत बरोबर नाहीं असें ध्यानांत येईल. चतुःसीमांचा विचार केला, तर असें दिसतें कीं, ह्या देशाच्या तीन बाजूंस समुद्र आहेत. उत्तर दिशेस सर्व जगतांत मोठा असा प्रचंड हिमालय पर्वत आहे. वायव्य दिशेस हिमाचलापासून तों आरबी समुद्रापर्यंत सिंधु नदी आहे. व त्या नदीच्या पलीकडे मोठमोठाल्या पर्वतांच्या रांगा आहेत, इशान्य दिशेस ब्रह्मपुत्र नद आहे. याप्रमाणें हिंदुस्थानच्या सर्व बाजूंस इतर देशांपासून भिन्न करणारीं निसर्ग देवतेचीं महान् महान् स्पष्ट निशाणें आहेत. तसेंच या चतुःसीमांच्या आंत राहणाऱ्या लोकांत जें एक प्रकारचे साम्य आहे, त्या योगानें हा देश इतर देशांपासून भिन्न असल्याचें वरवर पाहणाऱ्या माणसाच्या सुद्धां नजरेस येईल. हिंदु लोकांचे संबंधानें साधारणपणें पाहिलें तर, काश्मीर प्रांतांत ज्या देवांची पूजा करितात त्याच देवांची पूजा कन्याकुमारीच्या भूशिरापाशीं राहणारे लोक करितात. पश्चिमेच्या टोंकास असलेल्या द्वारका क्षेत्रीं ज्या कृष्ण देवाची भक्ति लोक करितात त्याच कृष्ण देवाची भक्ति पूर्वेकडील बंगाल देशांत व जगन्नाथपुरी क्षेत्रांत करितात. रामायण, महाभारतांतील कथा नेपाळ व हिमालयांतील इतर प्रांत यांतील लोक जितक्या आवडीनें ऐकतात तितक्याच आवडीनें काठेवाड, गुजराथ,

महाराष्ट्र, म्हैसूर, त्रावणकोर, मद्रास, ओढिया, बंगाल, बहार, अयोध्या, पंजाब, रजपुतस्थान, माळवा व नागपूर वगैरे प्रांतांतील लोक ऐकतात. सर्व देशांतील लोकांना गोवधाचा सारखाच तीव्र तिटकारा आहे. जातिनिर्बंध सर्व देशभर बहुतकरून सारखेच आहेत. स्त्रियांस वागविण्याची बरीवाईट रीत व मुलींचीं लग्नें करण्याचा काळ बहुतेक सारखाच आहे. बहुतेक भाषांच्या मुळाशीं संस्कृत भाषा आहे. धर्म, सामाजिक रीतीभाती व भाषा ह्या गोष्टी ज्या देशांतील लोकांत सारख्या आहेत, त्या देशाला तो फार अफाट आहे व त्याचे वेगळे वेगळे भागांत हवा पाण्यांत फार अंतर आहे वगैरे कारणांवरूच केवळ एक देश न म्हणणें हें युक्तीला विसंगत दिसतें. त्यांतून सांप्रतकाळीं तर हा सर्व देश एका साम्राज्याच्या छत्राखालीं आहे. तेव्हां अशा काळीं आरंभीं लिहिलेले उद्गार अयोग्य आहेत यांत संशय नाहीं.[१]"

युरोप खंडांतील ग्रीस, इटली वगैरे प्राचीन देशांचे इतिहास त्या त्या देशांतील लोकांनीं लिहिले आहेत. हिंदुस्थान देशाची गोष्ट मात्र या बाबतींत अगदीं भिन्न आहे. दुसऱ्या पुष्कळ विषयांत हिंदुस्थान देशाचें वाङ्मय इतर देशांच्या वाङ्मयापेक्षां जितकें श्रेष्ठ व भरपूर आहे, तितक्याच मानानें इतिहासाच्या संबंधानें त्याच्यांत उणेपणा आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाकरितां आपणाला दुसऱ्या देशाच्या तोंडाकडे पहावें लागतें. काश्मिरांतील राजतरंगिणी नांवाच्या ग्रंथाशिवाय हिंदुस्थानांत म्हणण्यासारखा दुसरा ऐतिहासिक ग्रंथ नाहीं. रामायण व महाभारत या ग्रंथांना जरी इतिहास म्हणण्याची वहिवाट आहे, तरी त्यांत अतिशयोक्तीचा व कल्पनेचा उघड उघडपणें इतका भाग आहे

---

१ प्रो. राधाकुमुद मुकरजीचें The Fundamental Unity of India. आहे.

कीं, त्यांतील खरा कोणता व खोटा कोणता हें निश्चयानें सांगणें फार कठीण आहे.

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचीं साधनें मुख्यत्वेंकरून आहेत तीं येणेंप्रमाणें:—

( १ ) लौकिकपरंपरेनें चालत आलेल्या दंतकथा.

( २ ) परदेशांच्या प्रवाशांनीं दिलेलीं वर्णनें.

( ३ ) ताम्रपट, कोंरीव लेण्यांतील व शिलांवरील लेख, दानपत्रें, नाणीं, वगैरे.

( ४ ) देशांतील ग्रंथकारांनीं लिहिलेले थोडे ऐतिहासिक ग्रंथ.

( १ ) या सदरांत आपलीं अठरा पुराणें येतात. पुराणांत दिलेली माहिती भविष्य रूपानें दिलेली आहे. पैकीं वायु, मत्स्य, विष्णु, ब्रह्मांड आणि भागवत या पांच पुराणांत राजांच्या वंशावळींच्या यादी दिल्या आहेत. सर्व पुराणांत मत्स्य हें प्राचीन आहे. मि. एफ. इ. पार्जिटर आय. सी. एस्. ह्यांनीं पुराणांतील वंशावळीसंबंधानें जेवढे जेवढे श्लोक आहेत, तेवढे सर्व एका ठिकाणीं छापले आहेत. पुराणांचा उल्लेख उपनिषदांत आहे, परंतु सांप्रत तीं ज्या स्वरूपाचीं आहेत तें स्वरूप त्यांना अलीकडे आलें असावें[1]

---

१ एच. एच. विल्सन यांचें मत कीं, विष्णुपुराण इ० स० १०४५ त झालें हें आतां खोटें ठरलें आहे. इ० स० १०३० त आल्बेरूनीनें अठरा पुराणें असल्याचें लिहिलें आहे. व त्यानें स्वतः मत्स्य, आदित्य व वायु या तीन पुराणांचे भाग प्रत्यक्ष पाहिले होते. बाण कवीनें हर्षचरित इ० स० ६२० त लिहिलें. त्यानें शोण नदाचे कांठचे आपले गांवीं सुदृष्टीचे मुखानें वायु पुराण ऐकल्याचें लिहिलें आहे. इ० स० ३०० चे सुमारास लिहिलेल्या मिलिंदपन्हा नांवाच्या जैन ग्रंथांत पुराणांचा उल्लेख केला आहे. मि० पार्जिटर यांचा ग्रंथ वेगळ्या वेगळ्या ६३ हस्तलिखित पोथ्यांची तुलना करून लिहिला आहे. त्यांचें म्हणणें

पाली भाषेंत दीपवंश व महावंशनामक ग्रंथांत मौर्य वंशाची हकीकत दिली आहे. तसेंच जैन व बौद्ध ग्रंथांतही इसवी सनापूर्वीच्या पांचव्या व सहाव्या शतकाची माहिती सांपडते.

( २ ) ग्रीस देशांतील आद्य इतिहासकार हिरोडोटस् यानें हिंदुस्थान व इराण यां संबधानें माहिती दिली आहे. पर्सिपोलिस शहराजवळ इराणच्या दरायस राजाच्या वेळच्या शिलालेखांत हिंदुस्थानचा उल्लेख आहे. ह्या शिलालेखाचें साल इ० सनापूर्वी ४८६ हें आहे. हिंदुस्थानची विश्वसनीय माहिती शिकंदर बादशाहाच्या स्वारीपासून आहे. ( ख्रि० सनापूर्वी ३२६ ) अरिअन नांवाच्या ग्रीक ग्रंथकारानें शिकंदर बादशहाच्या स्वारीची उत्तम हकीकत लिहिली आहे. त्या बादशाहाचे टॉलेमी व इतर अंमलदारांच्या हकीकतीवरून ती लिहिलेली आहे. सेल्यूकस् राजाचा मॅगस्थेनीज नांवाचा वकील चंद्रगुप्त मौर्य राजाकडे होता. त्यानें पुष्कळ तपशीलवार माहिती दिली आहे.

चिनी इतिहासकार सुमाचियेन ह्यानें इ. स. पूर्वी १०० वर्षे

---

पहिलें पुराण इ० स० चे दुसरे शतकांत तरी निदान म्हणजे आंध्र राजा यज्ञश्री याचे वेळेस झालें असावें. इ० सनापूर्वी चवथ्या शतकांत चाणक्यानें अर्थशास्त्र नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत तो राजांस इतिहास, पुराणें, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र वाचण्याचा उपदेश करितो. तेव्हां पुराणें हीं त्या वेळेस होतीं हें उघड आहे. पुराणें अगदीं अलीकडील आहेत व त्यांत कांहीं अर्थ नाहीं हें मत किती चुकीचें आहे हें यावरून ध्यानांत येईल. ( अपेंडिक्स ए, स्मिथसाहेबांचें पुस्तक, तिसरी आवृत्ति.) पुराणांचा उल्लेख आपस्तंब धर्मसूत्रांत आहे. ( मि. विजयचंद्र मुजूमदार, मॉडर्न रिव्ह्यू, जानेवारी १९१४ पान ६७९ ) वैद्य त्र्यंबक गुरुनाथ काळे यांचे पुराणनिरीक्षण नांवाचे पुस्तकांत या विषयाचा फार मार्मिक विचार केला आहे.

एक इतिहास लिहिला; त्यांतही हिंदुस्थानची माहिती आहे. चिनांतून पुष्कळ बौद्ध धर्माचे प्रवासी हिंदुस्थानांत येत असत. त्यांपैकीं पहिला **फाहिएन** हा इ. स. ३९९ सालांत चिनांतून निघाला, तो पंधरा वर्षांनीं चिनांत परत गेला. त्याच्या ग्रंथाचें भाषांतर फ्रेंच व इंग्रजी भाषेंत झालेलें आहे. त्यांत दुसरा चंद्रगुप्त ऊर्फ विक्रमादित्य ह्याच्या राज्याच्या वेळचे राजकीय व सामाजिक स्थितीचें फार मार्मिक वर्णन दिलेलें आहे. परंतु सर्वांत उत्तम वर्णन म्हणजे प्रसिद्ध ह्युएनत्सांग याचें आहे. तो हिंदुस्थानांत सुमारें पंधरा वर्षें ( इ. स. ६२९–६४५ किंवा ६४६ ) राहिला. तो चिनांतून निघून तार्तर देशांत आला व वाटेंत पुष्कळ देश व शहरें पाहून ताश्खंड शहरीं आला. तेथून जगझार्टिज नदी उतरून तो समरकंदास आला. तेथून हिंदुकुश पर्वत ओलांडून कपिश नगरांत आला. त्या शहरांतील राजा क्षत्रिय होता. तेथें १०० मठ असून त्यांत सहा हजार यति होते. शहराजवळच अशोकाचा पहिला स्तूप त्याचे दृष्टीस पडला. तेथून तो उत्तर हिंदुस्थानांत शिरला. प्रथमतः त्याला लंपा नांवाचें शहर लागलें. त्या शहराच्या उत्तरेकडील लोकांस म्लेंछ म्हणत असत.

तेथून तो नगरहार शहरीं आला. ह्या शहराच्या नैर्ऋत्य दिशेस एक गुहा होती; त्या गुहेंत बुद्ध प्रभूनें आपली छाया ठेविली होती. व प्राचीन काळीं ती छाया प्रत्यक्ष बुद्धाप्रमाणेंच दिसत होती, अशी आख्यायिका होती; परंतु त्या विद्वान् प्रवाशाला तसें कांहीं तेथें दिसलें नाहीं. तो प्रवासी तेथून निघून तक्षशिला, मथुरा, कान्यकुब्ज, प्रयाग वगैरे क्षेत्रें पाहून काशीस आला. काशीस बौद्धापेक्षां ब्राह्मणधर्मीचेच अनुयायी त्यास जास्त दृष्टीस पडले. तेथें शंभर देवळें होतीं व शिवाचे अनुयायी दहा हजार होते. तेथें पितळेची शंभर फूट उंचीची महेश्वराची एक मूर्ति

त्याचे दृष्टीस पडली. कांहीं लोक रस्त्यांतून अगदीं नग्न जात होते व कांहींनीं आंगांस राख फासली होती. काशीहून ह्युएनत्संग उत्तरेकडे गेला. तिकडे **वैशाळी** व **पाटलीपुत्र** ह्या राजधान्या त्यानें पाहिल्या. तेथून तो **गयेस** गेला, परंतु सर्वांत ज्यास्ती मुक्काम त्यानें **नालंद** येथें केला. तेथें तो पांच वर्षें राहिला, व योगशास्त्र, न्यायानुसारशास्त्र, अभिधर्मशास्त्र, हेतुविद्याशास्त्र[१], शब्द-विद्याशास्त्र वगैरे शास्त्रांचा त्यानें अभ्यास केला. तेथें दहा हजार यति होते. तेथून तो निघून **आसाम**, **ओरिसा**, **आंध्र**, **द्राविड** वगैरे प्रांतांत गेला व **कोंकण**, **महाराष्ट्र**, **गुजराथ**, **कच्छ**, **काठेवाड**, **सिंध** इत्यादि प्रांतांतून, हिंदुकुश पर्वतावरून आपल्या देशांत परत गेला. ह्यावरून त्याच्या लेखाचें महत्त्व किती आहे हें ध्यानांत येईल.

**गिझनीच्या महमदाबरोबर अलबरूनी** नांवाचा मुसलमान आला होता. त्यानें **तहकीत–इ–हिंद** नांवाची हकीकत लिहिली आहे.

पुढें इ० स० १२९९ सालीं **वेनिस** शहराचा प्रवासी **मार्को-पोलो** हा दक्षिण हिंदुस्थानांत आला होता.

( ३ ) पुष्कळ ठिकाणीं पर्वतांचे गुहांत, शिलांवर, स्तंभांवर व प्राचीन मंदिरावर कोरींव लेख सांपडतात. तसेंच ताम्रपटावरील दानलेख आहेत, त्यांवर दान करणारांचीं व त्यांचे पूर्वजांचीं नांवें, सालें वगैरे दिलेलीं आहेत. प्राचीन इतिहासाची माहिती **अशोक-राजाच्या** शासनपत्रावरून पुष्कळ मिळते. दक्षिण हिंदुस्थानांत सहस्रावधि ताम्रपट व शिलालेख सांपडतात. उत्तर हिंदुस्थानांतील सर्वांत प्राचीन लेख म्हणजे इ० स० पूर्वी ४९० वर्षांचा असून, तो **पिप्रावा** गांवीं बुद्धाच्या अस्थि ठेवल्याबद्दलचा आहे अशी एक वेळ समजूत होती, परंतु ती समजूत अलीकडील शो-

१ एल्फिन्स्टनचा हिंदुस्थानचा इतिहास पृष्ठें २८८-२९९; हेतुविद्या-शास्त्र याचा अर्थ काय हें समजत नाहीं.

थांवरून खोटी ठरली आहे. इ० स० पूर्वी ३०० वर्षांपेक्षां म्हणजे अशोकाचे पूर्वीचा खात्रीचा लेख अद्यापि सांपडत नाहीं.

मि. रॅपसन, कनिंगहम वगैरे ग्रंथकर्त्यांनीं जुन्या नाण्यांपासून काय माहिती मिळण्यासारखी आहे, त्याचें विस्तृत वर्णन दिलेलें आहे. हीं नाणीं सोन्याचीं, चांदीचीं व तांब्यांचीं आहेत. तीं हिंदुस्थानांतील सर्व भागांत सांपडतात. त्यांवर ज्या राजांनीं तीं काढलीं त्यांचीं, कधीं कधीं त्याचे बापांचीं नांवें व क्वचित् प्रसंगीं तीं सुरू झाल्याचीं सालें दिलेलीं आहेत.

( ४ ) बाणकवीचें हर्षचरित्र व बिल्हण कवीचें विक्रमांक॰ चरित ह्यांत ऐतिहासिक माहिती मिळते. बंगाल्यांतील पाल राजांची माहिती ज्यांत आहे असें रामचरित्र नांवाचें काव्य अलीकडे सांपडलें आहे. तसेंच तामिल काव्यांत इ० सनाचें पहिले व दुसरे शतकांतील दक्षिणेंतील राजांची माहिती आहे.

हिंदुस्थानचा इतिहास व्यवस्थितपणें लिहिण्यास एक मोठी अडचण आहे. ती ही कीं, या देशांत शक किंवा वर्षं देण्याच्या रीती फार भिन्न भिन्न आहेत. कनिंगहॅमचे हिंदुस्थानांतील शकांचें पुस्तकांत विसापेक्षां जास्त शकपद्धति दिल्या आहेत, व आणखीही पुष्कळ सांपडतील. वेगवेगळे प्रांतांतील वेगवेगळे राजे गादीवर बसले तेव्हांपासून किंवा त्यांचे राज्याभिषेकांपासून त्या त्या प्रांतांत वर्षं मोजण्याचे प्रकार आढळतात. त्या सर्वांचा मेळ घालण्यास फार प्रयास पडतात. परंतु विद्वान् शोधकांना या कामांत अलीकडे बरेंच यश आल्यामुळें आतां हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास बऱ्याच व्यवस्थित रीतीनें लिहिणें शक्य झालें आहे. समकालीन ग्रीक राजांचीं नांवें समजल्यामुळें, मौर्य वंशाचे राजांचे शकावलीबद्दल आतां शंका राहिली नाहीं.

---

# भाग २ रा.

——:०:——

## शैशुनाग वंश.

महाभारतांत ज्या युद्धाचें वर्णन केलें आहे त्या युद्धाच्या कालाबद्दल अद्यापि मतभेद आहे. कांहीं विद्वानांचें म्हणणें तें युद्ध ख्रिस्तापूर्वी ३००० व्या वर्षीं झालें. तर कांहींचें म्हणणें तें ख्रि. पूर्वीं १४०० वर्षीं झालें. रा. ब. चिंतामणराव वैद्यांनीं पू. ३१०२ वर्ष ठरविलें आहे. त्या कालापासून तों ख्रि. पूर्वीं ६००–७०० वर्षें पर्यंतचा कांहीं विश्वसनीय इतिहासाचा अद्याप-पावेतों शोध लागला नाहीं त्या वेळेस उत्तर हिंदुस्थानांत १६ राज्यें होतीं असें डेव्हिस यानें 'बुधिस्ट इंडिया' ह्या ग्रंथांत लिहिलें आहे. तीं राज्यें पेशावर व रावळपिंडी (प्राचीन गांधार) पासून तों उज्जनीपर्यंत होतीं.

त्या वेळेस ह्या देशाच्या पुष्कळ भागांत मोठमोठालीं अरण्यें होतीं. नांवलौकिकास आलेलें प्रथमचें राज्य कोसल हें होतें. त्याची राजधानी हिमालयपर्वताच्या पायथ्याशीं रात्पी नदीचे वरचे बाजूस श्रावस्ती नांवाची नगरी होती. त्यानंतर मगध देशाचे राजे उदयास आले. तेथील पहिला राजवंश शैशुनाग नांवाचा होता. त्याची राजधानी गंगेजवळच्या राजगृह नांवाची होती. त्या वंशाच्या मूळ संस्थापकाची व त्यानंतरच्या तीन राजांची कांहीं माहिती मिळत नाहीं. पांचवा राजा बिंबिसार ऊर्फ श्रेणिक हा होता. त्यानें पूर्वेकडील अंगदेश काबीज केला. आणि कोसल व लिच्छवी घराण्यांतील मुलीशीं लग्न लावून आपलें वर्चस्व वाढविलें. त्यानें २८ वर्षें राज्य केलें.

त्याच्या कारकीर्दीत जैन धर्माची स्थापना करणारा वर्धमान महावीर व बौद्ध धर्माचा संस्थापक गौतम बुद्ध हे दोघेहि आप-आपल्या धर्माचे उपदेश करीत होते. महावीर अजातशत्रूचे राज्याचे आरंभीं मृत्यू पावला. तो बिंबीसार राजाचे राणीचा नजीकचा आप्त होता. गौतम बुद्ध ख्रि. पूर्वीं ४८७ सालांत मृत्यु पावला[१]. त्याचे मृत्यूचें पूर्वीं कोसलचा राजा विरूढ यानें त्याचें राहण्याचें गांव कपिलवस्तू काबीज केलें व शाक्य लोकांची फार मोठी कत्तल केली.

बिंबिसाराचा मुलगा अजातशत्रु हा इ- स. पूर्वीं ४९० किंवा ४९९ व्या वर्षीं गादीवर बसला. ह्या अजातशत्रूनें आपल्या बापास ठार मारिलें असा त्याजवर आरोप आहे. तो आरोप खरा असेल किंवा खोटा असेल. परंतु लवकरच त्याच्या आईचा भाऊ कोसल देशचा राजा याचें अजातशत्रूशीं युद्ध सुरू झालें. पुढें कांहीं वर्षांनीं ( ख्रि० पूर्वीं ४०० वर्षांच्या सुमारास ) कौसलचें राज्य नामशेष होऊन मगध राज्यांत सामील झालें, अजातशत्रूनें लिच्छवी राज्यही घेतलें व त्यानें पाटली गांवाजवळ एक दुर्ग बांधला. पुढें त्याचा नातू उदय ह्यानें शोण नदाच्या कांठीं पाटलीपुत्र हें प्रसिद्ध नगर वसविलें. हिरण्यवाह असेंही शोण नदाचें नांव आहे. ( सर. रामकृष्णपंत भांडारकरांचा निबंध. ) कुसुमपुर हीं नांवें याच शहराचीं होतीं. हल्लीं त्याचें नांव पाटणा असें आहे.[२]

ख्रि. पूर्वीं ५२१–४८५ पावेतों इराणचा बादशहा हिस्तास्पीज हा होता. त्याचा मुलगा दरायस हा बिंबिसार व अजातशत्रु यांचा समकालीन होता. सिंध प्रांत व पंजाबचा कांहीं भाग त्या वेळेस दरायसचे ताब्यांत होता. त्या प्रांतापासून

---

१ बौद्ध धर्माचा इतिहास एका स्वतंत्र भागांत दिला आहे. २ या शहराची संक्षिप्त हकीकत पुढें दिली आहे.

त्याला सुमारें एक कोटि रुपये वसूल मिळत असे. पुढें दोन शतकां नंतर शिकंदर बादशहाचे स्वारीचे वेळेस या दोन्ही प्रांतांवर हिंदू राजांचा अंमल होता. अजातशत्रूनंतर त्याचा मुलगा दर्शक हा गादीवर बसला ( ख्रि. श. पूर्वीं ४७९ ) व त्याच्या नंतर त्याचा मुलगा उदय हा ४५० सालीं गादीवर बसला. उदयानंतर नंदिवर्धन व महानंदी नांवाचे दोन राजे होऊन शैशुनाग वंशाची समाप्ति झाली. महानंदी याला एका शूद्र स्त्रीपासून महानंद नांवाचा मुलगा झाला. त्यानें गादी बळकावली व ख्रि. श. पूर्वीं ३७२ ह्या वर्षीं नंद वंशाची स्थापना केली.

ह्या वंशाच्या राजांची खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. पुराणांतरीं महापद्म व त्याचे आठ मुलगे ह्यांना नवनंद असें म्हटलें आहें. परंतु ते राजे लोकांना अप्रिय होते असें दिसतें. त्या वंशांतील शेवटच्या राजास ३२२ सालीं चंद्रगुप्त मौर्य यानें पदच्युत केलें व ठार मारलें. चंद्रगुप्ताचें राज्यारोहणापासून मौर्यवंशाच्या कारकीर्दीस आरंभ झाला. मुद्राराक्षस नाटकाचें कथानक या राज्यक्रांतीबद्दलचें आहे.

ह्या वंशाच्या राजांची हकीकत देण्यापूर्वीं हिंदुस्थानच्या इतिहासांत जी एक चिरस्मरणीय गोष्ट घडून आली व ज्या गोष्टीमुळें हिंदुस्थानच्या इतिहासास अगदीं नवें वळण लागलें, त्या गोष्टीचा

---

१ हा चंद्रगुप्त नंदराजाचा दासीपुत्र होता. त्याची व शिकंदर बादशहाची गांठ पडली होतीं असें म्हणतात. शिकंदराचे मरणानंतर म्यासिडोनियन अंमलदारांना हिंदुस्थानांतून हांकून देण्यांत चंद्रगुप्तानें बराच पराक्रम दाखविला व पाटलिपुत्राची गादी बळकावण्यापूर्वीं वायव्येकडील बराच मुलूख त्यानें काबीज केला होता. त्याचा प्रधान प्रसिद्ध चाणक्य ऊर्फ कौटिल्य ऊर्फ विष्णुगुप्त हा होता. उत्तर हिंदुस्थानचे राजांनीं चंद्रगुप्तावर स्वारी करण्याचा बेत केला त्या वेळीं त्याच्याच युक्तीनें तो बेत निष्फळ झाला.

वृत्तांत सांगणें जरूर आहे. ती गोष्ट म्हणजे शिकंदरबादशहाची हिंदुस्थानावर स्वारी ही होय.

---

# भाग ३ रा.



## शिकंदर बादशाहाची स्वारी.

इराणचा राजा दरायस ह्याचा इसॉस व गौगमेला या दोन लढायांत पूर्ण पराभव करून ग्रीस देशांतील मोसीडोनिआ प्रांतांचा राजा आलेक्झांडर ज्यास आपण शिकंदर म्हणतों तो शिकंदर बादशाहा हिंदुस्थान जिंकण्यास ख्रि.पू.३२७ सालीं निघाला. त्याच्या बरोबर निदान ५०।६० हजार ग्रीस देशांतील लोकांची फौज होती. वाटेंत हिंदुकुशासारखे मोठमोठाले पर्वत चढून व अस्पेशियन, अस्सकेनाय वगैरे लोकांना जिंकून तो सिंधुनदाजवळील डोंगरी किल्ला एओर्नोस घेण्याच्या तयारीस लागला. किल्ल्याची उंची ७००० फूट होती. त्याच्या दक्षिणेस सिंधु नदी आहे; ती तेथें फार खोल आहे. किल्ल्याच्या सभोंवार उंच व कठीण डोंगराचे सुळके आहेत. किल्ल्यावर पिण्याचा पाण्याचा पुरवठा चांगला असून शेतीचे उपयोगाची मुबलक जमीन होती. किल्ल्यावर जाण्यास फक्त एकच रस्ता होता. ह्या किल्ल्यास वेढा देण्यापूर्वी आपल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें शिकंदरानें आपल्या फौजेच्या मागील तुकडीचें दळणवळण बिनहरकतीचें व मोकळें करून ठेविलें होतें. सर्व तयारी झाल्यानंतर थोडी फौज घेऊन शिकंदरानें आसपासची सर्व टेहळणी केली. किल्ल्यावर एकदम हल्ला करणें अशक्य असल्यामुळें, भोंवतालच्या एक दोन दऱ्या भरून काढण्याचा त्यानें निश्चय केला;

व जवळ असलेल्या रानांतून झाडें तोडून त्यानें त्या दऱ्या भरून काढल्या. चार दिवसांत किल्ल्याच्या सपाटीइतकी उंच असलेली एक शेजारची टेकडी त्यानें काबीज केली. किल्ल्यावरील लोकांनीं हें विलक्षण कृत्य पाहिलें तेव्हां ते आश्चर्यचकित झाले व त्यांनीं तहाचें बोलणें सुरू केलें. दरम्यान काळोख्या रात्रीं पळून जाण्याचा त्यांनीं घाट घातला. परंतु शिकंदराचे नजरेस ही गोष्ट येतांच त्यांचा पाठलाग त्यानें केला व बहुत लोकांची कत्तल केली. आजपर्यंत हा किल्ला कोणत्याही शत्रूनें घेतला नव्हता. किल्ल्याचा बंदोबस्त करून शिकंदर अटक शहराकडे निघाला. तेथें जवळच तक्षशिलानामक नगर होतें. तेथील राजाकडून त्यांजकडे वकील आले. त्यांनीं तीस हत्ती, तीन हजार पुष्ट बैल, दहा हजारांवर शेळ्या मेंढ्या व दोनशें चांदीचीं नाणीं नजर केलीं आणि शिकंदराचें स्वामित्व कबूल केलें. आणि ३२६ सालच्या मार्च महिन्यांत, शिकंदर बादशाहानें सिंधु नदी उतरून हिंदुस्थानच्या जमिनीवर पाऊल टाकलें. अभिसारच्या राजानें वकील पाठविलें. पुढें पोरसनामक राजाचें राज्य लागलें. पोरस राजाही दुसऱ्या राजांप्रमाणें आपणास शरण येईल असें वाटून शिकंदरानें त्याला निरोप पाठविला. पोरस राजानें क्षत्रियास योग्य असें उत्तर पाठविलें. तो म्हणाला, " मी आपल्या भेटीस सरहद्दीवर येतों, तो लढाई करण्याकरितां येतों. "

तक्षशिला येथें आपल्या फौजेला कांहीं दिवस विसावा देऊन पोरसशीं सामना करण्याकरितां पूर्व दिशेकडे त्यानें कूच केलें. मे महिन्याच्या आरंभीं तो झेलम येथें येऊन पोंचला. बर्फ वितळल्यामुळें त्या नदीला पूर आला होता. सिंधु नदी उतरण्याकरितां ज्या नावा तयार केल्या होत्या त्याच नांवा ही नदी म्हणजे हिदस्पीज ऊर्फ वितस्ता ऊर्फ झेलम उतरण्यास आणविल्या. तो

नदीजवळ आला तेव्हां नदीच्या पैलतीरावर पोरस राजा पन्नास हजार फौजेसह लढाईस तयार असलेला त्याच्या दृष्टीस पडला. पुरानें भरलेली नदी ओलांडून इतक्या मोठ्या सैन्याशीं घोडेस्वारांना युद्ध करणें बहुतेक अशक्य होतें. हिंवाळ्यांत नदीचें पाणी कमी होईपर्यंत वाट पाहण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. परंतु शिकंदरासारख्या उत्साही व धाडशी वीराला इतके दिवस स्वस्थ बसणें कसें रुचेल? त्यानें लढाई ताबडतोब करण्याचा निश्चय केलाच, परंतु कुशल सेनापतीस शोभेल अशी युक्ति काढली. त्यानें सर्व लोकांत आपण हिंवाळ्यापर्यंत युद्ध करणार नाहीं अशी भुमका पसरू दिली. परंतु पोरस राजाच्या सैन्यास विसावा न मिळावा म्हणून आपल्या फौजेचा कांहीं भाग सारखा इकडून तिकडे तो फिरवीत होता. तथापि त्यानें गुप्त रीतीनें कांहीं वेगळाच बेत ठरविला होता. फौजेच्या मुख्य तळापासून वरच्या बाजूस सुमारें १६ मैलांच्या अंतरावर नदींत एक बेट होतें. त्या बेटाजवळ तो स्वतः सुमारें १२ हजार निवडक फौज घेऊन लांब रानांतून गेला. व रात्रीच्या वेळेस ती फौज घेऊन त्या बेटांत उतरला. परंतु त्या बेटापासून पलीकडच्या तीरापर्यंत नदीचा भाग चिंचोळा खरा, परंतु फार खोल असा होता. तथापि त्यानें त्यांत घोडेस्वार घातले. घोड्यांचीं तोंडें मात्र पाण्यावर राहिलीं होतीं. पहांटेच्या सुमारास तो पैलतीरावर आपल्या निवडक स्वारांसह उतरला. पोरस राजाच्या मुलाचे दृष्टीस हीं गोष्ट पडतांच तो दोन हजार घोडेस्वार व १२० रथ घेऊन आला. शिकंदरानें त्या फौजेचा ताबडतोब पराभव केला व ४०० लोक ठार केले. पोरस राजाचा तळ तेथून दूर होता. तो आपली फौज लढाई करण्याकरितां घेऊन आला. त्यानें आपल्या फौजेची व्यवस्था केली ती येणेंप्रमाणें:—

२०० हत्ती सर्व फौजेच्या पुढें शंभर शंभर फुटांच्या अंतरा-

वर उभे केले. त्यांच्या आठ रांगा केल्या. ह्या हत्तींच्या मागें तीस हजार पायदळ सैन्य उभें केलें. दर दोन हत्तींच्या दरम्यान पायदळाच्या टोळ्या उभ्या केल्या. पायदळाच्या दोन्ही बाजूंस चार हजार घोडेस्वार व तीनशें रथ ठेविले. दर एक रथाला ४ घोडे होते व आंत सहा जवान होते; त्यांपैकीं दोन बाजूंस दोन तिरंदाज होते, दोन ढालवाले होते व दोन सारथि होते. पायदळाजवळ रुंद पात्यांच्या तरवारी असून ढाला होत्या व शिवाय एकेक तिरकमठा व प्रास अशीं हत्यारें होतीं. जमीन घट्ट नसल्याकारणानें, तिरकमठा जमिनीवर ठेवून दोरी ओढण्यास कठीण जात असे. ह्याप्रमाणें आजपर्यंतच्या जगतांतील कुशल योद्ध्यांपैकीं एका श्रेष्ठ योद्ध्याशीं लढाई करण्यास पोरस राजा सिद्ध झाला. लढाईच्या आरंभीं शिकंदरानें तिरंदाज घोडेस्वार पोरस राजाच्या डाव्या अंगच्या तुकडीवर पाठविले. त्यांनीं बाणांचा सारखा भडिमार केला. त्यांच्या मागोमाग शिकंदर स्वतः घोडेस्वार घेऊन आला. डाव्या बाजूच्या तुकडीवर याप्रमाणें फार जोराचा मारा झालेला पाहून पोरस राजाच्या उजव्या बाजूची फौज त्यांचे मदतीस धावून जाऊं लागली. परंतु इतक्यांत शिकंदरानें कोइनोस ह्याच्या हाताखालीं ज्या दोन पलटणी ठेविल्या होत्या त्या फौजेच्या समोरून दौड करून उजव्या हाताच्या तुकडीवर पडल्या. त्या दोन पलटणींना हरकत करण्याकरितां म्हणून पोरसचे घोडेस्वार आपलें तोंड पालटवयास लागले; अर्थात् त्यामुळें पहिल्या व्यवस्थेंत घोटाळा झाला. शिकंदरानें ही संधी पाहून त्यांच्यावर जोरानें हल्ला केला. त्यामुळें पोरसच्या घोडेस्वारांचा घोटाळा होऊन ते हत्तींच्या बाजूला आश्रयाकरितां आले. हत्तीच्या महातांनीं मॅसेडोन लोकांच्या घोडेस्वारांवर हत्ती रेंटले. मॅसेडोनच्या

रांनीं हत्तीच्या महातांवर व हत्तीवर बाणांचा सारखा वर्षाव केला.

त्यामुळें हत्ती बेफाम झाले, व ते आपल्याच लोकांवर धावून जाऊं लागले. हा घोटाळा चालला आहे तों नदीच्या दुसऱ्या बाजूस शिकंदरानें जी फौज ठेविली होती ती ताजीतवानी चाल करून आली, व हिंदी फौजेचा पूर्ण पराभव झाला. पोरसचे तीन हजार घोडेस्वार व बारा हजार पायदळ मारले गेले; नऊ हजार लोक कैदी झाले. शिकंदराकडील फक्त एक हजार लोक पडले. पोरस राजा मोठा धिप्पाड व शूर पुरुष होता; तो शेवटपर्यंत सारखा लढत होता. त्याला नऊ जखमा झाल्या व मूर्च्छा येऊन तो खालीं पडला, तेव्हां शत्रूनें त्यास पकडलें. शिकंदराला त्याच्या शौर्याचें मोठें कौतुक वाटलें. त्यानें त्याला विचारिलें, "आपणास आम्हीं कोणत्या रीतीनें वागवावें?" पोरस म्हणाला, "राजाप्रमाणें" शिकंदर म्हणाला, "हें तर आम्हीं आपण होऊनच करूं परंतु आपण आपली विशेष इच्छा कळवावी." पोरस म्हणाला, "त्या एका शब्दांत सर्व गोष्टींचा समावेश होतो." शिकंदरानें त्याच्या ताब्यांत त्याचें सर्व राज्य ठेविलें. इतकेंच नव्हे तर जास्त मुलूखही त्याच्या ताब्यांत दिला. व या कृत्यानें त्यानें आपणाला एक कृतज्ञ व विश्वासू दोस्त जोडला[१]. शिकंदर बादशहानें आपला बसावयाचा घोडा बुसीफेलस नांवाचा होता, त्याच्या नांवानें एक शहर वसविलें व ज्या ठिकाणीं आपला जय झाला त्या ठिकाणीं निकाया नांवाचें शहर वसविलें. ह्यानंतर पूर्वेकडे तो जाऊं

१ मॅक्स डंकरचे हिस्टरी ऑफ एंटिकिटी नांवाचे ग्रंथांत लिहिलें आहे कीं, पोरसवर शिकंदरानें हल्ला केला तेव्हां शिकंदराची फौज पोरसच्या दुप्पट होती. व शिवाय तक्षशीलेचा राजा मोफिस याची ५००० त्याला येऊन मिळाली. त्याचें म्हणणें क्लिओफिस नांवाच्या हिंदू राणीच्या फौजेचा शिकंदरानें विश्वासघातानें नाश केला. हिंदु सुपिरिआरटी; हर बिलास सार्डा. पृ. १२७, १२८.

लागला, व चिनाब ( अकिसिनीज ) आणि रावी ( हायड्राओ-टीज ) या नद्या ओलांडून गेला. त्याच्या मनांतून आणखी पुढें जावयाचें होतें. परंतु त्याचे लोक अगदीं कंटाळून गेले होते. आपल्या देशास कधीं परत जाऊं असें त्यांना झालें होतें. शिकंदरानें त्यांनीं मिळविलेल्या जयांचें वर्णन करून व या पुढें आणखी दुसरे जय व अलोट संपत्ती मिळविण्याची आशा दाखवून उत्तेजनपर भाषण केलें परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं एके दिवशीं त्याचा अति विश्वासू सेनापति कोईनोस ( ज्यानें पोरसशीं झालेल्या लढाईत मोठें शौर्य दाखविलें होतें ) ह्यानें शिकंदराशीं बोलण्याचें धाडस केलें.

तो म्हणाला, " आपण आपला देश सोडल्याला आठ वर्षें झालीं. त्या मुदतींत आपले पुष्कळ लोक मेले. कित्येक लोक आजारी होऊन देशास परत गेले. कित्येकांना जखमा झाल्या आहेत. आतां यापुढें जाण्याची कोणाची उमेद राहिली नाहीं. हें भाषण ऐकून शिकंदरास फार वाईट वाटलें. तीन दिवस तो कोणाच्या दृष्टीस पडला नाहीं, त्यानें अन्नपाणी वर्ज्य केलें. परंतु शेवटीं नाइलाज होऊन त्यानें परत फिरण्याचा बेत कायम केला. नदीच्या पलीकडे त्यानें बारा भव्य रणस्तंभ उभारले. एवढें मोठें सैन्य परत नेण्याची तयारी करणें म्हणजे लहानसहान काम नव्हतें. त्यानें समुद्राच्या रस्त्यानें परत जाण्याचा बेत कायम केला, व त्याकरितां त्यानें तीस तीस वल्ह्यांचीं अशीं मोठमोठालीं ८० जहाजें व शिवाय घोडे व सामान नेण्याकरितां म्हणून एकंदर सुमारें दोन हजार नांवा तयार करविल्या. आपल्या देशास परत जाण्याकरितां निघण्याचे पूर्वीं, हिंदुस्थानच्या राजांचे वकील व आपले अंमलदार ह्यांच्या समक्ष हिदास्पीज व हिफासीस नद्यांच्या मधील सर्व प्रांताचा राजा पोरस आहे असें त्यानें जाहीर केलें व तक्षशिलेच्या

राजाला सिंधु व हिदास्पिज ह्या दोन नद्यांच्या मधला प्रांत दिला आणि त्या दोन राजांचें पूर्वीपासून वैर होतें त्यांचें त्यानें आतां सख्य करून दिलें. जहाजांच्या रक्षणाकरितां एक लक्ष वीस हजार फौज नदीच्या दोन्ही तीरांनीं चालचालविली. पश्चिमेच्या फौजेचें सेनाधिपत्य क्रॅटेरास ह्यास दिलें व पूर्वेकडील सैन्याचें आधिपत्य हेफेस्टिअन यांस दिलें. सिंधूच्या पश्चिमेकडील क्षत्रप फिलीपोस ह्यास तीन दिवसांनीं फौजेचा मागील भाग घेऊन येण्यास सांगितलें. पांचव्या दिवशीं हीडॅस्पीज (झेलम) व अकीसिनी ( चिनाब ) या दोन नद्यांच्या संगमावर जहाजें येऊन पोंचलीं. तेथें मुक्काम करून व आसपासच्या राज्यांवर स्वाऱ्या करून पुढच्या रस्त्याचा बंदोबस्त केला. मलोई ऊर्फ मालव व अक्षिद्रकी उर्फ क्षुद्रक ह्या दोन प्रबल लोकांचा शिकंदरावर हल्ला करण्याचा बेत समजल्यावरून, शिकंदर स्वतः त्यांच्या अंगावर चालून गेला, व त्यानें त्यांचे बहुतेक लोक ठार केले. मालव लोकांचें एक तटबंदी शहर घेत असतांना, शिकंदरावर एक जीवावरचा प्रसंग आला होता. तटाच्या भिंतीवर चढण्यास शिपायास वेळ लागला म्हणून तो स्वतःच शिडी घेऊन तटावर चढला, व एकदम त्यानें आंत उडी टाकली. त्या वेळेस त्याचे बरोबर फक्त तीन सोबती होते. शत्रूचे लोक त्याच्यावर तुटून पडले. तिघांपैकीं इब्रियास नांवाचा मनुष्य लवकरच ठार झाला. शिकंदर स्वतः एका झाडाला पाठ देऊन लढत असतां, एक तीर लागून तो पडला. ब्युकेस्टास हा त्याचे दोन्ही बाजूंस पाय देऊन हातांत ढाल घेऊन त्याचें रक्षण करीत होता. शिकंदराची फौज अगदीं बेफाम होऊन गेली. शेवटीं भिंतींत खुंट्या मारून कांहीं लोक भिंतींवर चढले. त्यांनीं तेथून आंत उड्या टाकल्या, व शिकंदराचा प्राण वांचविला आणि शेवटीं शहर घेतलें. तेव्हां बायकामुलांचाही विचार मनांत न

आणतां, मॅसिडोनियन लोकांनीं सर्व शहरवासी लोकांची कत्तल केली. जहाजें पुढें सिंधूच्या व हीफासिस ( बिया ) नदीच्या संगमावर आलीं. तेथून सिंधूच्या मुखापाशीं कराचीजवळ येऊन, शिकंदर फौज घेऊन बलुचिस्थानांतून इराणांत गेला, व जहाजें इराणी आखातांत गेलीं. पुढें ३२३ सालच्या जून महिन्यांत शिकंदर बाबिलोन एथें एकाएकीं मरण पावला. शिकंदराची स्वारी ३२७ मे पासून ३२४ चे मेपर्यंत झाली. ह्यांपैकीं सिंधु नदीच्या पूर्वेस त्यानें सुमारें १९ महिने घालविले. ह्या स्वारीमुळें हिंदुस्थान व युरोप यांच्यामध्यें दळणवळण वाढलें. परंतु युरोपियन लोकांचा अम्मल हिंदुस्थानावर फार दिवस टिकला नाहीं. शिकंदर इराणांत असतानांच त्यानें नेमलेला क्षत्रप फिलिपास हा मारला गेला. तीन वर्षांचे आंतच त्यानें नेमलेले सर्व अमलदार हांकलून दिले गेले. बंदोबस्तास ठेविलेल्या सैन्याचा नाश झाला, व त्याचे स्वारीचा कांहीं एक मागमूसही राहिला नाहीं. परंतु हिंदुस्तानाचा युरोप खंडाशीं संबंध तेव्हांपासून कायमचा सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.



# भाग ४ था.

——:०:——

फिलिपासच्या खुनानंतर, शिकंदर बादशहानें त्याच्या जागीं युदेमोसची नेमणूक केली. परंतु त्याच्याजवळ फौज थोडी असल्या-कारणानें त्याच्यानें राज्याचा बंदोबस्त करवेना. तो कसातरी ३४७ सालापर्यंत हिंदुस्थानांत राहून इराणांत निघून गेला. जातांना पोरसराजाचा विश्वासघातानें प्राण घेऊन, तो त्याचे १२० हत्ती घेऊन गेला.

सिंध प्रांतावर शिकंदरानें पिथोनची नेमणूक केली होती; त्याला ही लवकरच सिंधु नदाच्या पश्चिमेस जावें लागलें. ह्याप्रमाणें शिकंदराचे मरणानंतर लवकरच सिंधु नदाच्या पूर्वेकडील प्रांतावरची लोकांची ग्रीक सत्ता अजीबाद नाहींशी झाली. (इ० स० पूर्वी ३२२)

अशा संधीस चंद्रगुप्त या नांवाचा एक धाडसी पुरुष उदयास आला. हा मगध देशाच्या नंदवंशापैकीं एक होता. परंतु मुरा नांवाची त्याची आई नीच कुळांतली होती. मगध देशाचा राजा महा-पद्मनंद याची चंद्रगुप्तावर इतराजी झाल्याकारणानें, त्याला देश सोडून पंजाबप्रांताकडे जावें लागलें. तिकडे त्यानें कांहीं लोकांचा जमाव करून पंजाबप्रांत काबीज केला. तेथून आपली विजयी फौज घेऊन मगध देशाच्या राज्यावर त्यानें स्वारी केली, व त्याचा पराभव करून त्याला व त्याच्या बहुतेक लोकांना ठार करून आपण पाटलीपुत्राची गादी बळकाविली. नंदवंशाचें सर्व सैन्य म्हणजे सहा लक्ष पायदळ, तीस हजार घोडेस्वार, नऊ हजार हत्ती व पुष्कळ रथ त्याच्या ताब्यांत आले. त्यानें नर्मदा

नदीपर्यंत सर्व मुलूख जिंकला व त्याचें राज्य बंगालच्या आखातापासून आरबीसमुद्रापर्यंत एकछत्री झालें.

ह्या सुमारास मध्य व पश्चिम आशियाखंडांत शिकंदर बादशहाचे सेनापति आंटिगोनस व सेल्युकस यांच्यामध्यें तंटे होऊन त्यांत सेल्युकसला जय मिळाला. (३१२) सल्युकसच्या मनांत शिकंदरबादशहाप्रमाणें, आपणही हिंदुस्थानावर स्वारी करून तो देश जिंकावा असें आलें. म्हणून तो ३०९ सालीं सिंधु नदी उतरून अलीकडे आला. चंद्रगुप्ताची व त्याची लढाई होऊन सेल्यूकसचा पूर्ण पराभव झाला, व त्याला परत जावें लागलें. इतकेंच नव्हे, तर त्याला आपल्या प्रांतांपैकीं, पारोपनीसदी, आरिया व आराचेशिया हे प्रांत चंद्रगुप्तास द्यावे लागले. ह्या प्रांतांच्या काबुल, हिरात व कंदाहार ह्या अनुक्रमें राजधान्या होत्या. ह्यांशिवाय चंद्रगुप्तास त्यानें आपली मुलगी ही दिली. (३०३). ह्याप्रमाणें दोन हजार वर्षांपूर्वी चंद्रगुप्तानें ‘ शास्त्रीयसरहद्दीच्या ’ प्रश्नाचा निकाल करून टाकला होता. अशा प्रकारें चंद्रगुप्त हिंदुस्थानांत पहिला सार्वभौम राजा झाला. तो २०७ सालीं मृत्यु पावला.

त्याच्या कारकीर्दींत एक मोठी महत्त्वाची गोष्ट झाली. ती ही कीं, सेल्यूकसनें चंद्रगुप्ताच्या दरबारांत मेगॅस्थिनीज नांवाचा वकील नेमला. तो पाटलीपुत्र राजधानींत बरेच दिवस राहिला. त्यानें हिंदुस्थानची राजकीय व सामाजिक स्थिति चौकसपणानें निरीक्षण केली व त्याचे लेखावरून त्या वेळच्या स्थितीचें आपणांस चांगलें ज्ञान होतें. पाटलीपुत्र नगराची लांबी सुमारें नऊ मैल होती. सभोंवार लाकडांचा मजबूत तट होता. त्याला चौसष्ट वेशी असून पांचशें सत्तर बुरूज होते. व त्यांच्या भोंवतालीं विस्तीर्ण खोल खंदक असून तो शोणनदाच्या पाण्यानें नेहमीं भरलेला असे. राज-

वाडा भव्य व प्रशस्त होता. त्याच्या खांबांस सोन्याचा मुलामा असून, त्यांवर सोन्याचे द्राक्षवेल व त्यांवर चांदीचे पक्षी कोरलेले होते. सभोंवार विस्तीर्ण बागा होत्या व त्यांत पुष्कळ कारंजीं व हौद असून त्यांत नाना प्रकारचे मासे ठेवलेले असत. राजवाड्यांतील सामान चांदी–सोन्याचें होतें. दोन दोन, तीन तीन, हात रुंदीचीं सोन्याचीं ताटें होतीं. कुशल नक्षी केलेलीं मेजें व खुर्च्या होत्या. भरजरीचे मोठमोठाले झगे होते. राजाची स्वारी जाण्याची पालखी सोन्याची होती व तिला मोत्यांचे घोंस लावलेले होते. दूरचा प्रवास करितांना हत्तीवर सोन्याच्या हौदांत बसून राजा प्रवासास जात असे. हत्तींच्या, गेंड्यांच्या, पोळांच्या व एडक्यांच्या टकरांचे खेळ नेहमीं होत असत. मल्लांच्या कुस्त्या, घोड्यांच्या व बैलांच्या रथांच्या शर्यती होत असत. राजाची मुख्य करमणूक म्हणजे शिकार असे. शिकारीस जातांना राजाच्या संरक्षणाकरितां बरोबर सशस्त्र स्त्रिया असत. दिवसांतून एकदां तरी राजा खुल्या दरबारांत बसत असे. त्या वेळेस लोकांचे अर्ज घेऊन तो स्वतः त्याचा निकाल करीत असे.

चंद्रगुप्ताची फौज मेगॅस्थिनीच्या वेळेस एकंदर सहा लक्ष नव्वद हजार होती. त्यांत नऊ हजार हत्ती व आठ हजार रथ होते. दर एक हत्तीवर माहुताशिवाय तिघे तिरंदाज असत. रथ दोन घोड्यांचे अगर चार घोड्यांचे असत. दरएक रथावर सारथ्याशिवाय दोघे लढणारे शिपाई असत तेव्हां नऊ हजार हत्ती म्हणजे छत्तीस हजार लोक झाले व आठ हजार रथ म्हणजे चोव्वीस हजार माणसें झालीं. एकंदर फौजेंत सहा लक्ष पायदळ, तीस हजार घोडेस्वार, छत्तीस हजार हत्तीवरील लोक व रथावरील चोवीस हजार लोक मिळून सहा लक्ष नव्वद हजार फौज होती. ह्या फौजे-

चा बंदोबस्त करण्याकरितां वेगवेगळीं सहा खातीं होतीं व त्यांवर एकंदर तीस अंमलदार होते.

पाटलीपुत्र नगराकरितां शहरसुधराई खातें होतें; त्यांतही तीस अमलदार होते. दर एक खात्यास पांच सभासद याप्रमाणें सहा खातीं होतीं.

पहिल्या खात्याकडे उद्योगधंद्याची व्यवस्था लावण्याचें काम असे. मजूरांच्या मजूरीचे दर ठरविणें व माल चांगला आहे कीं नाहीं हेंही पाहण्याचें काम याच खात्याकडे होतें. कामकरी माणसाचे हातास किंवा डोळ्यांस इजा करण्याचे गुन्ह्याबद्दल देहांत शिक्षा होती.

दुसऱ्या खात्याकडे परदेशीय लोकांची व्यवस्था पाहण्याचें काम होतें. त्यांच्या राहण्याची, तैनातींची व औषधपाण्याची व्यवस्था या खात्याकडून होत असे. मृत मनुष्याचें दफन करणें, त्याची मालमत्ता त्याच्या वारसाकडे पाठविणें हीं कामेंही याच खात्याकडून होत असत.

तिसरें खातें जन्ममृत्यूची नोंद करण्याचें होतें. सरकारास आपल्या प्रजेची माहिती मिळावी, व कर बसविण्याचे कामीं सोय व्हावी, म्हणून हें खातें काढलें होतें. ब्रिटिश राज्यांतसुद्धां या विषयाकडे राज्यकर्त्यांचें लक्ष्य लागल्यास फार दिवस झाले नाहींत; व देशी संस्थानांपैकीं पुष्कळ संस्थानांचें लक्ष अद्यापही त्या गोष्टीकडे पोहोंचलें नाहीं. ही गोष्ट ध्यानांत ठेविली म्हणजे इतक्या प्राचीनकाळीं चंद्रगुप्तानें या गोष्टीकडे लक्ष पोचविलें हें मोठें आश्चर्यकारक वाटल्यावांचून राहणार नाहीं.

चवथें खातें व्यापाराचें होतें. शिक्के मारलेलीं वजनें व मापें वापरलीं जात कीं नाहीं हें पहाणें, व्यापाऱ्यांना परवाने देणें वगैरे गोष्टींची व्यवस्था या खात्याकडून होत असे.

कारखान्यांवर देखरेख करण्याकरितां पांचवें खातें होतें. नव्या व जुन्या मालाची निवड करून योग्य कर बसविण्याचें काम या खात्याकडे होतें.

सहावे खात्याचें काम, विकलेल्या मालाच्या किमतीचा दहावा हिस्सा कर म्हणून घ्यावयाचा हें असे. बाजार, देवळें, बंदरें वगैरेंचा बंदोबस्त करण्याचें कामही शहरसुधराईखात्याकडेच असे. तक्ष-शिला व उज्जनी यासारख्या मोठमोठ्या शहरांत पाटलीपुत्रासा-रखीच व्यवस्था होती.

मेगेस्थिनीजनें लिहिलें आहे कीं, मी चंद्रगुप्ताच्या छावणींत असतांना तेथें सुमारें चार लक्ष लोक होते. परंतु कोणत्याही दि-वशीं ऐंशी रुपयांपेक्षां जास्त चोरी झाली नाहीं. गुन्हेगारांना शिक्षा फार कडक होत असत. खोटी साक्ष देण्याबद्दल हाताचीं व पायाचीं बोटें तोडीत असत. पवित्र मानलेल्या झाडांस इजा करण्याचे गुन्ह्याबद्दल, विकलेल्या मालावरील जकात चुकविण्याचे गुन्ह्याबद्दल, व राजाची स्वारी शिकारीस चालली असतांना हरकत करण्याचे गुन्ह्याबद्दल, देहान्त शिक्षा देत असे.

जमिनीच्या उत्पन्नापैकीं, चौथा हिस्सा राजास द्यावा लागत असे. लढाईचें काम क्षत्रिय जातीच्या लोकांकडे असल्यामुळें, कृषि-कर्म करणाऱ्या लोकांना लढाईवर जावें लागत नसे, व शेजारीं मोठी लढाई चालली असतांनाहि शेतकरी लोक बिन हरकत आपलीं कामें करीत असत. याचें मेगॅस्थिनीलाज मोठें आश्चर्य वाटलें.

हिंदुस्थानासारख्या देशांत तलाव वगैरे बांधून पाणी सांठवून ठेवणें, व शेताच्या कामास व पिण्यास त्याचा उपयोग करणें या गोष्टीचें महत्त्व फार आहे. चंद्रगुप्त राजानें याकारतां स्वतंत्र खास खातें ठेविलें होतें. त्या खात्याकडून जमिनी मोजल्या जात होत्या

व पाणी सोडण्याकरितां दरवाजाचा वगैरे बंदोबस्त होत असे. सुदर्शन नावाचा तलाव काठेवाडांत गिरनार पर्वताच्या शेजारीं बांधला होता. चंद्रगुप्ताचा मेहुणा पश्चिम पश्चिम प्रांताचा प्रतिनिधि होता. त्यानें गिरनार किल्याच्या पूर्व बाजूस एका ओढ्याचें पाणी आडवून बंधारा बांधला होता. त्याला लागणारे जरूर ते पाणी आणण्याचे पाट पुढें अशोक राजाच्या कारकीर्दींत तुशास्फ नांवाच्या सुभ्यानें केले. हा तलाव चारशें वर्षे पर्यंत टिकला. पुढें तो इं. स. १५० व्या वर्षीं मोठा जलप्रलय होऊन पडून गेला. पुनः तो शक क्षत्रप रुद्रदामा यानें बांधला, परंतु तोहि पुढें पडून गेला. याबद्दलचा लेख गिरनारच्या माथ्यावर आहे. ज्योतिषी, तत्त्ववेत्ते, याज्ञिक वगैरे लोकांना सरकारांतून नेमणुका असत. त्यांचे सिद्धांत खरेखोटे होतील त्याप्रमाणें बक्षिसें व शासनें मिळत असत. कारागीर लोक, जहाजें करणारे लोक ह्यांना सरकारांतून पगार असत. घोडे, हत्ती वगैरे वापरण्याची परवानगी लागत असे. रस्ते दुरुस्तीच्या कामावर योग्य अधिकारी नेमले जात असत. दर एक अर्धा कोशावर रस्त्यावर खांब असत. पाटलीपुत्रापासून वायव्य सरहद्दीपावेतों एक हजार मैलांचा मोठा रहदारीचा रस्ता बांधलेला होता.

ह्या सर्व गोष्टींवरून शिकंदर बादशहाच्या स्वारीच्या वेळेस उत्तर हिंदुस्थानांत किती सुधारणा झालेली होती, हें ध्यानांत येईल. चंद्रगुप्तांच्या वेळेस झाडांच्या सालीं वर व कापडांवर लिहिण्याची वहिवाट होती.

आजपावेतों मौर्य घराण्याची माहिती ग्रीक लोकांचे लेखांवरून कायती मिळण्यासारखी होती. परंतु अलीकडे चाणक्याकृत राजनीति ऊर्फ अर्थशास्त्र हा ग्रंथ उपलब्ध झाला आहे. त्याचें भाषांतर

मि. आर. शामशास्त्री[1] बी. ए. यांनीं केलें आहे. हा ग्रंथ मौर्य साम्राज्य स्थापन होण्यापूर्वीं लिहिला आहे. तो इतर प्राचीन ग्रंथकारांचे आधार घेऊन लिहिला आहे. त्यांतील नीतीचे कांहीं कांहीं दाखले पुढें दिले आहेत. राजास सल्लामसलत देण्याकरितां, बारा अगर सोळा प्रधानांचें मंडळ असे. राजाचा अधिकार अनियंत्रित असे. परंतु ब्राह्मणांचे अभिप्रायास तो मान देत असे. राजद्रोहाशिवाय ब्राह्मणांना देहान्त शिक्षा नसे. दुसऱ्या गुन्ह्याबद्दल त्यांना तोंडावर डाग देऊन हद्दपार करण्याची अथवा जन्मभर खाणीवर काम करण्याची शिक्षा असे.

शेजारच्या राजांशीं सख्य असणें अशक्य असल्यामुळें, जो बळवान असेल त्यानें लढाई करून दुसऱ्यास जिंकावें, कारण बलाशिवाय सुरक्षितपणा मिळणें शक्य नाहीं. राजकारणांत बलाशिवाय दुसरी नीति नाहीं. भेद व युक्ति ह्या राजकरणांत अवश्य आहेत. म्हणून राजानें हेर लोकांची सर्व कामांत फार मदत घ्यावयास पाहिजे.

**गुप्तहेर**—कसबिणीचा धंदा करणाऱ्या स्त्रियांचा उपयोग गुप्तहेरांचे काम करण्याकडे केला जात असे, व त्यासंबंधानें पुष्कळ नियम केलेले आढळतात. गुप्त बातम्या आणणाऱ्यांना फारच मुभा असे. या रीतीनें राज्याचे उपयोगी पडणाऱ्या माणसांना फार सवलती असत.

**विक्रीवरील कर**—तटबंदीच्या शहरांत मालाच्या विक्रीप्रमाणें कर घेतला जात असे. धान्य, गुरें व आणखी कांहीं जिनसा शिवाय करून सर्व जिनसा जकातीचे नाक्यावर विकाव्या लागत असत. परगांवचे आयात मालावर शेंकडा वीस टक्के कर असे. माळवें व भाजीपाला यांवर शेंकडा साडे सोळा टक्के कर असे. पुष्कळ जिनसांवर

१ हे एक म्हैसूरचे विद्वान पंडित असून त्यांनीं चाणक्याचे अर्थशास्त्राचें भाषांतर केलें आहे. ते हल्लीं बंगलोर एथें प्रोफेसर आहेत.

शेंकडा चार ते दहा टक्के कर होता. जडजवाहिरावरील करांचे विशेष दर असत.

**खानेसुमारी खातें**—नागरक नांवाचा अधिकारी असे, त्याचें काम त्याच्या हद्दींत जीं माणसें येतील जातील त्यांची नोंद करण्याचें होतें. शिवाय दर एक मनुष्याची जात, नांव, आडनांव, धंदा, उत्पन्न, गुरें, खर्च, स्त्री अगर पुरुष ही माहिती ठेवण्याचें त्याचें काम होतें. खोटी माहिती देण्याबद्दल शिक्षा चोरीचे गुन्ह्याप्रमाणें एखादा अवयव तोडणें ही होती.

मद्य विकण्यास परवाने लागत असत. परदेशांतून येणाऱ्या मद्यावर विशेष कर असत. दारूचे दुकानांत गिऱ्हाइकास बसण्यास पलंग, खुर्च्या, वगैरे सोयी कराव्या लागत असत. ऋतुमानाप्रमाणें शेगड्या, पंखे, सुवासिक फुलें, अत्तरें वगैरेसुद्धां ठेवावीं लागत असत.

राजानें आपलें काम फार दक्षतेनें केलें पाहिजे. त्याला विसावा फारच थोडा मिळणें शक्य आहे. देवांचें, ब्राह्मणांचें, क्षेत्रांचें, अज्ञानांचें, वृद्धांचें, स्त्रियांचें, दुःखितांचें व निराश्रितांचें काम त्यानें स्वतः पाहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें धर्माविरुद्ध आचरण करणाऱ्या लोकांवर स्वतः नजर ठेविली पाहिजे.

राज्यव्यवस्थेकरितां अठरा वेगवेगळीं खातीं करावीं. दरएक खात्यावर एक वरिष्ठ अधिकारी असावा.

या ग्रंथांत पगारांचे दर दिलेले आहेत. युवराजांचें वेतन दरसाल अठ्ठेचाळीस हजार रौप्यपण असावें. मजुरांचें वेतन दर साल साठ पण असावें. एक रौप्य पण म्हणजे सुमारें बारा आणे होतात.

राजानें राज्याचे निधीकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

शेतकी खात्याचे अधिकाऱ्याचें काम सांप्रतचे मोजणीच्या व

प्रतबंदीच्या अधिकाऱ्याचे कामासारखेंच होतें. बागाईत व जिराईत जमिनींवर त्यांच्या मगदुराप्रमाणें सारा ठरविण्यांत येत होता. शेतसाऱ्याशिवाय दुसरे पुष्कळ कर होते. शेताचे उत्पन्नापैकीं राजानें एक चतुर्थांश भाग घ्यावा.

लोकांच्या हिताकरितां जो मनुष्य राजाच्या स्वाधीन बहुत संपत्ति करील, त्याला राजानें मानाच्या पदव्या द्याव्या.

राजाचें काम दुष्टास शासन करणें हें आहे. ह्या शिक्षा फारजबर असत. उदाहरणार्थ, आठ किंवा दहा पणांची चोरी राज्यांतील नोकरानें केल्यास त्यास देहान्त शिक्षा सांगितली आहे. चाळीस किंवा पन्नास पणांची चोरी इतर माणसानें केल्यास, त्यास देहान्त शिक्षा असे. कबूल जबाब घेण्याकरितां गुन्हेगाराला मारहाण करणें सशास्त्र मानलें आहे.

याप्रमाणें चाणक्यानें केलेल्या आर्थशास्त्रांतील कांहीं कांहीं नियम आहेत. यावरून त्या वेळचें राज्यव्यवस्थेचें स्वरूप चांगले समजण्यासारखें आहे.

चंद्रगुप्तानें एकंदर चोवीस वर्षें राज्य केलें. त्या मुदतींत त्यानें ग्रीक लोकांचीं ठाणीं हिंदुस्थानांतून काढून टाकिलीं; सेल्यूकसचा पूर्ण पराभव केला; आपलें राज्य पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत स्थिरस्थावर केलें; प्रचंड सेना स्थापन केली; व एवढ्या मोठ्या राज्याची अंतर्व्यवस्था उत्तम केली. हीं कृत्यें कोणत्याही राजास भूषणास्पद होण्यासारखीं आहेत. ह्या सुधारणा ग्रीक लोकांपासून हिंदूंनीं घेतल्या असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. शिकंदर बादशहा हिंदुस्थानांत फारच थोडा वेळ होता व तोही काळ लढाईचा व धामधुमीचा होता. हिंदुस्थानांतच प्राचीन काळीं राज्यव्यवस्थेचे दाखले होते.

चंद्रगुप्त २९७ सालीं मृत्यू पावला. जैन लोकांत अशी दंत-

कथा आहे कीं, चंद्रगुप्त मौर्य हा जैन होता व त्याचे कारकीर्दींत जेव्हां बारा वर्षांचा दुष्काळ पडला तेव्हां तो आपलें राज्य सोडून, भद्रबाहु नावाचे साधूबरोबर दक्षिणप्रांतांत गेला व तो यति होऊन श्रवणबेळगोल नांवाचे म्हैसूरप्रांतांतील गांवीं राहिला. आणि शेवटीं त्यानें अन्न वर्ज्य करून प्राणत्याग केला.

चंद्रगुप्ताच्या मागून त्याचा मुलगा बिंदुसार हा त्याचे गादीवर बसला. त्याला अमित्रघात असें म्हणत असत. त्याच्या दरबारीं मेगॅस्थिनीजच्याजागीं डिईमेकास नांवाचा वकील नेमला. सेल्यूकसच्या मरणानंतर त्याचा मुलगा आंटिओकस सोटर हा त्याच्या गादीवर बसला. बिंदुसार व सोटर ह्यांच्या दरम्यान बरीच दोस्ती होती असें दिसतें. बिंदुसारानें आंटिओकसला इराणांतील अंजीर व द्राक्षासव पाठवून देण्याबद्दल लिहिलें, व तिकडील एक विद्वान अध्यापक विकत घेऊन पाठवून देण्याची विनंति केली. आंटिओकसनें अंजीर व दारू पाठवून दिली, परंतु विद्वान मनुष्यासंबंधानें लिहिलें कीं, असा मनुष्य विकणें ग्रीस देशाच्या कायद्याविरुद्ध आहे सबब तसें करितां येत नाहीं.

बिंदुसाराचें राज्य पंचवीस वर्षें चाललें. त्यानें दक्षिण देशाचा कांहीं भाग काबीज केला असावा असें दिसतें.

इजिप्तचा राजा टालेमी फिलाडेलफॉस ह्याच्याकडून डायोनिशियस नांवाचा वकील मगध देशाच्या राजाकडे पाठविण्यांत आला होता. परंतु तो अशोक राजाच्या वेळेस किंवा बिंदुसारराजाच्या वेळेस आला होता हें निश्चयात्मक समजत नाहीं.

---

# भाग ५ वा.

——:०:——

## अशोकवर्धन ऊर्फ अशोक.

बिंदुसार ख्रि. पू. २७२ वे वर्षीं मरण पावला व त्याचा मुलगा अशोक हा त्याच्या गादीवर आला. परंतु राज्यारोहण विधि पुढें तीन वर्षांनीं झाला. बिंदुसाराच्या हयातींत अशोक हा वायव्य प्रांताचा प्रतिनिधि होता. त्यानंतर पुढें बिंदुसाराच्या मरणापूर्वी तो कांहीं दिवस पश्चिम हिंदुस्थानचा प्रतिनिधि झाला होता. त्याच्या लायकीवरून व कर्तबगारीवरून बिंदुसारानें त्यास युवराज केलें होतें. वायव्य प्रांताची राजधानी तक्षशिला होती. हें शहर सांप्रतच्या हसन अबदाल व रावळपिंडी ह्या दोन शहरांच्या जवळ होतें. मध्य एशियांतून हिंदुस्थानांत शिरण्याचा जो राजरस्ता आहे त्याच्या तोंडाशींच असल्याकारणानें तें फार महत्त्वाचें ठाणें होतें. परंतु त्याचें विशेष महत्त्व हें होतें कीं, तें विद्या शिकण्याचें एक प्रसिद्ध पीठ होतें. राजेरजवाडे, ब्राह्मण व वैश्य यांचीं मुलें अभ्यासाकरितां तेथें येत असत. त्याच्या आसपासचा प्रांत सुपीक व भरभराटीच्या स्थितींत होता. त्याप्रमाणें पश्चिम हिंदुस्थानची राजधानी, उज्जनी, हेंही शहर विद्येविषयीं नामांकित होतें. अशोक राजाला याप्रमाणें विद्या शिकण्याचीं अपूर्व साधनें मिळालीं होतीं. त्याच्या चाळीस वर्षांच्या कारकीर्दींत फक्त एकच लढाई झाली. ती २६१ या सालांत कलिंग देशाच्या राजाशीं झाली. हा कलिंग देश बंगालच्या किनाऱ्यावर महानदीपासून गोदावरी नदीपर्यंत होता. त्या राजाजवळ साठ हजार पायदळ, एक हजार घोडेस्वार व सातशें लढाऊ हत्ती इतकें सैन्य होतें. लढाई इतकी

निकराची झाली कीं, त्यांत एक लक्ष लोक प्राणास मुकले, दीड लक्ष लोक कैदी केले व लक्षावधि लढाईपासून उद्भवणारे साथीचे रोग, उपासमार वगैरे कारणांनीं मृत्युमुखीं पडले. ह्या लढाईंत दृष्टीस पडलेल्या हालअपेष्टांमुळें, अशोक राजास फार वाईट वाटलें. ही सर्व दैना होण्यास मी कारण आहें, ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागून राहिली. तेव्हांपासून लढाई करून मानव प्राण्यांवर असा दुःखाचा प्रसंग पुनः कधींहि न आणण्याचा त्यानें निश्चय केला. ह्या लढाईनंतर चार वर्षांनीं त्यानें जें राजशासन प्रसिद्ध केलें त्यांत असें लिहिलें आहे कीं, या लढाईंत जितके लोक मारले गेले त्यांच्या शतांश किंवा सहस्रांश जरी प्राणहानि होईल तरी सुद्धां आह्मांस फार वाईट वाटेल. याच सुमाराला अशोक राजाचें मन बौद्ध धर्माकडे वळूं लागलें, व दिवसेंदिवस बौद्ध मतांचा परिणाम मनावर अधिकाधिक दृढ होत चालला. त्याच्या तेराव्या शिलालेखांत असें लिहिलें आहे कीं, लढाई करून राज्य वाढवावें हें राजाचें कर्तव्य आहे, ही समजूत माझ्या वंशजांनीं आपल्या मनांतून समूळ काढून टाकावी. मुख्य विजय म्हणजे धर्मानें आचरण करणें हा होय. ह्या वेळेपासून अशोकानें आपल्या प्रचंड राज्यांत धर्माचरणाचा प्रसार करण्याचा निश्चय केला. आपल्या अमर्यादित अधिकाराचा सर्व उपयोग तो एका गोष्टीकडे करूं लागला. त्यानें आपल्या राज्याच्या १६ व्या व १७ व्या वर्षीं आपल्या राज्यांत मोठमोठ्या चौदा शिलांवर राज-

१ प्लुटार्कनें ट्रेजन बादशहास जें पत्र लिहिलें आहे त्यांत त्यानें याचप्रमाणें उपदेश केला आहे. तो म्हणतो, "राज्याचा आरंभ आपल्या हृदयापासून केला पाहिजे. प्रथम आपल्या मनोवृत्तीवर जय मिळविला पाहिजे. आपण आपल्या आचरणाचें अंतिम ध्येय सदाचार हें ठेवाल तर बाकीचें सर्व व्यवस्थेनें चालेल."

शासनें प्रसिद्ध केलीं. त्यांत त्यानें आपलें राज्य कोणत्या तत्त्वावर चालवावयाचें हें जाहीर केलें.

कलिंग प्रांत जिंकला त्या वेळीं, त्या प्रांताचें राज्य चालविण्याचीं तत्त्वें, दोन शिलालेखांवर खोदून जाहीर केलीं. गया क्षेत्राजवळील बराबर टेकडीवरील दोन तीन गुहांमध्यें लेख आहेत. त्यांत त्या गुहांतील घरें आजीविक नांवाच्या साधु लोकांस दिल्याचें लिहिलें आहे. तराई येथें मोठमोठ्या दोन स्तंभांवर लेख आहेत. त्यांत अशोकाच्या यात्रेचें वर्णन दिलें आहे. याशिवाय आणखी पुष्कळ स्तंभांवर लेख आहेत. दुसरे लहान लहान शिलालेख आहेत. त्यापैकीं एकावरून गौतम बुद्धाच्या मृत्यूचें साल ख्रि. पूर्वीं ४८७ असल्याचें नक्की होतें. रजपुतस्थानाच्या पर्वतांतील अगदीं एका बाजूस असलेल्या एका मठांतील लेखांत अशोक राजा असें जाहीर करतो कीं, धर्माचरणाच्या ज्या आज्ञा मी प्रसिद्ध केल्या आहेत त्या पाळणें हें गृहस्थ, भिक्षुक, यति, पुरुष व स्त्रिया या सर्वांचें कर्तव्य आहेच. परंतु प्रभु बुद्धाच्या आज्ञा सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेत. ख्रि. पू. २४९ व्या वर्षीं अशोक तीर्थयात्रेस निघाला. पाटलिपुत्राहून उत्तर दिशेस हिमालय पर्वताच्या पायथ्याजवळ तो आला. त्याचा हा मार्ग त्यानें स्थापन केलेल्या एका प्रचंड पाषाणाचे सांभावरून निश्चित होतो. तेथून तो पश्चिम दिशेस वळला, व बुद्धाचें जन्मस्थान जें लुंबिनी उद्यान तेथें तो आला. तें स्थान त्याला त्याचा गुरु उपगुप्त ह्यानें दाखविलें. तेथें अशोकानें एक स्तंभ स्थापन केला. त्यावरील लेख अद्याप पावेतों स्पष्ट वाचण्यासारखा आहे. तेथून तो बुद्धाचें बाळपणाचें स्थान जें कपिलवस्तु तेथें गेला. तेथून काशीजवळ सारनाथ गांवास गेला. तेथें बुद्धानें आपल्या उपदेशास आरंभ केला. पुढें जेथें बुद्ध फार दिवस राहिला होता त्या श्रावस्ती नगरीं तो आला; तेथून गयेंतील बोधिवृक्षाच्या दर्शनास

आला. या ठिकाणीं बुद्धास आत्मसाक्षात्कार झाला होता. शेवटीं नेपाळांतील कुशी नगरास आला. तेथें बुद्धाच्या अवताराची समाप्ति झाली. २४२ व्या वर्षीं अशोकानें आपले सर्व कायदे एकत्र केले. व प्राण्यांची हिंसा बंद करण्याचे सक्त निर्बंध प्रसिद्ध केले. पुढें दोन वर्षांनीं अशोकराजानें संन्यासाचीं वस्त्रें धारण केलीं व त्यानें जरी राज्य सोडलें नाहीं, तथापि राज्यकारभार आपले प्रधान व युवराज यांचे हातीं दिला. पुढें तो मगध देशाची प्राचीन राजधानी राजगृह येथें २३२ किंवा २३१ व्या सालीं मृत्यू पावला. आपल्या कारकीर्दीच्या शेवटच्या दहा सालांत केव्हां तरी पाटलिपुत्र येथें बौद्ध धर्माची परिषद त्यानें भरविली असावी.

अशोकाचें राज्य वायव्येस हिंदुकुश पर्वतापर्यंत होतें व त्यांत अफगाणिस्थान, बलुचिस्थान, व सिंध यांचा समावेश होत होता. काश्मीर प्रांतांत त्यानें श्रीनगर नांवाची नवी राजधानी स्थापन केली. नेपाळांत जुनी राजधानी मंजुपत्तन नांवाची होती, ती बदलून ललिपतन अथवा ललितपुर नांवाची नवी राजधानी स्थापन केली. तें गांव अद्याप आहे. तो नेपाळांत तीर्थयात्रेस गेला होता. तेव्हां त्याच्या बरोबर त्याची मुलगी चारुमति ही होती. अशोक राजा परत आला तेव्हां ती तेथेंच राहिली. तिनें आपला नवरा देवपाळ क्षत्रिय ह्याचें स्मारक म्हणून देवगण शहर स्थापन केलें. व ती स्वतः पशुपतिनाथाच्या उत्तरेस एक मठ बांधून जोगीण होऊन राहिली. त्या मठास तिचें नांव अद्याप चालत आहे. पूर्वेस त्याच्या राज्यांत बंगाल व कलिंग प्रांतांचा समावेश होत होता. आग्नेयी दिशेस पेनार नदीपर्यंत त्याच्या राज्याचा विस्तार होता. दक्षिणेस चोल व पाण्डय यांचे राज्यांपर्यंत अशाकाचे राज्याचा विस्तार होता. अशोक राजाचें लक्ष इमारती बांधण्याकडे फार होतें. त्यानें पुष्कळ भव्य मठ बांधले व शिवाय पुष्कळ स्तूप बांधले. त्यांपैकीं

मध्य हिंदुस्थानांतील साची येथील स्तूप मात्र कायम आहेत. पांचव्या शतकांत चिनी प्रवाशी फाहिएन पाटलिपुत्रास आला, तेव्हां अशोक राजाचा वाडा कायम होता, व त्याला तो इतका अलौकिक वाटला कीं, तो बांधण्यास राजानें यक्षादिक अमानुष पुरुषांची योजना केली असावी, असें तो म्हणाला. अशोकानें एका शिलेचे उभारलेले स्तंभांपैकीं कांहीं ५० फूट उंच असून एकेकाचें वजन ५० टन आहे. अशोकाचे खोदीव लेख हिमालयापासून म्हैसुरापर्यंत व बंगालच्या उपसागरापासून आरबी समुद्रापर्यंत आहेत. ते पाली भाषेंत लिहिले आहेत व रहदारीच्या तीर्थ यात्रेच्या रस्त्यांवर ठेविलेले आहेत. ह्यावरून त्याचा हेतु ते लेख सर्वांनीं वांचावे असा होता हें सिद्ध होतें. दोन लेखांशिवाय सर्व लेखांची लिपि ब्राह्मणी आहे. वायव्य सरहद्दीवरील दोन लेखांची लिपी मात्र खरोष्टी आहे. आपल्या प्रजेची नैतिक उन्नति करणें हें राजाचें मुख्य कर्तव्य आहे, ह्या तत्वाचें अवलंबन अशोकराजाइतकें, पृथ्वीवरील कलियुगांतील राजांपैकीं, फारच थोड्यांनीं केलें असेल. त्यानें आपल्या प्रजाजनांमध्यें मुख्यत्वेंकरून तीन तत्त्वांचा प्रसार करण्याचा मनापासून प्रयत्न केला. हीं तीन तत्त्वें म्हणजे ( १ ) प्राणि मात्रांवर दया करणें, ( २ ) वाडवडिलांचा व गुरुजनांचा मान राखणें, ( ३ ) सत्याचार हीं होत. त्याच्या बहुतेक शिलालेखांत ह्या

---

१ हिंदुस्थानांतील प्राचीन शिलालेख विद्वान संशोधकांचे दृष्टीस प्रथम पडले, तेव्हां त्या लेखांच्या दोन लिपी होत्या असें नजरेस आलें. एक ब्राह्मी व दुसरी खरोष्टी. ब्राह्मी बहुधा डावीकडून उजवीकडे लिहिलेली असे. खरोष्टी उजवीकडून डावीकडे लिहिलेली असे. खरोष्टी लिपी अफगाणिस्तान व पंजाब या प्रांतांत प्रचलित असे. दोन्ही लिपी फिनीशियन तऱ्हेच्या मूळच्या असाव्यात. खरोष्टी हिंदुस्थानांतून इ०स०चे तिसऱ्या शतकांत नाहींशी झाली. (रॅपसन्स एनशन्ट इंडिया; पृष्ठ १७ व १८)

तीन आज्ञा प्रसिद्ध केल्या आहेत. हिंदी आर्यांच्या धर्मात पुनर्जन्माचें तत्व फार प्राचीन काळापासून प्रचलित असल्या कारणानें किडामुंगीच्या जिवास सुद्धां त्यांच्या दृष्टीनें महत्त्व आहे. कालांतरानें ह्या किडेमुंग्या मनुष्य अथवा देव होऊं शकतील व उलट देव अथवा मनुष्य आपल्या कर्माप्रमाणें किड्यामुंग्यांच्या जन्मास येईल. ह्या तत्वाचा एक विपरित परिणाम कधीं कधीं असा होई कीं,इतर प्राण्यांचा प्राण घेण्याबद्दल किंवा मांसभक्षणाबद्दल मनुष्यास देहान्त शिक्षा देण्यांत येई. अशोकानें या शिक्षेंत एवढाच बदल केला कीं, मरणापूर्वी गुन्हेगारांस पश्चात्ताप व प्रार्थना करण्याकरितां तीन दिवसांची मुदत त्यानें दिली.

पूर्ववयांत अशोक शिवभक्त होता. त्या वेळेस राजवाड्यांतील लोकांकरितां हजारों प्राण्यांचा दररोज वध होत असे. पुढें त्याच्यावर बौद्धमतांचा परिणाम ज्यास्त झाला, तेव्हां फक्त दोन मोर व हरिण एवढे मात्र मारण्यांत येत असत. शेवटीं २५७ सालीं हाही वध बंद झाला, असें रा. देवदत्त भांडारकर यांच्या लिहिण्यावरून समजतें, पूर्वींच्या राजांचा जो शिकारीचा एक मोठा समारंभ होत असे तोही अशोकानें ख्रि०पू० २५९ वे वर्षीं बंद केला. २४३ सालीं पशुवधाच्या संबंधानें त्यानें सक्त नियम केले. वर्षातून ठरलेल्या ५६ दिवसांत पशुवध अजिबात बंद केला. बाकीच्या दिवशीं ज्या लोकांना खाण्याकरितां मांसाची जरूरी आहे अशा लोकांना पशुवध करण्याची परवानगी ठेवली. परंतु त्यासंबंधानें कांहीं कडक नियम ठेवण्यांत आले होते.

परधर्माविषयीं दरएक मनुष्यानें सहानुभूतीचें वर्तन ठेवावें अशाबद्दल बाराव्या शासनांत जाहीर केलें होतें.

दान धर्म करणें हें पुण्याचें काम आहे, परंतु सर्वांत श्रेष्ठ दान म्हणजे धर्मदीक्षा हें आहे, अशी अकराव्या शासनांत राजाज्ञा आहे.

तंत्र व कर्म हीं जरी उपयोगी असलीं तरी दासांस व हाताखालच्या लोकांस मायेनें वागविणें, गुरुजनांस मान देणें, अतिथि–अभ्यागतास भिक्षा घालणें व भूतमात्रावर दया करणें हें ज्यास्त श्रेयस्कर आहे, असें नवव्या शासनांत जाहीर केलें आहे.

ह्या सर्व शासनांची अंमलबजावणी करण्याकरितां खास अधिकारी नेमले होते, व इतर अधिकाऱ्यांना सुद्धा लोकांच्या सभा करून ह्या आज्ञांची समज देण्याकारितां हुकूम होते.

अशोकानंतर राजा हर्षकुमालपाल व काश्मीरचे राजे हे ह्या आज्ञा अमलांत आणण्याकरितां यत्न करीत होते, असें बील व बुल्हर ह्यांच्या लेखांवरून समजतें.

बारावे शतकांत गुजराथ प्रातांचा राजा कुमारपाळ याचाही अहिंसेसंबंधानें फार कटाक्ष होता. एका प्रसंगीं एक उंदीर मारल्यावरून एका व्यापाऱ्यास अन्हिलवाडा येथील न्यायसभेपुढें आणिलें, तेव्हां त्याची सर्व मिळकत जप्त केली व तिचे उत्पन्नांतून एक देऊळ बांधलें. दुसरे प्रसंगीं एका मनुष्यानें शहरांत कच्चें मांस खाण्याकारितां आणलें त्यास तर देहांताशिक्षा झाली.

अशोकाचें दानधर्माचें एक स्वतंत्र खातें होतें. सातव्या स्तंभावरील लेखांत अशोकानें खालीलप्रमाणें लिहिलें आहे:—

" मनुष्याला व जनावराला छाया मिळण्याकरितां वडाचीं झाडें लावलीं आहेत; आंब्याच्या राया लावल्या आहेत; प्रत्येक अर्ध कोशावर विहिरी खोदल्या आहेत; धर्मशाळा बांधल्या आहेत; व मनुष्यांच्या आणि जनावरांच्या सुखाकारितां मधून मधून तलाव व पाट केले आहेत. "

मनुष्याकारितां व जनावरांकारितां ठिकठिकाणीं औषधालयें पांजरपोळ बांधले होते.

लोकांना धर्माचा उपदेश करण्याकरितां, दक्षिण हिंदुस्थान

सिलोन, सीरीया, ईजिप्त, सायरिनी, मॅसिडोनिया व इपायरस ह्या प्रांतांत त्यानें उपदेशक पाठविले. बौद्ध धर्माचे उपदेशाचे क्षेत्रांत तिबेटांतील कांबोज लोक, हिमालयांत राहणारे दुसरे लोक, काबुला-जवळील गंधार व यवन लोक, विंध्याद्रींत व पूर्व किनाऱ्यावरील पर्वतांत राहणारे भोज, पुलिंद वगैरे लोक, तसेच कृष्णा व गोदा-वरी नद्यांचे दरम्यानचे आंध्र लोक यांचा समावेश झाला. पुष्कळ दूरदूरच्या ठिकाणीं त्यानें मठ बांधिले. त्याचा धाकटा भाऊ महेंद्र यानें तंजावर प्रांतांत जो मठ बांधला त्याच्या खुणा पुढें नऊशें वर्षांनीं दिसल्या, असें बीलचें म्हणणें आहे. पुढें ह्याच महेंद्राला आणखी चार शिष्य बरोबर देऊन राजानें सीलोनला पाठविलें. तेथील राजा टिसा यानें व त्याच्या दरबारच्या लोकांनीं बौद्ध धर्म स्वीकारला, व लवकरच त्या धर्माचा प्रसार इतर लोकांत झाला. महेंद्र मरेपावेतों तेथेंच राहिला. तेथें त्याची साधु ह्मणून प्रसिद्धि झाली व त्याच्या शरीराची रक्षा मिहिंतले येथील स्तूपांत ठेविली आहे.

गौतम बुद्धानें बौद्ध धर्माची स्थापना केली खरी, परंतु त्याच्या वेळेस त्याचा प्रसार संकुचित प्रदेशांत मात्र झाला. त्याची मर्यादा गया, प्रयाग व हिमालयपर्यंत एथपर्यंत होती. त्याचा चोहींकडे प्रसार अशोकानें केला, व त्याच्या वेळेपासून तो धर्म जगताच्या बऱ्याच मोठ्या भागाचा धर्म झाला, ज्या कांहीं थोड्या महा-त्म्यांच्या कृतीचा परिणाम, जगताच्या रहाटीला वेगळें वळण लावण्याइतका झाला त्या महात्म्यांच्या कोटींत अशोकाची गणना केली पाहिजे.

अशोकाइतका काम करणारा राजा क्वचितच आढळेल. तरी तो नेहमीं ह्मणे कीं, माझ्या हातून व्हावें तितकें काम होत नाहीं,

याबद्दल मला फार वाईट वाटतें. जगताच्या कल्याणाकरितां मला काम केलेंच पाहिजे असें तो नेहमीं म्हणत असे.

त्याचा मुख्य गुण म्हणजे त्याची खरी निष्ठा. हिंदुस्थान देश नीतिमान कसा होईल या गोष्टीकडे त्याचें मुख्य लक्ष होतें. त्याचें मुख्य ध्येय हेंच होतें. परंतु त्याचें म्हणणें असें होतें कीं, राजा मार्ग दाखवूं शकेल, पण मोक्ष मिळविणें हें प्रत्येक व्यक्तीचें काम आहे. रूपनाथ येथील आज्ञेंत तो म्हणतो " लहानांनीं व मोठ्यांनीं मेहनत केली पाहिजे. फळ मोठ्यांनाच मिळतें असें नाहीं. लहान मनुष्य कर्म करील तर त्यासही मोक्ष मिळेल. "

ह्याप्रमाणें अशोकराजा केवळ हिंदुस्थानांतीलच नव्हे, तर सर्व पृथ्वीवरील पुण्यश्लोक राजांपैकीं राजा होऊन गेला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

अशोकाला दोन बायका होत्या. पैकीं चारुवाकी नांवाच्या स्त्रीला तीवर नांवाचा पुत्र होता. परंतु तो अशोकाच्या पूर्वींच मरण पावला असावा. अशोकानंतर त्याचा नातु दशरथ हा त्याच्या गादीवर बसला ( ख्रि. पू. २३१ ) अशोकाचीं मुलें व नातू यांच्यासंबंधानें नानाप्रकारच्या आख्यायिका आहेत. त्याची बहुत विश्वासूक अशी राणी असंधिमित्रा नांवाची होती. तिचे मरणानंतर अशोकानें एका तरुण व स्वैर वर्तनाच्या स्त्रीशीं लग्न केलें. तिचें नांव तिष्यरक्षिता असें होतें; कुनाल नांवाचा त्याचा मुलगा होता; व संप्रति व दशरथ नांवांचे नातू होते, अशाही आख्यायिका आहेत. परंतु यासंबंधानें खात्रीलायक असें कांहींच सांगतां येत नाहीं.

मौर्य साम्राज्याची समाप्ति ख्रि. पू. १८४ सालीं झाली. बृहद्रथ नांवाच्या शेवटच्या राजाचा वध त्याचा सेनापति पुष्पमित्र यांनीं केला. अशोकाचे वंशज सातव्या—शतकापर्यंत मगध देशाचे



अशोकाचे साम्राज्याचा
नकाशा
(मि. व्हिन्सेंट स्मिथ यांचे नकाशावरून)
परोपनिसदाई
अराकोसिया
काश्मीर
हिमालय पर्वत
(तिबेट)
अशोक साम्राज्य
कोसल
कुशीनगर
वैशाली
पाटलीपुत्र
मगध
काशी
प्रयाग
मथुरा
इंद्रप्रस्थ
(दिल्ली)
अंग
भिलसा
सांची
उज्जन
नर्मदा नदी
सुराष्ट्र
सुरत
गोदावरी नदी
कलिंग
पुरी
कृष्णा नदी
मद्रास
कांची

किरकोळ राजे म्हणून राज्य करीत होते. कांहीं लहान लहान राजे कोंकणांत आठव्या-शतकापर्यंत राज्य करीत होते. मौर्या-नंतर आंध्र वंशाचें प्राबल्य झालें.

---

# भाग ६

## शुंग, काण्व व आंध्र वंश.

इ० स० पूर्वीं १८४—इ० स० नंतर २३६

बृहद्रथाचा वध करून पुष्पमित्र गादीवर बसला, व त्यानें शुंग वंशाची स्थापना केली.

सुमारें १९९ ते १९३ वर्षांत काबूलचा राजा मेनँडर मोठी फौज घेऊन हिंदुस्थानावर चालून आला. त्यानें सिंधु नदाच्या मुखाजवळील प्रांत, व काठेवाड वगैरे पश्चिम किनाऱ्यावरील भाग घेतले; मथुरा जिंकली, रजपुतस्थानांतील चितोड शहराजवळील मध्यमिका चितोड शहरानजिकचें नागरी शहर शहरास व दक्षिण अयोध्येंतील साकेत शहरासही वेढा दिला, व खुद्द पाटलीपुत्र राजधानीवर चाल करण्याची भीति घातली.

त्याच सुमाराला कलिंगचा राजा खारवेल ह्यानें मगध देशाच्या पूर्व भागावर हल्ला केला.

निकराची लढाई होऊन मिनँडरचा पराभव झाला व यापुढें कोणत्याही युरोपियन राष्ट्रानें हिंदुस्थावर खुष्कीच्या मार्गानें स्वारी करण्याचा प्रयत्न केला नाहीं. व मिनँडरपासून इ० स० १५०२ सालीं वास्कोडिगामा कालिकत येथें येईपर्यंत युरोपियन लोकांपासून हिंदुस्थानला कांहीं उपसर्ग पोंचला नाहीं.

या वेळेस नर्मदेकडील प्रांतावर पुष्पमित्राचा मुलगा अग्नि-मित्र हा प्रतिनिधीच्या कामावर होता. राजधानी विदिशा (हल्लींचें भेलसें शहर, ) येथें होती. त्यानें विदर्भ देशाच्या राजाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला.

पुष्पमित्राच्या मनांत अश्वमेध यज्ञ करावयाचें आल्यावरून, त्यानें अग्निमित्राचा मुलगा वसुमित्र यास पोक्त सैन्य बरोबर देऊन अश्व सोडला. अश्वाला यवनें[2] लोकांनीं सिंधु नदीच्या तीरावर प्रति-बंध केल्यामुळें, वसुमित्रानें त्यांचा पराभव करून अश्व सोडवून आणला. कालिदासाचें मालविकाग्निमित्र[3] नाटकांत पुष्पमित्रानें अग्निमित्राला आपल्या कुटुंबासह यज्ञास येण्याबद्दल आमंत्रण केल्याचें व वसुमित्रानें शौर्यानें यवनांचा पराभव केल्याचें सुंदर वर्णन दिलें आहे. पतंजलीच्या ग्रंथांतही ह्या अश्वमेधाचा उल्लेख आहे. त्यानें हा यज्ञ समक्ष पाहिला असावा असें दिसतें. यावरून त्या-वेळीं बौद्ध धर्माचें प्राबल्य कमी होऊन ब्राह्मण धर्माचें पुनरु-ज्जीवन झाल्याचें स्पष्ट दिसतें. बौद्ध व जैन धर्माच्या लोंकांचा पुष्पमित्रानें छळ केल्याचा स्पष्ट पुरावा नाहीं. पुष्पमित्र खिस्ती स०पूर्वीं १४८ व्या वर्षीं मरण पावला. त्याच्या नंतर अग्निमित्र वगैरे सुमारें नऊ राजे झाले. परंतु त्यांच्या कारकीर्दींत म्हणण्या-सारखी कांहीं विशेष गोष्ट घडून आली नाहीं. शेवटचा म्हणजे दहावा राजा देवभूति हा विषयासक्त होता, व त्यांतच त्याचा अंत झाला. (इ०स०पूर्वीं ८२).

---

१ ह्याला पुष्य मित्र ही म्हणतात २ हे यवन मेन्यांडरच्या सैन्यापैकीं असावेत. ३ मालविकाग्निमित्र अंक ५

## काण्व वंश.

देवभूतीचा ब्राह्मण प्रधान वसुदेव याचें अंग देवभूतीचा वध करण्यांत होतें. वसुदेवानें गादी बळकाविली. त्याच्या वंशांत त्याच्या मागून तीन राजे झाले. त्यापैकीं शेवटच्या राजांस आंध्र ऊर्फ शातवाहन राजानें ठार मारलें, व त्याचा वंश ख्रि. पू. २८ सालांत संपला.

---

## आंध्र वंश[१].

आंध्र हे द्रविडी लोक होते. त्यांचें राज्य कृष्णा व गोदावरी ह्या नद्यांचे मुखांजवळ हिंदुस्थानचे पूर्व किनाऱ्यावर होतें. त्यांचा पहिला राजा शिशुक ऊर्फ सिमुक हा होता. चंद्रगुप्त मौर्याचे वेळेस त्याच्या राज्यांत तीस तटबंदीचीं शहरें होतीं. त्याची फौज एक लक्ष पायदळ, दोन हजार घोडेस्वार, व एक हजार हत्ती याप्रमाणें होती. त्यांची राजधानी कृष्णातीरीं श्रीकाकुलं नांवाचें नगर होतें. (इ०स०पूर्वी ३००). ते अशोकाचे मांडलिक म्हणून गणले जात असत (इ०स०पू०२२६); परंतु अशोक राजाच्या मृत्युनंतर ते पूर्णपणें स्वतंत्र झाले. व त्यांचा दुसरा राजा कृष्ण यानें आपलें राज्य नाशिकापर्यंत वाढविलें. पुढें इ० स०पूर्वी २८ सालापावेतों त्यांचें नांव विशेष ऐकण्यांत येत नाहीं. त्या सालीं वर लिहिल्याप्रमाणे त्यांच्यापैकीं एका राजानें काण्व वंशांतील सुशर्मा नांवाच्या शेवटल्या राजाला मारून त्याचें राज्य काबीज केलें. परंतु मारणाराच्या नांवाबद्दल शंका आहे. त्यानंतर हाल नांवाचा राजा गादीवर आला. त्यानें सप्तशती नांवाचा

---

१ महाराष्ट्र प्रांताचा इतिहास भाग १२ अंक पहा.

एक ग्रंथ प्राचीन महाराष्ट्र भाषेंत लिहिला आहे. त्यासच शालिवाहन किंवा शातवाहन असें म्हणतात.

राजा गौतमीपुत्र श्री शातकर्णी व राजा वासिष्ठीपुत्र श्रीपुलुमायी यांच्या कारकीर्दींत आंध्रांचीं, पश्चिम किनाऱ्यावर स्थाइक झालेले परदेशस्थ क्षत्रप राजे त्यांच्याशीं युद्धें झालीं. या क्षत्रपांपैकीं क्षत्रप भूमकक्षहरात यांचे नांव राहिलें आहे. तो इ० सनाचे पहिले शतकांत झाला असावा, व पार्थियन राजांचा मांडलिक असावा. त्यानंतर दुसरें नांव नहपान याचें दृष्टीस पडतें. त्याचें साल इ० स० ६० व ९० यांचे दरम्यान असावें. तो प्रथम क्षत्रप होता. पुढें त्यानें महाक्षत्रप असें नांव धारण केलें. त्याचे राज्याचा विस्तार दक्षिण राजपुतान्यापासून पुणें व नाशिक जिल्ह्यापर्यंत होता. व त्यांत काठेवाड (सुराष्ट्र) प्रांताचा समावेश होत होता. तो कुशान राजाचा मांडलिक असावा.

राजा गौतमीपुत्र इ० स० १०२ सालांत गादीवर आला. इ० स० १२४ सालांत त्यानें क्षहरात वंशाचा पराभव करून त्याचें राज्य घेतलें, व हिंदुधर्म स्थापन केल्याबद्दल त्यास अभिमान वाटला. त्याचा मुलगा वसिष्ठीपुत्र श्रीपुलुमायी यानें उज्जनीचा क्षत्रप रुद्रदामा याचे मुलीशीं लग्न केलें. परंतु पुढें जावई व सासऱ्याचें युद्ध झालें. त्यांत सासऱ्याचा जय झाला व क्षहराताचा जिंकलेला प्रांत रुद्रदामानें परत घेतला. (इ० स० १५० ). रुद्रदामा हा क्षत्रप चष्टन याचा नातू होता. इ० स० १६३ सालांत वाशिष्ठीपुत्र पुलुमायीचे मरणानंतर, गौतमीपुत्र यज्ञश्री याचें नांव ऐकं येतें. त्यानें २९ वर्षें राज्य केलें. (इ० स० १७३–२०२). त्यानें रुद्रदामाचे वेळेस गेलेले प्रांतांपैकीं कांहीं प्रांत परत घेतलेसें दिसतें. या वंशांतील शेवटचे तीन राजे विजय, चंद्रश्री, व चवथा पुलुमायी हे होत. इ० स० २२५ सालांत हा वंश समाप्त झाला.

त्याच सुमारास कुशान राजापैकीं शेवटचा वासुदेव नांवाचा राजा मयत झाला, व इराणांतील सस्सनीय वंशाचा उदय झाला. इ० स० चे तिसरे शतकाचे हिंदुस्थानचे इतिहासाची माहिती बरोबर मिळत नाहीं.

---

# भाग ७



## हिंदी ग्रीक व हिंदी पार्थियन वंश[2]

## ग्रीक, शक, व पल्हव लोकांच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या.

( इ०९ स० पू० २५० ते इ० स० ५० )

चवथे भागांत सांगितल्याप्रमाणें ख्रि. पू. ३०५ वर्षांचे सुमारास चंद्रगुप्तानें सेल्यूकसचा पराभव केला. त्यानंतर वायव्य सरहद्दीवरील हिंदुकुश पर्वतापर्यंतचे प्रांत चंद्रगुप्त मौर्य व त्याचे वंशज यांच्या ताब्यांत अशोक राजाच्या मरणापावेतों राहिले. त्याच्या मरणानंतर ते प्रांत स्वतंत्र होऊं लागले.

अशोक राजाचे कारकीर्दींतच सिरियाचे साम्राज्यांत बहुतेक एकाच काळीं दोन मोठीं बंडें झालीं; एक बॅक्ट्रिया प्रांतांत व दुसरें

---

१ मि० के० पी० जयस्वाल यांचें म्हणणें असें आहे कीं, शातकर्णी राजा इ० स० पूर्वीं १३२ सालीं राज्यारूढ झाला, व तो इ० स० पूर्वीं ५८–५७ सालांत मरण पावला, तेव्हां त्याचे गादीवर त्याचा मुलगा पुलुमायी बसला. यालाच पुलोमा व विलोमा अशीं नांवें आहेत, व तोच विक्रम संवताचा कर्ता विक्रमादित्य होय; व त्यानेंच नहपानाचा पराभव केला. ( मॉडर्न रिव्हू; डिसेंबर १९१३ पान ६२३ ).

२ हा भाग मुख्यत्वेंकरून प्रो. ऱ्यापसन यांचे ग्रंथाचे आधारानें लिहिला आहे.

पार्थिया प्रांतांत. त्यांचा परिणाम हिंदुस्थानापर्यंत येऊन पोहोंचला. इ० स० पूर्वीं २५० सालीं, बॅक्ट्रिया ( सांप्रतचे बाल्ख ) चा क्षत्रप डिऑडोटस् व पार्थियांतील एक धाडसी वीर आरसेकीन यांनीं सेल्यूकसचे वंशजांचा अंमल झुगारून दिला; व त्यांनीं वेगवेगळीं स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं.

बॅक्ट्रिया प्रांत अफगाणिस्थानचे व आक्सस नदीचे उत्तरेस आहे. त्याचे व मौर्य साम्राज्याचे सरहद्दीवर हिंदुकूश पर्वत होता. बॅक्ट्रियाचें राज्य डिओडोटसनें स्थापन केलें, तें इ. स. पू. १३५ वर्षेंपावेतों टिकलें. त्या सुमारास शक लोकांचे स्वारीनें तें नाहींसें झालें.

पार्थियनांचें राज्य इ. स. नंतर २२६ वर्षेंपावेतों चाललें. त्यांचे राजांपैकीं मिथ्रिडेटीसचें राज्य सिंधूनदीपर्यंत वाढलें होतें. सिरियाचे राजांनीं हे दोन प्रांत केवळ मुकाट्यानें जाऊं दिले असें नाहीं. इ. स. पू. २०९ सालांत पार्थिया प्रांत आर्टेबेनसचे व बॅक्ट्रिया प्रांत युथिडेमसचे ताब्यांत असतांना सिरियाचा राजा आंटिओकस यानें त्या दोघांवर स्वारी केली. परंतु त्यांत त्याला म्हणण्यासारखा जय आला नाहीं. शेवटीं ते दोन्ही प्रांत स्वतंत्र झाले व आंटिओकसला त्यांचें स्वातंत्र्य कबूल करावें लागलें.

यानंतर आंटिओसकनें काबूल प्रांतावर स्वारी केली. अशोकाचे वेळीं हा प्रांत त्याचे साम्राज्यापैकीं होता. परंतु पुढें तो स्वतंत्र झाला होता. आंटिओकसचे स्वारीचे वेळेस तेथील राजा सुभागसेन नांवाचा होता. त्यानें आंटिओकसला खंडणी देण्याचें कबूल केलें.

आंटिओकसच्या स्वारीनंतर बॅक्ट्रियाचा राजा युथिडेमस यानेंही हिंदुकुश पर्वताचे दक्षिण प्रांतांवर स्वारी करण्याचें मनांत आणलें. त्यानें डिमिट्रिअस नांवाचे आपले मुलास फौज देऊन तिकडे

पाठविलें. त्यानें पश्चिम पंजाब, काबूल व सिंध खोऱ्यांचे प्रांत जिंकले. याप्रमाणें तो बाहेर जय मिळवीत चालला असतां, त्याचे स्वतःचे राज्यांतच त्याला युक्रेटायडीज नांवाचा बलाढ्य शत्रु उत्पन्न झाला. त्यानें बॅक्ट्रिया प्रांत जिंकला, इतकेंच नव्हें तर डिमिट्रिअसनें हिंदुस्थानांत जिंकलेला भागही शेवटीं घेतला. यापुढें युथिडेमस व युक्रेटायडीज या दोघांचेही वंशज हिंदुस्थानांतील कांहीं भागांवर राज्य करीत होते. युथिडेमसचे वंशजांचें राज्य इ० स० पूर्वीं १०० व युक्रेटायडीजचें राज्य इ०स०पूर्वीं२५वर्षेंपावेतों टिकलें. पार्थियाचा राजा मिथ्रिडेटीस व युक्रेटायडीज हे समकालीन होते( इ० स० पू० १७१). या सालानंतर युथिडेमसचे वंशजांचा अंमल बॅक्ट्रियांत राहिला नाहीं. त्यांचें राज्य काय तें हिंदुस्थानांतच राहिलें.

हिंदुस्थानांतील डिमिट्रिअसनें मिळविलेल्या प्रातांत त्यांचे वंशज आपालोडोटस व मिनँडर यांनीं बरीच भर घातली.

मिनँडरचे कांहीं नाण्यांवरून असें दिसतें कीं, तो "हीडास्पीज ( बिया ) नदीचे अलीकडे आला होता, इतकेंच नाहीं तर, इ. सनाचे ८० सालांत त्यांचीं नाणीं बरुकच्छ ( भडोच ) येथें चालत होतीं. बुद्धग्रंथ मिलिंदपन्हा यांत जो मिलिंद राजा लिहिला आहे तो हा मिनँडरच होता. मिलिंद राजा शाकल ( सिआलकोट ) येथें रहात होता. युथिडेमसच्या वंशजांचा शक लोकांनीं पराभव केल्यानंतर, त्यांनीं मथुरेंत जीं नाणीं सुरू केलीं तीं त्या वंशजांच्या सारखींच होतीं. यावरून त्या वंशजांची एक राजधानी मथुरा असावी, असें अनुमान निघतें. त्यांचें राज्य बरेंच विस्तृत असल्याचें कालिदासाचे मालविकाग्निमित्रांत, पतंजलीचे महाभाष्यांत व गर्गसंहितेंत जे यवनांचे उल्लेख आहेत, त्यावरूनही सिद्ध होतें. ग्रीक जातीचा हिंदुस्थानांतील शेवटचा राजा हर्मियस नांवाचा

होता, त्याचें राज्य कुशान घराण्याचा राजा कुजुल कादफिसीज यानें इ० स० चे २९ व्या सालीं घेतलें.

ग्रीक लोकांचा अंमल हिंदुस्थानांत असल्याचें त्यांचे नाण्यांवरून शाबीत होतें. याशिवाय त्यांचा अंमल असल्याची खूण काय ती एकच आहे. ती खूण म्हणजे शिंदेसरकारचे राज्यांतील बेसनगर नांवाचे गांवांत एक पाषाणावरील लेख आहे ही होय. या लेखाचें वर्ष भागभद्र राजाच्या कारकीर्दीचें १४ वें वर्ष आहे. त्यांत आंटिअल्किडस राजाचे नांवाचा उल्लेख आहे. त्यांत विष्णूचा ध्वजस्तंभ उभारण्याकरितां देणगी दिल्याचें लिहिलें आहे. त्यांत विशेष गोष्ट ही आहे कीं, ही देणगी देणार आंटिअल्किडस राजाचा वकील डायनचा मुलगा हेलिओडोरस नांवाचा ग्रीक मनुष्य आहे. पुराणांतील पुष्पमित्र शुंगचा वंशज भद्र ऊर्फ भद्रक व हा भागभद्र एकच असावा.

पंडित भगवानलाल इंद्राजी यांनीं एका महत्त्वाच्या लेखाचा शोध लावला आहे. त्यावरून मथुरेच्या क्षत्रपांचे घराण्यांतील लोकांची व उत्तर हिंदुस्थानांतील दुसरे क्षत्रपांचींही नांवें मिळतात. हे व कपिश व तक्षशिला येथील क्षत्रप बौद्ध धर्माचे असल्याचें दिसून येतें. हा लेख खरोष्टी लिपींत असून तांबड्या दगडाचे सिंहासनावर खोदला आहे. यावरून शक लोकांनीं त्या प्रांतांतील ग्रीक व हिंदु राजांचा पराभव करून आपला अंमल स्थापन केल्याचें सिद्ध होतें.

कालिकाचार्यकथा नांवाच्या जैन ग्रंथांतही मध्य हिंदुस्थानांत शक अंमल असल्याचें लिहिलें आहे. त्यांत असेंही लिहिलें आहे कीं, उज्जनीचा राजा विक्रमादित्य यानें शक लोकांचा पराभव केला, व इ० स० पूर्वीं ५८ वे वर्षीं विक्रम संवत स्थापन केला. हा शक १३५ वर्षें चालून पुढें एका शक राजानें इ० स० नं०

७८ सालीं आपला शक स्थापन केला. पैठणचा शालिवाहन ह्यानें हा शक स्थापन केला, अशी जी महाराष्ट्रांत सर्वत्र समजूत आहे, तिला डॉ० भांडारकर किंवा दुसरे कोणी विद्वान संमति देत नाहींत. कनिष्काचे काळाबद्दल फार मतभेद आहे. डॉ० फ्लीट इ० स० पूर्वी ९८ म्हणतात. तर डॉ० भांडारकर इ० स० २७८ ठरवितात. प्रो० ऱ्याफसन व मि० स्मिथ वर लिहिल्याप्रमाणें इ० स० ७८ ठरवितात.

पल्लव राजा वोनोनीज याचे वंशज व शक राजा मारुस याचे वंशज हे जवळजवळचे प्रांतांवर राज्य करीत होते.

ग्रीक लोकांशिवाय शक व पल्हव नांवाचे परदेशी लोकांनीं हिंदुस्थानांवर स्वाऱ्या केल्या व आपलीं राज्यें स्थापिलीं. शक हे जगझार्टिज नदीचे व बॅक्ट्रिया व सोगडिआना प्रांताचे उत्तरेकडील प्रदेशांत बरेच दिवस राहात असत. पुढें युएची लोकांनीं त्यांना हाकून दिलें तेव्हां ते दक्षिणेकडे आले. यांची दुसरी टोळी ड्रांगिआना ऊर्फ शकस्थान ( सिस्तान ) या प्रांतांत राहात होती. युएची लोकांच्या हल्ल्यामुळें ते पार्थिअन लोकांच्या राज्यांतही घुसले. पार्थिआचे राजे, दुसरा फ्राटीज ( इ०स०पू० १३८-१२८ ) व दुसरा आर्टोब्यानस ( इ०स०पूर्वी १२८–१२३ ) यांनीं त्यांना हाकून देण्याचा प्रयत्न केला. शेवटीं दुसरा मिथ्रिडेटीज यानें त्यास निखालस हाकून दिलें ( १२३–८८ ) तेव्हां ते शकस्थानांत आले.

पल्हव हे पार्थिअन लोकांपैकींच होते. परंतु ते राजकर्त्यांच्या कुळांपैकीं नसून, ड्रांगिआना, आराचोशिआ ( कंदाहार ) व गेड्रोशिया ( उत्तर बलुचिस्थान ) ह्या भागांत राहात होते. ते आरंभीं कदाचित् पार्थिअन राजांचे क्षत्रप असतील, परंतु पुढें ते स्वतंत्र

१ विन्सेंन्ट स्मिथचा इतिहास पृ. २५६ टीप तिसरी आवृत्ति.

होऊन आपल्यास राजाधिराज म्हणवूं लागले. त्यांचे पैकीं प्रथमच नांव पुढें आलें असें वोनोनीज़ हें होय.

शक व पल्हव हे दोघेही आपल्यास राजाधिराज म्हणवून घेत असत. ही पदवी इराणचे राजघराण्यांत क्षाधिआना क्षाथिअ ( क्षत्रियाणां क्षत्रियः ) या रूपानें होती. ती अद्यापि शहान शहा रूपानें आहे. शक क्षत्रपांपैकीं तक्षशिला येथील क्षत्रप लिअक कुशूलक व मथुरेचा क्षत्रप रंजुबूल यांचीं नांवें काय तीं नाण्यांवरून दिसतात. कापिश येथेंही क्षत्रप होता. मोग उर्फ मारुज् राजाचे कारकीर्दींत पाटिक नांवाचा तक्षशिलेस क्षत्रप होता. शकस्तान ( म्ह० सिस्तान ) कंदाहार व उत्तर बलुचिस्तान प्रांतावर पल्हव व पश्चिम पंजाब व सिंध प्रांतावर शक राजे राज्य करीत होते. इ०स० चे पहिले शतकांत गोंडो फरीज पल्हव यांचें कारकीर्दींत दोन्हीं राज्यें एकत्र झालीं. या राजाची कीर्ति युरोप खंडापर्यंत पोहोचली होती. त्याजकडे सेंट टामस नांवाचा पाद्री साधू आला होता.

गोंडोफरीजच्या नंतर त्याचे वंशांत बरेच राजे झाले. परंतु त्यांचे राज्याचा विस्तार इ. स. चे पहिले शतकांत पुष्कळ कमी झाला होता. कुशान राजांचा उदय बॅक्ट्रिया प्रांतांत झाला. ग्रीक, शक, पल्लव व हिंदु हे सर्व त्यांनीं आपल्या एकछत्री साम्राज्यांत आणले. इ. स. पू. चे सुमारास काबुल खोऱ्यांतील ग्रीक राजांचा शेवटीं राहिलेला प्रांत हरमिअसकडून कुशल कुजुन कदफिसीज यानें घेतला. त्याचेनंतर विमकदफिसीस यानें सिंधु नदीजवळील प्रांत घेतला. या वंशाची पूर्ण वाढ कनिष्क राजाचे वेळेस झाली. शालिवाहन शक त्यानेंच इ. स. ७८ सालांत स्थापन केला असावा. सौराष्ट्रांतील शक राजांनीं त्या शकाचा तीनशें वर्षें उपयोग केला होता म्हणून त्याला शक हें नांव पडलें असावें.

---

## कुशान वंश.

—:०:—

### इ० स० २० ते २२५.

हिऊंगनू नांवाच्या तुर्की फिरस्ती टोळीनें त्यांचेच शेजारीं चिनाच्या वायव्य प्रांतांत राहणाऱ्या यु–ए ची टोळीचा पराभव केला. तेव्हां यु--एची टोळी पश्चिमेकडे पळून गेली. त्यांची संख्या सुमारें पांच ते दहा लक्ष होती. ते गोबी नांवाच्या रेतीच्या मैदानाच्या उत्तरेस आले. तेथें बू—सन नांवाच्या टोळींचीं व त्यांची गांठ पडली. त्यांच्याशीं युद्ध करून त्यांनीं त्यांना जिंकलें. त्या नंतर जगझार्टिस नदीचे उत्तरेस शक लोक राहात होते तेथें जाऊन त्यांनीं त्यांना जिंकलें. परंतु वु--सन व हिऊंग–नू हे एकत्र होऊन त्यांनीं युएचीला पिटाळून लावलें तेव्हां युएची बॅक्ट्रियांत आले. तेथें ते स्थाइक होऊन राहिले. त्यांच्यांत कदफिसीज नांवाचा राजा झाला ( इ० स० १९ ). तो देश जिंकीत जिंकीत सिंधुनदीपर्यंत आला. अफगाणिस्थान व सोगडीआना ( बुखारा ) हे प्रांत त्याच्या ताब्यांत आले. तो ऐंशी वर्षांचा होऊन मृत्यु पावला, व त्याचा मुलगा दुसरा कदफिसीज त्याच्या गादीवर बसला. [ इ. स. ४९ ]

तोही आपल्या बापासारखा धाडसी व महत्त्वाकांक्षी होता. त्यानें पंजाब व भागीरथीतीरचा काशीपर्यंत प्रांत जिंकला. त्यानें इ० स० ९९ पासून इ० स० ७८ पावेतों राज्य केलें. त्याचे नंतर प्रसिद्ध कनिष्क[१] गादीवर बसला. तो इतका प्रबळ झाला कीं,

---

१ कानिष्क हा दुसरे कदफिसीजचा दूरचा आप्त असावा. तो कुशान वंशांतील होता एवढेंच काय तें खात्रीनें सांगतां येतें. त्याचे बापाचें नांव वजेष्क किंवा वजेष्य असें होतें.

त्यानें खुद्द चीनच्या बादशहाच्या मुलीची मागणी केली. ( इ० स० ९० ). हा अपमान बादशहाचा सेनापती पनचाव ह्याला सहन न होऊन, कनिष्काचे वकिलास त्यानें हाकून लावलें. तेव्हां त्यानें सत्तर हजार फौज सी नांवाच्या सेनापतीबरोबर पामिरचे रस्त्यानें चिनी लोकांवर पाठविली. त्या फौजेचे वाटेनें फार हाल झाले व शेवटीं पनचाव यानें त्या फौजेचा पूर्ण पराभव केला. चीनचे बादशहास खंडणी देण्याचा प्रसंग कनिष्कावर येऊन पडला.

यु–एची लोकांचे वेळेपासून रोम व हिंदुस्थान यांमधील व्यापारास सुरुवात झाली. हिंदुस्थानांतून रेशीम, लवंगा, वेलदोडे वगैरे किराणा माल तसेंच हिरे, माणकें व रंग देण्याच्या जिनसा रोमकडे जात असत, व तिकडून सोनें येत असे. त्या सोन्याचीं कदफिसीजनें नाणीं पाडलीं. ९९ सालीं त्यानें ट्रेजन बादशहाकडे वकील पाठविला. या वेळेस रोमन लोकांची हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील लोकांना चांगली माहिती होतीसें दिसतें.

कनिष्काचा लौकिक तिबेट, चीन वगैरे देशांत अशोकाखालो-खाल आहे. तो पुढें पुढें बौद्ध धर्माचा फार अभिमानी झाला. काश्मीर प्रांत त्यानें जिंकला, व कनिष्कपूर नांवाचें नगर त्यानें स्थापन केलें. पाटलीपुत्रावर हल्ला करून तेथून अश्वघोष नांवाचा एक बौद्ध भिक्षु तो घेऊन गेला. त्याची राजधानी पूरुषपूर ( पेशावर ) ही होती.

त्यानें एक प्रचंड तेरा मजली उंच असा लोखंडी स्तंभ उभारला. त्याची उंची चारशें फूट होती. त्याच्या माथ्यावर एक लोखंडी मेघडंबरी होती. त्याचे शेजारीं एक मोठा मठ होता. तो नववे शतकापर्यंत होता. कनिष्कानें यार्कंद, काशगर, व खोतान हे प्रांत जिंकले.चीनच्या बादशहास तो जी खंडणी देत होता, ती त्यानें बंद केली. इतकेंच नाहीं तर दरम्यानच्या राजांस जिंकून

त्यांचीं मुलें ओलीस घेतलीं. त्यांत एक चीनच्या मांडलिक राजाचा मुलगा होता.

या वेळेपासून चीन देशांत बौद्ध धर्माची स्थापना झाली. ओलीस घेतलेल्या राजपुत्रांस ऋतुमानाप्रमाणें योग्य अशा ठिकाणीं वेगवेगळ्या बौद्धांच्या मठांत कनिष्कानें ठेवलें. ते पूर्व पंजाबांत चीनभुक्ति नांवाचे ठिकाणीं रहात असतां पियर व पीच ह्या फळांची लागवड हिंदुस्थानांत त्यांनीं प्रथम केली. एका राजपुत्रानें देशीं परत जातांना कपिश शहरांतील मठाला मौल्यवान जवाहिराची देणगी दिली. ती देणगी वैश्र-वणाच्या मूर्तीच्या पायांखालीं पुरून ठेविली होती. मठांतील भिक्षूंपैकीं कोणी ती काढावयास गेल्यास भूत–पिशाच्च त्याच्या दृष्टीस पडत. हि–उएन–त्संग हा तेथें गेला तेव्हां त्यास तेथील लोकांनीं विनंति केल्यावरून त्यानें मठाच्या संरक्षक भूताची, त्या देणगीचा अपव्यय केला जाणार नाहीं अशी खातरी केली, व धूपदीप जाळून तें जवाहिर काढलें. तेव्हां त्या कामगारांना कोण-त्याही प्रकारची इजा झाली नाहीं. सात आठ फुटांखालीं तांब्याचा एक मोठा हंडा सांपडला. त्यांत शेंकडों शेर सोनें व पुष्कळ मोतीं सांपडलीं.

कनिष्कानें बौद्ध धर्माचा स्वीकार कोणत्या सालीं केला हें नक्की समजत नाहीं; परंतु इतकें खास दिसतें कीं, तो गादीवर बसला तेव्हां त्याचा बौद्ध धर्म नव्हता. कारण त्याच्या आरंभींच्या नाण्यांवर सूर्य व चंद्र यांचे ठसे असून त्यांचीं नांवें ग्रीक लिपींत लिहिलीं आहेत. नंतरच्या नाण्यांवर ग्रीक, इराणी व हिंदूंच्या देवांचीं चित्रें आहेत. शेवटीं शेवटीं पाडलेल्या नाण्यांवर मात्र बौद्ध शाक्य मुनींचे पुतळे आहेत. कनिष्क बौद्ध धर्माचा अनुयायी झाला. तथापि हिंदु देवांचीही तो पूजा करीत असे. कनिष्कानें

आपल्या कारकीर्दींत महान् बौद्ध परिषद भरविली. ती काश्मीरांत किंवा पंजाबांत भरली असावी. ती पार्श्विक नांवाच्या भिक्षूच्या सांगण्यावरून भरवली. तिचा अध्यक्ष वसुमित्र होता, व पाटलिपुत्राहून पकडून आणलेला अश्वघोष हा उपाध्यक्ष होता. एकंदर पांचशें पंडित जमले होते. त्यांनीं प्राचीन काळापासूनच्या सर्व बौद्ध ग्रंथांचें विवेचन केलें. व त्यांवरून मोठमोठाले टीका ग्रंथ लिहिले. त्यापैकीं महाविभाषा नांवाचा ग्रंथ अद्यापि चिनी भाषेंत उपलब्ध आहे. सर्व टीका ग्रंथांच्या नकला तांब्याच्या पत्र्यावर केल्या, व त्या राजानें एक मुद्दाम स्तूप बांधून त्यांत ठेवल्या. न जाणों श्रीनगराजवळ त्या कधींकाळीं अझूनही सांपडतील.

कनिष्काच्या मरणाची हकीकत फार चमत्कारिक आहे. त्याचा माथर नांवाचा एक विलक्षण बुद्धिमान प्रधान होता. तो एक दिवस राजाला म्हणाला " महाराज, आपल्या सेवकाचें ऐकाल तर सर्व जगत् आपल्या ताब्यांत येईल. अष्टदिशांचे लोक आपणांस शरण येऊन आपल्या आश्रयाखालीं राहातील. आपल्या सेवकाच्या म्हणण्याचा विचार करा. परंतु तें कोणास कळवूं नका." राजा म्हणाला " बरें आहे; तुमच्या म्हणण्याप्रमाणें होईल. " नंतर त्या प्रधानानें सर्व सेनापतींना बोलाविलें व चतुरंग सेना तयार केली. जिकडे जिकडे राजाची स्वारी जाई तिकडे तिकडे सर्व लोक त्याच्या पुढें हात जोडून उभे राहात. याप्रमाणें तीन देशांचे लोक त्यास शरण आले. कनिष्क राजाच्या घोड्याच्या पायाखालीं सर्व वांकून जाऊं लागलें, किंवा मोडून जाऊं लागलें. राजा म्हणाला, " मीं तीन दिशा जिंकल्या. चवथ्या दिशेचा प्रांत मात्र मला शरण आला नाहीं. तो जिंकल्यावर मी कोणाशीं लढाई करणार नाहीं. परंतु तो प्रांत कसा जिंकावा हें समजत नाहीं. "

राजाच्या लोकांनीं हे शब्द ऐकले तेव्हां ते म्हणाले, " हा

राजा फार आशाबद्ध व क्रूर आहे. त्याच्या लढायांमुळें त्याचे सर्व लोक थकून गेले आहेत. त्याला तृप्ति म्हणून ठाऊकच नाहीं. आमचे आप्तवर्ग दूर राहिले. तेव्हां आपण याच्यापासून आपली सुटका करून घेतली म्हणजे आपण सुखी होऊं. याप्रमाणें त्या सर्वांनीं एकविचार करून त्याचा प्राण घेण्याचा बेत केला, व एके दिवशीं तो आजारी असतांना त्याच्या अंगावर रजई टाकून त्याचा कोंडमारा केला, व एक मनुष्य त्याच्या तोंडावर बसून त्यानें त्याचा प्राण घेतला.

कनिष्काचें राज्य इ० स० १२३ ह्या वर्षांत समाप्त झालें. त्याला वासिष्ठ व हविष्क असे दोघे मुलगे होते. ते दोघे उत्तर हिंदुस्थानचे एकामागून एक असे प्रतिनिधि होते. वासिष्ठ हा कनिष्काचे हयातींतच मृत्यु पावला. हविष्क हा कनिष्कानंतर गादीवर बसला.

हविष्कानें हुष्कपूर नांवाचें शहर वसविलें. त्याला हल्लीं हुष्कुर असें म्हणतात. तें काश्मिरांत आहे. काश्मिर, काबूल व मथुरा हे प्रांत याच्या राज्यांत होते. हविष्काच्या नाण्यांवर ग्रीक, हिंदु व इराणी देवतांचीं चित्रें आहेत. हविष्काचें राज्य इ० स० १४० त संपलें. त्याचेनंतर वासुदेव गादीवर बसला. त्याचे नाण्यांवर शिव, नंदी व त्रिशूल आहेत. ह्यावरून हिंदु धर्माचा त्याच्यावर पूर्ण पगडा बसला होता हें सिद्ध होतें. त्याचें राज्य इ० स० १७८ सालीं संपलें. इ० स० १६७ सालांत बाबिलन प्रांतांत भयंकर तापाचा रोग उत्पन्न झाला; तो रोग पार्थिया प्रांतांत व रोमचे साम्राज्यांत पसरला व हिंदुस्थानांतही तो आला असावा. कुशान वंशास तेव्हांपासून उतरती कळा लागली. वासुदेवानंतर उत्तर हिंदुस्थानांत कुशान वंशाचे राजांचे ताब्यांत फारसा प्रांत राहिला नाहीं.

उत्तर हिंदुस्थानांतील कुशान व दक्षिण हिंदुस्थानांतील आंध्र हीं दोन्हीं राज्यें एकाच वेळेस ( म्ह. इ० स० २२६ त ) लयास गेलीं व त्याच सुमारास इराणांतील अर्सकिदन वंश संपून ससानियन वंशाचा उदय झाला. या सुमारास इराणी लोकांची हिंदुस्थानावर स्वारी झाली असल्यास त्याबद्दल कांहीं पुरावा उपलब्ध नाहीं. तिसऱ्या शतकाच्या इतिहासाबद्दल खात्रीलायक कांहीं माहिती मिळत नाहीं.

विष्णु पुराणांत आभीर, गर्दभिल, शक, यवन व बाल्हिक वगैरे वंशांचीं नांवें दिलीं आहेत. परंतु त्यांपैकीं कोणी प्रबल झाल्याचें दिसत नाहीं. कुशन राजाचा अंमल काबूल व पंजाब प्रांतांत इ० स० चे पांचवे शतकापावेतों होता. त्या सुमारास हूण लोकांनीं त्यांचा पूर्ण पाडाव केला. चवथे शतकाचे आरंभीं त्यांचे एका राजानें, इराणचा ससानियन राजा दुसरा हारमझ यास आपली मुलगी दिली.



# भाग ८ वा.

———:०:———

## गुप्त साम्राज्य व पश्चिम प्रांतांतील क्षत्रप.

इ० स० ३२०—४९९.

चंद्रगुप्त नांवाच्या राजानें लिच्छवी वंशाच्या कुमारदेवी नांवाच्या राजकन्येशीं विवाह केला. हा चंद्रगुप्त पाटलिपुत्राचा किंवा त्या नगरीचे जवळचा एक लहानसा राजा होता. त्याच्या ह्या विवाहा-संबंधानें मगध देशांत त्याचें वजन वाढलें, व पाटलिपुत्राचें राज्य त्याला मिळालें. त्यानंतर तो आपणास महाराजाधिराज असें म्हणवूं लागला. त्यानें आपल्या व आपल्या राणीच्या व लिच्छवी कुलीच्या नांवांचीं नाणीं पाडलीं आणि आपल्या राज्याचा विस्तार प्रयागा-पर्यंत वाढविला. आपल्या नांवाचा इ० स० ३२० सालापासून त्यानें शक सुरू केला. तो इ० स० ३३० किंवा ३३९ सालांत मरण पावला. मरणापूर्वीं त्यानें आपला मुलगा समुद्रगुप्त यानें गादीवर बसावें असें ठरविलें.

समुद्रगुप्त हा हिंदुस्तानांतील एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. गादीवर बसल्यापासून त्यानें आपलें राज्य वाढविण्यास सुरवात केली. त्याच्या राज्याचें वर्णन हरिषेण कवीनें केलें आहे. अशो-कानें ६०० वर्षांपूर्वीं उभारलेल्या एका स्तंभावर त्यानें आपल्या पराक्रमाचें वर्णन लिहून काढविलें. तो स्तंभ हल्लीं प्रयागाचे किल्ल्यां-त ठेविला आहे.

प्रथम त्यानें उत्तर हिंदुस्थानांतील राजे जिंकले. त्यानें ज्या नऊ राजांचा पराभव केला त्यांपैकीं गणपति नाग नांवाचे राजाचा मात्र पत्ता बरोबर लागतो. त्याची राजधानी पद्मावती ऊर्फ नरवार

होती. हें शहर शिंदे सरकारचे राज्यांत आहे. त्यानंतर तो दक्षि- कडे वळला.

त्यानें दक्षिणेंतील अकरा, आर्यावर्तांतील नऊ व सरहद्दीवरील बऱ्याच राजांचा पराभव केला. प्रथम तो छोटा नागपूरमधून जाऊन महानदीचे खोऱ्यांतील दक्षिण कोसलचा राजा महेंद्र याचा त्यानें पराभव केला. नंतर ओरिसा प्रातांचे डोंगरांतील व्याघ्र राजास त्यानें जिंकलें. पुढें गोदावरी तीरावरील पिष्टपुराच्या राजाचा त्यानें पराभव केला. नंतर गंजम प्रांतांतील महेंद्रगिरि आणि कोतर हे डोंगरी किल्ले घेतले. व कोलेर सरोवराचे कांठावरील मंतराज राजाचा पराभव केला. पुढें कृष्णा व गोदावरी या नद्यांच्या दरम्यानचा प्रांत घेतला व कांची येथील पल्लव राजाचा पराभव केला. पुढें तो पश्चिम किनाऱ्याकडे वळला व त्यानें नेलोर प्रांतांतील पालक्क येथील उग्रसेन नांवाच्या पल्लव राजाचा मोड केला. परत येतांना देवराष्ट्र (महाराष्ट्र) व एरंडपल्ल (खानदेश) हे प्रांत त्यानें जिंकले. याप्रमाणें दुर्गम प्रदेशांतून दोन तीन हजार मैलांची ही धाडसाची मोहीम दोन वर्षांत समुद्रगुप्तानें संपविली. (इ. स ३९०)

समुद्रगुप्ताचें प्रत्यक्ष राज्य हुगळीपासून यमुना व चंबळा या नद्यांपावेतों पूर्व पश्चिम, व हिमालयाच्या पायथ्यापासून नर्मदेपर्यंत दक्षिणोत्तर असें पसरलें होतें. त्यानें जिंकलेले प्रांत फारसे आपल्या राज्यांत सामील केले नाहींत. परंतु तो पुष्कळ लूट घेऊन आला. त्याचे मांडलिक राजे होते ते:—( १ ) पूर्वेस गंगा व ब्रह्मपुत्रा नद्यांचे मधील समतट देश. सांप्रतचें कलकत्ता शहर याच प्रांतांत आहे. ( २ ) कामरूप उर्फ आसाम. ( ३ ) समतट व कामरूप यांचे दरम्यानचा प्रांत दुवाक, म्हणजे हल्लींचे बोग्रा, दिनाजपूर, व राजशाही जिल्हे. ( ४ ) नेपाळ हल्लीं प्रमाणेंच तेव्हांही ते मांडलिक होते. ( ५ ) पश्चिम हिमालयाचे पायथ्याशीं

असलेलें कार्तिपूर म्हणजे सांप्रतचें कमाउन, अलमोरा, गरवाल व कांग्रा प्रांत.

पंजाब, माळवा, व पूर्व राजपुताना ह्या प्रांतांत तेथीलच लोकसत्तात्मक संस्था होत्या.

अशोकानंतर इतकें विस्तृत राज्य समुद्रगुप्ताचेंच झालें, व त्याचेकडे गांधार व काबूल देशांचा कुशान राजा, व आक्सस नदीवरील त्याच जातीचा बलाढ्य राजा यांचेकडून व सिंव्हलद्वीप वगैरे ठिकाणांतून वकील येत असत. सिंव्हलद्वीपचा राजा मेघवर्ण ह्यानें आपल्या भावास समुद्रगुप्ताकडे वकील म्हणून पाठविलें. त्याचा तेथें मान नीट न राहिल्यामुळें, मेघवर्णानें जवाहीर वगैरेंचा नजराणा बरोबर देऊन दुसरा वकील पाठविला. व हिंदुस्थानांत मठ बांधण्याची परवानगी मागितली. ती मिळाल्यावर गयेंतील बोधिवृक्षानजिक उत्तरेस तीन मजल्यांचा त्यानें एक भव्य मठ बांधला व त्यांत बुद्धाची रत्नजडित सोन्याचांदीची मूर्ति बसविली. पुढें सातव्या शतकांत हिऊएनत्संग आला तेव्हां महायान स्थविरपंथाचे हजार भिक्षु ह्या मठांत होते, हल्लीं त्या ठिकाणीं एक टेंकाडासारखा उंचवटा आहे.

समुद्रगुप्तानें अश्वमेध यज्ञ केला. पुष्पमित्रानंतर आजपर्यंत तो कोणीं केला नव्हता. ह्या प्रसंगीं समुद्रगुप्तानें लक्षावधि ब्राह्मणांस चांदी सोन्याच्या नाण्यांची दक्षिणा दिली. त्यावेळेस पाडलेल्या नाण्यांपैकीं, कांहीं नाणीं सांपडलेलीं आहेत. त्यांवर होमकुंड काढलेलें असून त्याच्यासमोर यज्ञाचा अश्व उभा आहे, असें दाखविलें आहे. याशिवाय एक दगडाचा ओबडधोबड घोडा उत्तर अयोध्या प्रांतांत सांपडला आहे. तो लखनौच्या संग्रहालयांत ठेविला आहे. तो या अश्वमेधाच्या प्रसंगीं केला असावा अशी समजूत आहे.

समुद्रगुप्ताचीं आणखी कांहीं सोन्याचीं नाणीं सांपडलीं आहेत.

त्यांत राजा एका उंच पाठीच्या कोचावर आरामशीर बसला असून त्याच्या हातांत वीणा असल्याचें दाखविलें आहे. हरिषेण कवीनें त्याचें वर्णन केलेलें आहे, त्यांत हा राजा कवी असून गायन वादनशास्त्रांत कुशल असल्याचें लिहिलें आहे. या गोष्टी-वरून व युद्धांतील त्याच्या पराक्रमावरून त्यास हिंदुस्थानचा नेपो-लियन असें म्हणतात. तो इ. स ३७९ वे वर्षांत मरण पावला.

त्यानें आपल्या गादीवर आपल्या दत्त देवी राणीचा पुत्र दुसरा चंद्रगुप्त यास बसविलें. या चंद्रगुप्तानें पहिली स्वारी बंगाल्यांत केली. व पुढें माळवा व काठेवाड प्रांतांतून तो अरबीसमुद्राकडे गेला. तेथें क्षत्रपांचें राज्य होतें. त्यांचा त्यानें पराजय केला, ( ३८८–४०१ ). काठेवाड व माळवा प्रांत त्याला मिळाल्यामुळें, इजिप्त-मधून युरोपच्या व्यापाराशीं त्याचा संबंध आला. या वेळेस काठवाडांत सत्यसिंहाचा मुलगा रुद्रसिंह हा क्षत्रप होता. त्याचा त्यानें पराभव केला, व त्याला ठार मारून त्याचें राज्य आपल्या राज्यांत सामील केलें. ह्या वर्षापासून(इ. स.३८८) पुढें क्षत्रपाचें नांव ऐकूं येत नाहीं. समुद्रगुप्ताचे वेळेपासून राजधानीचें नगर पाटलिपुत्र नसून अयोध्या हें होतें. अशोक राजाच्या ज्या स्तंभावर समुद्रगु-प्तानें आपले पराक्रम लिहिलेले आहेत, तो स्तंभ कौशांबी येथें पूर्वीं होता. हें शहर उज्जनीचें उत्तरेस होतें. अलाहाबाद जिल्ह्यांत कोसम नांवाचें गांव आहे. तेंच प्राचीन कौशांबी असावें असा कांहींचा अभिप्राय आहे.

समुद्रगुप्त व चंद्रगुप्त यांसारख्या लढाईंत गुंतलेल्या राजांना पाटलिपुत्र नगराच्या सुधारणेकडे विशेष लक्ष देतां आलें नाहीं. तथापि सहावे शतकापावेतों तें शहर चांगलें भरभराटीचे स्थितींत होतें. इ. स. ६४० चे सुमारास हिऊएनत्संग तेथें आला, तेव्हां त्या शहरांत चोहोंकडे पडापड झालेली त्याला दिसली. लोक-

वस्ती फक्त सुमारें एक हजार होती. हर्षराजानेंही या शहराकडे लक्ष पुरविलें नाहीं. पालवंशापैकीं धर्मपाल राजानें मात्र त्या शहराचे जीर्णोद्धाराकडे थोडेंसें लक्ष दिलें. इ. स. ८११ सालीं त्याची तेथें राजधानी होती. पुढें इ० स० १५४१ पावेतों या शहराचें नांव लुप्तप्राय झालें होतें. त्या सालाचे सुमारास शेरशहानें पांच लक्ष रुपये खर्च करून तेथें एक किल्ला बांधला. तेव्हांपासून बिहार शहराचें वैभव जाऊन पाटणा शहराचा भाग्योदय झाला. इ० स० १९१२ सालीं बिहार व ओरिसा ह्या प्रांतांचें तें मुख्य शहर झालें. हल्लींची बांकीपूरची वस्ती प्राचीन पाटलिपुत्र शहराचे जागीं आहे.

या चंद्रगुप्ताला विक्रमादित्यही म्हणत असत. त्याच्या वेळचे देशाच्या स्थितीचें वर्णन चिनी प्रवाशी फाहिएन यानें चांगलें लिहिलें आहे. तो पाटलीपुत्र नगरांत तीन वर्षें राहिला आणि तेथें त्यानें संस्कृत भाषेचा चांगला अभ्यास केला. त्या वेळेस महायान व हीनयान या दोन बौद्ध धर्माच्या प्रचाराचे मठ होते. त्या दोन्हींत मिळून ६००–७०० भिक्षु होते. दरसाल वैशाख शुद्ध अष्टमीस एक मोठा समारंभ होत असे. त्या वेळेस वीस मोठमोठ्या रथांवर मूर्ति बसवून नगरांत हिंडवीत असत. या रथांबरोबर गवई, वाजंत्री, वगैरे असून मिरवणूक मोठ्या थाटाची निघत असे. मगध देशांतील लोक संपन्न असून, दानधर्माकडे त्यांचें लक्ष फार असे. रस्त्यावर धर्मशाळा होत्या व मुख्य शहरांत धार्मिक नागरिकांनीं एक उत्तम धर्मार्थ औषधालय स्थापिलें होतें. युरोप खंडांत अशा प्रकारचें पहिलें औषधालय म्हणजे पारिस शहरांतील मासोंधु हे इ. स. चे सातवे शतकांत निघालें असें म्हणतात, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. फाहिएननें सिंधु नदापासून मथुरेपर्यंत ९००

मैलांचा प्रवास केला. त्या प्रांतांत बौद्ध धर्माचे पुष्कळ मठ होते व त्यांत हजारों भिक्षु राहात असत. माळव्याचें वर्णन देतांना फाहिएन म्हणतो कीं, येथील लोक फार सुखी आहेत. त्यांच्या सरकारापासून त्यांना कांहीं त्रास होत नाहीं. परगांवीं जातांना कांहीं परवाने लागत नाहींत, किंवा आपल्या घरांची किंवा घरांतील माणसांची नोंद करावी लागत नाहीं. बहुतेक गुन्ह्यांना दंडाची शिक्षा असे. बंडवाल्यांना उजवा हात तोडण्याची शिक्षा असे. कबुलीकरितां कैद्यांना मारण्याची वहिवाट नाहीं. सरकारचें उत्पन्न बहुतेक काळींचें होतें; व अंमलदारांना सरकारांतून पगार असल्यामुळें, रयतेला तसदी होत नसे. बौद्ध शास्त्रांतील अहिंसा धर्म सर्वत्र पाळीत असत. कोणी दारू पीत नाहीं, किंवा कांदे, लसूण खात नाहींत. काश्मीरचा गोपादित्य राजा ब्राह्मणानें लसूण खाल्ल्यास त्यास शिक्षा देत असे.[1] हिंसा करणारे लोक काय ते चांडाल जातीचे होते. नेहमींचें वापरण्याचें नाणें कवड्यांचें होतें. बौद्ध मठांना राजाकडून चांगल्या नेमणुका असत. ते कोठें गेले तरी राहण्याची, जेवण्याखाण्याची व अंथरुणपांघरुणाची त्यांना अडचण पडत नसे. या फाहिएनच्या वर्णनावरून, चंद्रगुप्त विक्रमादित्याचें राज्य सुव्यवस्थेंत होतें व राजाकडून प्रजेला कांहीं उपाधि होत नव्हती असें दिसतें. त्यांनीं आपापल्या परीनें उद्योग करून संपन्न व्हावें अशी राज्यव्यवस्था होती. या विक्रमादित्याच्या वेळेस हिंदुस्थानची राज्यव्यवस्था पौर्वात्य दृष्टीनें जितकी चांगली होती, तितकी प्राचीन काळीं कधींहि झाली नाहीं. प्रजेच्या कारभारांत तो होतां होईल तितका कमी हात घालीत असे.

---

१ राजतरंगिणी, स्टीनचें भाषांतर-खंड १ पृष्ठ ३४२ (स्मिथचा इतिहास, पृ. २९७.)

गया, श्रावस्ती, व कपिलवस्तु हीं शहरें मात्र या वेळेस भरभराटीच्या स्थितींत नव्हतीं. याचें कारण काय असेल तें समजत नाहीं.

विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा कुमारगुप्त हा गादीवर आला. ( इ० स० ४१३ ) त्याच्या कारकीर्दींत राज्यविस्तार कांहीं कमी झाला असेल असें दिसत नाहीं. कारण, आपल्या आजाप्रमाणें त्यानेंही अश्वमेध यज्ञ केला. त्याचे कारकीर्दीचे शेवटीं हूण लोकांच्या टोळ्यांची धाड वायव्येकडून हिंदुस्थानांत आली. त्याचा बराचसा अनिष्ट परिणाम कुमारगुप्ताच्या राज्यावर झाला.

कुमारगुप्त इ० स० ४५५ त मृत्यु पावला. त्याचा मुलगा स्कंदगुप्त त्याच्या गादीवर बसला. थोड्याच दिवसांत मध्य आशियाच्या मैदानांतून निघून हिंदुस्थानच्या वायव्य दिशेच्या डोंगरांतून हूण लोकांच्या झुंडीच्या झुंडी स्कंदगुप्ताच्या राज्यावर उतरल्या. परंतु त्यांचा त्यानें मोड केला. या जयाच्या संबंधानें त्यानें एक मोठा स्तंभ उभारला. त्याच्या माथ्यावर विष्णूची मूर्ति बसविली व ईश्वराच्या कृपेनें रानटी लोकांच्या तडाक्यांतून आपल्या देशाची कशी सुटका झाली याचें वर्णन त्या स्तंभावर लिहिलें. तो स्तंभ गाझीपुर जिल्ह्यांत काशी क्षेत्राच्या पूर्वेस भीतरी या गांवीं अद्याप उभा आहे. त्यावरील विष्णूची मूर्ति मात्र नाहींशी झाली आहे. दुसऱ्या एका लेखांत ४५७ सालीं रानटी लोकांचा पराभव झाल्याचें लिहिलें आहे व त्यांत काठेवाड प्रांतावर स्कंदगुप्ताचा पूर्ण अंमल असल्याचें लिहिलें आहे. त्या प्रांताचा प्रतिनिधि पर्णदत्त नांवाचा होता. त्याच्या मुलानें गिरनार पर्वताजवळील तलाव दुरुस्त केला. इ० स० ४६५ सालापर्यंत स्कंदगुप्ताचें राज्य चांगल्या व्यवस्थेनें चाललें होतें, असें बुलंदशर जिल्ह्यांतील एका सूर्यनारायणाच्या देवळाला केलेल्या दानपत्रावरून दिसतें. परंतु त्याच

सालीं रानटी लोकांची टोळी सरहद्दीवरून येऊन, त्यांचे एका क्रूर सरदारानें कुशानच्या राजाची गादी बळकावली व ४७० सालच्या सुमारास हूण लोक स्कंदगुप्ताच्या राज्यावर आले, तेव्हां त्यांच्यापुढें त्याचा टिकाव लागला नाहीं. ४८० सालीं स्कंदगुप्त मरण पावला. तेव्हां गुप्तसाम्राज्य नष्ट झालें. त्याचे वंशज पुढें बराच कालपर्यंत पूर्वेकडील कांहीं प्रांतांवर राज्य करीत होते.

स्कंदगुप्ताचे मरणानंतर सुमारें साठ वर्षांनीं परमार्थ नांवाचे एका बौद्ध ग्रंथकारानें वसुबंधुचरित नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यानें एका गुप्त राजाला अयोध्येचा राजा विक्रमादित्य असें म्हटलें आहे. व हि-उएन-त्संग यानें त्याला श्रावस्तीचा विक्रमादित्य असें म्हटलें आहे. परमार्थाचे ग्रंथावरून असें दिसतें कीं, समुद्रगुप्तानें पेशावराहून वसुबंधु नांवाचे विद्वान बौद्ध साधूस मुद्दाम बोलावून आणलें. त्याच्या विद्वत्तेचा व वक्तृत्वाचा समुद्रगुप्तावर फार परिणाम झाला.

मगध देशाचें राजकीय वर्चस्व जरी नष्ट झालें तरी नालंद-सारख्या विद्यापीठाची ख्याति मुसलमान लोकांनीं तेथील पुस्तका-लयें वगैरे जाळून टाकीपर्यंत कायम होती. इ० स०चे ५३९ सालीं चीनचे बादशहानें बौद्ध धर्माचे ग्रंथ मिळविण्याकरतां व एखादा विद्वान पुरुष आणण्याकरतां मगध देशांत वकील पाठविले. मगध देशाचा राजा जीवितगुप्त किंवा कुमारगुप्त यानें त्या कामावर पर-मार्थाची योजना केली. व परमार्थ आपल्याबरोबर पुष्कळ ग्रंथ घेऊन इ० स० ५४६ त चीन देशांत गेला. इ० स० ५४८ त बादशहाची व त्याची भेट झाली व तो आपले सत्तरावे वर्षी इ० स० ५६९ सालांत चिनांत मरण पावला.

स्कंदगुप्तानंतर त्याचा सावत्रभाऊ पूरगुप्त गादीवर बसला. त्याच्यानंतर नरसिंहगुप्त बालादित्य व त्याच्यानंतर त्याचा मुलगा

दुसरा कुमारगुप्त असे राजे झाले. यापुढें सुमारें अकरा राजे झाले त्यांपैकीं शेवटचा दुसरा जीवितगुप्त हा आठव्या शतकाच्या आरंभीं गादीवर होता. सातव्या शतकांत आदित्यसेन नांवाच्या राजानें अश्वमेध याग केल्याचें वर्णन आहे.

माळवा प्रांतांत ४८४ सालापासून ५१० सालापर्यंत बुधगुप्त व भानुगुप्त नांवाचे राजे असल्याचें दिसतें. नवव्या शतकाचे सुमारास मगध देश बंगालचे पाल राजाचे ताब्यांत गेला.

पांचव्या शतकाचे शेवटीं काठेवाडच्या पूर्व भागांत वल्लभी येथें एक राज्य स्थापन झालें होतें तें ७७० सालापर्यंत चाललें होतें. हु-एन-त्संग तेथें गेला तेव्हां तें शहर चांगल्या भरभराटीच्या स्थितींत होतें व तेथें गुणमति व स्थिरमति या नांवाचे दोन प्रसिद्ध बौद्ध शिक्षक सहाव्या शतकांत रहात असत. वल्लभी राजांचा अंमल गेल्यानंतर काठेवाडची राजधानी अन्हिलवाडा—पाटण हें शहर झालें. पुढें पंधराव्या शतकांत अमदाबाद हें राजधानीचें ठिकाण झालें.



# भाग ९ वा.

——:०:——

## हूण लोक.

मध्य एशियाच्या मैदानांत मंगोल नांवाच्या फिरत्या टोळ्या राहात असत. त्यांत हूण नांवाचे लोक होते. ते लोक आपला प्रांत सोडून निघाले तेव्हां कांहीं युरोपांतील व्होलगा नदीकडे गेले, व कांहीं लोक आशिया खंडांत आक्ससनदीकडे गेले.

जे लोक पूर्व युरोपांत शिरले त्यांनीं तेथील गॉथ लोकांना डॅन्यूब नदीच्या दक्षिणेस हाकून लावलें. ते गॉथ लोक रोमच्या साम्राज्यावर येऊन पडले. ह्या धामधुमींत इ. स. ३७८ व्या वर्षीं व्हेलेन्स बादशाहा ठार झाला. हूण लोक व्होलगा व डॅन्यूब या दोन नद्यांमधील प्रांतावर पसरले. त्यांच्यांत आटिला नांवाचा एक पुढारी निघाला. त्याची दहशत कॉन्स्टँटिनोपल व रॅव्हेना या दोन्ही राजधान्यांस पडली. आटिला ४९३ सालीं मरण पावला. त्यानंतर वीस वर्षांतच आशिया खंडाचा उत्तर प्रांतांतील नव्या टोळ्या आल्यामुळें हूण लोकांच्या युरोपांतील अंमल संपला.

आशिया खंडांत जे हूण लोक आले त्यांनीं इराण देशावर हल्ला करून तेथील फिरोज नांवाच्या राजास इ. स. ३८४ सालीं मारलें. तेथून त्यांच्या टोळ्या काबूल मार्गानें हिंदुस्थानांत शिरल्या. गांधार देशचें ( पेशावरचें ) राज्य घेऊन गुप्त साम्राज्याचा त्यांनीं नाश केला. ह्या हूण लोकांचा मुख्य सरदार तोरमाण नांवाचा होता. त्यानें आपला अंमल इ. स. ५०० सालाच्या पूर्वींच माळव्यापर्यंत बसविला होता. त्यानें आपणास महाराजाधिराज असा किताब लावून घेतला. **भानुगुप्त** व **वल्लभीचा** राजा हे त्याचे

मांडलिक झाले असावेत. तोरमाण ५१० सालीं मृत्यु पावला. त्याचा मुलगा मिहिरकुल यानें आपली राजधानी पंजाबांत शाकल ( सिआलकोट ) या गांवीं स्थापन केली. हूण लोकांचें मुख्य ठिकाण हिरातजवळ बामिन हें होतें. चिनी प्रवासी सोंग-यून हा ५१९ सालीं ज्या हूण राजाला भेटला, तो राजा इराणापासून चिनाच्या सरहद्दीपर्यंत चाळीस प्रांतांची खंडणी घेत असे. पुढचे सालीं सदर प्रवासी गांधारचा हूण राजा मिहिरकुल यास भेटला.

ह्या हूण लोकांचें वर्णन गिबन इतिहासकारानें दिलें आहे; त्यावरून ते लोक फार क्रूर होते असें दिसतें. ते मोठ्या व रुंद छातीचे असून त्यांचीं नाकें बसकीं होतीं; व डोळे लहान व काळे होते. लढण्यास निघत तेव्हां ते कर्कश आरोळ्या मारीत. वेडेवांकडे हातवारे करीत व त्यांची एकंदर चर्या फारच ओंगळ दिसत असे. हिंदु लोकांना ह्या रानटी लोकांचा फारच तिटकारा येई व भयही वाटे.

मिहिरकुलाचा क्रूरपणा असह्य होऊन हिंदुस्थानांतील राजे एकत्र झाले, व मगध देशाचा राजा बालादित्य व मध्यहिंदुस्थानचा राजा यशोधर्म या दोघांना पुढें करून त्यांनीं मिहिरकुलावर हल्ला केला व त्याचा पूर्ण पराभव करून त्यास पकडलें. परंतु बालादित्यानें त्याचा प्राण वांचविला, इतकेंच नाहीं तर त्याची त्याच्या देशाकडे रवानगी केली.

मिहिरकुल कांहीं दिवस अज्ञातवासांत राहिला. पुढें तो काशिमरच्या राजाकडे गेला. त्या राजानें त्याला आश्रय दिला, व थोडासा प्रांतही त्याच्या ताब्यांत दिला. परंतु ह्या कृतघ्न माणसानें आपल्या आश्रयदात्याविरुद्ध बंड करून त्याची गादी बळकाविली. कांहीं दिवसांनीं त्यानें शेजारच्या गांधार राजावर स्वारी करून त्याला विश्वासघातानें ठार मारलें. सिंधुनदीच्या कांठावरील पुष्कळ

लोकांची त्यानें कत्तल केली. तो शिवभक्त होता. त्यानें बुद्ध लोकांचा फार छळ केला. ह्यानंतर एक वर्षाच्या आंतच तो मरण पावला. त्याच्या मरणाच्या वेळेस नानाप्रकारचे अपशकुन झाले. पृथ्वीवर अंधार पडला; ती हालूं लागली; एक प्रचंड तुफान झालें; मेघगर्जना झाल्या, व गारांचा पाऊस पडला. त्याच्या मरणाचें साल ५४० असावें.

यशोधर्मानें मिहिरकुलावर मिळालेल्या जयानिमित्त दोन जयस्तंभ उभारले. त्यांत त्यानें पुष्कळ आत्मस्तुति केली आहे. परंतु हि–उएन–त्संग याचें म्हणणें ह्या जयाचें मुख्य श्रेय बालादित्त्यास देणें योग्य आहे. असें पडतें.

इ० स० ५६३ व ५६७ सालांच्या दरम्यान तुर्की लोक व इराणचा राजा खुश्रू अनुशीखान हे एकत्र होऊन त्यांनीं हूण लोकांचा पराभव केला, व आशिया खंडांतील हूण लोकांचें राज्य लयास नेलें.

ह्यानंतर सुमारें ५०० वर्षें पावेतों हिंदुस्थानावर परदेशाच्या लोकांची स्वारी आली नाहीं. मि. व्हिन्सेंट स्मिथ यांचा अभिप्राय असा आहे कीं, शक, यूएची, हूण वगैरे परदेशांतून आलेले सर्वच लोक हिंदुस्थान देश सोडून गेले असें नाहीं. त्यांचेपैकीं बरेच येथें स्थाईक झाले, व हिंदू समाजांत मिसळून गेले. त्यांपैकीं वरील दर्जाचे लोक क्षत्रिय झाले. परिहार वगैरे ज्या रजपुतांच्या जाती आहेत त्या ह्या लोकांतूनच उत्पन्न झाल्या. त्यांपेक्षां खालच्या दर्जाचे लोक गुर्जर वगैरे जातीचे झाले, तसेंच दाक्षिणेकडे जे मूळ रहिवाशी गोंड, भर, खरवार होते त्यांतूनच चंदेल, राठोड, गहरवार वगैरे रजपूत जाती झाल्या.

हि—उएन—त्संग यानें आपल्या प्रवासवर्णनांत **मोलापो** नांवाच्या राज्याचा उल्लेख केला आहे. तें राज्य व उज्जनीचें राज्य

एकच असल्याचें कांहीं ग्रंथकारांनीं लिहिलें आहे. परंतु तें म्हणणें चुकीचें आहे असें मि. स्मिथ यांचें म्हणणें आहे. शिलादित्य धर्मादित्य नांवाचा मोलापो प्रांताचा राजा होता. ( इ०स०५९९–६१० अगर ६१५ ). त्याचा पुतण्या ध्रुव भट हा वल्लभी ( वळा ) प्रांताचा राजा होता. हा प्रांत पूर्व काठेवाडांत आहे. हर्ष राजानें या ध्रुव भटाचा पराभव केला, तेव्हां त्यानें त्यास आपली मुलगी देऊन जांवई केला. मोलापो हा मालव शब्दाचा अपभ्रंश असावा. त्या राज्याचे उत्तरेस गुर्जर राज्य होतें; वायव्येस आनंदपूरचें व पूर्वेस अवंती ऊर्फ मालव प्रांत होता. या प्रांताची राजधानी उज्जनी हें नगर होतें. या मोलापो ऊर्फ पश्चिम मालव प्रांताचा राजा शिलादित्य धर्मादित्य नांवाचा होता, त्यानें इ०स० ५९९ पासून ६१० किंवा ६१५ सालपर्यंत राज्य केलें. हा बौद्ध धर्माचा असून त्याचा विद्वत्तेविषयीं व धार्मिकपणाविषयीं फार लौकिक होता. हर्ष राजासही शिलादित्य म्हणतात.



# भाग १० वा.

——:०:——

## हर्ष राजाची कारकीर्द.

( इ. स. ६०६—६४७ )

इ. स. ५५० पासून ६०० पर्यंतच्या इतिहासाचीं चांगलीं साधनें नाहींत. परंतु त्यापुढील इतिहास बाणकवीच्या हर्ष चरित्रावरून व हि–उएन–त्संग याचे प्रवासवर्णनावरूच बराच चांगला समजतो. इ. स. ६००च्या सुमारास ठाणेश्वरचा राजा प्रभाकरवर्धन हा आपल्या पराक्रमानें बराच प्रसिद्धीस आला होता. ६०४सालीं त्यानें आपला वडील मुलगा राज्यवर्धन याला मोठी फौज देऊन वायव्येच्या सरहद्दीवर हूण लोकांवर पाठविलें. त्याच्या मागून आपला धाकटा मुलगा हर्ष ह्यालाही घोडेस्वार बरोबर देऊन राज्यवर्धनाच्या मागोमाग पाठविलें. या वेळेस हर्षाचें वय फक्त १५ वर्षांचें होतें. हर्षवर्धन हा लढाईवर गेल्यानंतर त्याला आपला बाप अतिशय आजारी असल्याचें समजलें. त्यावरून तो राजधानीस लवकर परत आला. पण राज्यवर्धन परत येण्याच्या पूर्वींच त्यांचा बाप वारला होता. तो परत आल्यावर राज्यारूढ झाला. परंतु लवकरच त्याची बहीण राजश्री इचा नवरा कनोजचा राजा गृहवर्मा याला माळव्याच्या राजानें मारल्याची खबर आली, व त्यानें राज्यश्रीलाही कैदेंत टाकल्याचें समजलें. ही खबर लागतांच दहा हजार घोडेस्वार बरोबर घेऊन तो आपल्या बहिणीची सुटका करण्यास निघाला. माळव्याच्या राजाचा त्यानें पराभव केला. परंतु त्या राजाचा दोस्त मध्य बंगालचा राजा शशांक ह्यानें विश्वासघातानें राज्यवर्धनास मारलें. नंतर राज्यश्री कैदेंतून सुटून विन्ध्यपर्वतांत गेल्याचीही खबर हर्षास लागली.

राज्यवर्धनास मुलगा नसल्यामुळें, हर्ष सिंहासनारूढ झाला. आरंभीं त्यानें राजपुत्र शिलादित्य या नांवानें आपली द्वाही फिरविली. ( इ. स. ६०६ ). पण इ. स. ६१२ पर्यंत त्याला राज्याभिषेक झाला नाहीं.

प्रथमतः तो आपल्या बहिणीचा तपास लावण्याच्या उद्योगास लागला. तिचा तपास विंध्यपर्वतांत लागला. ती बौद्ध धर्माच्या संमितिय संप्रदायांत फार निपुण होती. हर्षानें सर्व हिंदुस्थानांत एकछत्री राज्य करण्याचा बेत केला. ह्या वेळेस त्याच्या जवळ पांच हजार हत्ती, वीस हजार स्वार व पन्नास हजार पायदळ इतकें सैन्य होतें. ह्या सैन्याच्या बळावर त्यानें उत्तर हिंदुस्थान काबीज केलें; बंगालचाही बराच भाग घेतला, आणि त्याचें सैन्य साठ हजार हत्ती व एक लक्ष पायदळ इतकें वाढलें.

दक्षिणेकडे मात्र चालुक्य वंशांतील दुसरा पुलकेशी याच्यापुढें त्याचें कांहीं चालेना. हर्ष दक्षिणेंत स्वारी करून आला, परंतु पुलकेशीनें नर्मदा नदीवर इतका कडेकोट बंदोबस्त केला होता कीं, हर्षाला तेथून परत जावें लागलें. ( इ. स. ६२० ). यानंतर कांहीं वर्षांनीं वल्लभीचे ध्रुवभटाचा त्यानें पराभव केला, व आनंदपूर, कच्छ, व दक्षिण काठेवाड प्रांतांचे राजे त्याला शरण आले. त्याची शेवटची स्वारी इ. स. ६४३ त गंजम प्रांतावर झाली. ह्याप्रमाणें हर्षाचें राज्य हिमालयापासून नर्मदेपर्यंत पसरलें होतें.

तो आपल्या राज्याची व्यवस्था स्वतः पहात असे, व पावसाळा शिवाय करून तो इतर ऋतूंत आपल्या राज्यांत फिरत असे. प्रवासांत मोंगल बादशहाप्रमाणें त्याचें मोठे तंबू वगैरे सामान नसे. बांबूच्या झोपड्यांतच त्याचा मुक्काम असे. मुक्काम हालला म्हणजे त्या झोपड्या जाळून टाकण्याचा परिपाठ होता असें बील यांच्या शोधावरून समजतें.

फा--हि एनप्रमाणेंच हि--उएन--त्संगचें त्याच्या राज्यव्यवस्थेसंबंधानें मत फार अनुकूळ असें झालें. सरकारी वसुलाची मुख्य बाब राज्यांतील जमिनींवरील महसूल ही होती. उत्पन्नाचा सहावा हिस्सा राजानें घ्यावा असा ठराव होता. सरकारी अंमलदारांना पगाराऐवजीं जमिनी दिल्या होत्या. सरकारी कामावर लावलेल्या वेठीच्या मजुरांस मजुरी मिळत असे. कर माफक असत. रयतेकडून शारीरिक मेहनतीचीं कामें अंमलदार बेतानें घेत. वेगळ्या वेगळ्या धर्मांच्या समाजांना धर्मार्थ देणग्या राजे उदारपणानें देत.

फा--हिएनच्या वेळेपेक्षां हि--उएन--त्संगच्या वेळेस रहदारीचे रस्ते जरी कमी सुरक्षित होते, तरी एकंदरींत जबरीचे गुन्हे फारसे होत नसत. कैद्यांची स्थिति फार वाईट असे. मोठमोठ्या गुन्ह्याकरितां व आईबापांची सेवा--चाकरी चुकल्याबद्दल शिक्षा फारच कडक असे. नाक, कान, हात अगर पाय तोडण्याची शिक्षा दिली जाई. कधीं या शिक्षेऐवजीं हद्दपारीची शिक्षा दिली जाई. अग्नि, पाणी, बगाड अगर विष यांच्या दिव्यांचा उपयोग खरें खोटें निवण्याकरितां करीत.

महत्त्वाच्या सार्वजनिक गोष्टींचे गांवोंगांवीं दाखले ठेवीत.

विद्येचा प्रसार पुष्कळ झाला होता. विशेषें करून बौद्ध, यति, व ब्राह्मण या वर्गांत ती ज्यास्ती असे. हर्ष राजा विद्वान लोकांचा मोठा चाहता होता. इतकेंच नाहीं, तर तो स्वतः वैय्याकरण व काव्य कर्ता होता. नागानंद, रत्नावली, आणि प्रियदर्शिका हीं नाटकें त्यानें केलीं आहेत. हर्षाचे दरबारांतील मुख्य विद्वद्रत्न म्हणजे बाण कवी होय. त्याचें हर्षचरित काव्य सुप्रसिद्ध आहे.

सदतीस वर्षेपर्यंत हर्षाचा काळ लढण्यांतच गेला. त्याची शेवटची मोहीम इ० स० ६४३ सालांत गंजामच्या लोकांशीं झाली.

तेव्हांपासून त्याचें लक्ष धर्माकडे व परलोकसाधनाकडे लागण्यास आरंभ झाला. अशोक राजाप्रमाणें आचरण ठेवावें असें त्याला वाटूं लागलेंसें दिसतें. प्रथम बौद्ध धर्मांतील **हीनयान** सांप्रदायाकडे त्याचें मन वळलें. त्यानंतर **महायान** सांप्रदाय त्याला पसंत वाटूं लागला. तो साधु बनला आणि प्राणहिंसा बंद करण्याकरितां तो फार सक्तीचे उपाय योजूं लागला. धर्मसंस्थापनेंत त्याचें मन इतकें गढून गेलें कीं, तो निद्रा व भोजन सुद्धां कधीं कधीं विसरत असे; प्राणहिंसेचे गुन्ह्यास देहान्त शिक्षा करावयाची असा त्यानें निर्बंध केला. अशोकाप्रमाणेंच सर्व राज्यांत प्रवाशांकरितां धर्मशाळा बांधण्यास आणि गरीब लोकांस आश्रयस्थानें व आजारी लोकांस औषधालयें शहरांत व खेड्यांत बांधण्यास त्यानें सुरुवात केली. या औषधालयांत वैद्याची व पथ्यपाण्याची योजना त्यानें उदारपणें केली. त्याचप्रमाणें हिंदु व बौद्ध धर्माच्या लोकांकरितां त्यानें पुष्कळ धार्मिक संस्था स्थापन केल्या. त्याच्या

---

१ गौतम बुद्धानें जेव्हां आपला नवीन धर्म प्रगट केला तेव्हां तो केवळ संन्यास वृत्तीचा होता. आत्म्याचें अस्तित्व त्याला कबूल नसल्यामुळें मोक्ष म्हणजे निर्वाण होय. मनुष्यानें सर्व संसार सोडून अरण्यांत जाऊन रहाणें व पूर्ण कर्मसंन्यास करणें हेंच त्याचें ध्येय होतें. बुद्धाचे मरणानंतर त्याचे अनुयायांना हा धर्म पसंत न पडून त्यांनीं भक्तिधर्माचा अनुवाद करण्यास सुरुवात केली, आणि वैदिक धर्माप्रमाणें पूजा करण्याचा उपदेश ते करूं लागले. मनुष्यानें कर्मसंन्यास न करितां लोकांवर उपकार करावे व त्यांच्या उपयोगीं पडावें हें त्यांचें कर्तव्य आहे, असें ते म्हणूं लागले. याचा मूळ उत्पादक नागसेन होता अशी समजूत आहे. या नव्या पंथाला महायान पंथ असें नांव पडलें, व मूळच्या पंथाला हीनयान असें म्हणूं लागले. याबद्दलची विस्तृत माहिती डॉ. केर्न यांचे *Manual of Indian Budlism* या ग्रंथांत दिली आहे.

राज्याच्या शेवटीं शेवटीं बौद्ध धर्माच्या लोकांसच त्याच्याकडून विशेष उत्तेजन मिळालें. त्यानें पुष्कळ मठ व हजारों स्तूप बांधिले. हे सर्व लाकडाचे व कळकाचे असले कारणानें लवकरच पडून गेले. बौद्ध धर्म या वेळेस जरी खालावण्यास लागला होता, तरी मठांत राहणाऱ्या भिक्षूंची एकंदर संख्या सुमारें दोन लक्ष होती.

ह्या काळांत हिंदु स्त्रियांना मुसलमानांच्या प्रमाणें पडदा नसून मोकळेपणानें हिंडण्याफिरण्याचें किती स्वातंत्र्य होतें, याचें एक उदाहरण पहावयास सांपडतें. हर्ष राजाची विधवा बहीण त्याचे बरोबर त्याच्या प्रसिद्ध चिनी धर्मगुरूचीं व्याख्यानें ऐकावयास बसत असे. प्रत्यक्ष राज्यकारभारांतही तो आपल्या बहिणीची मदत घेत असे. खुद्द हर्ष राजाचे कुटुंबांतील कांहीं माणसें शिवभक्त होतीं, कांहीं सूर्योपासक होतीं, व कांहीं बौद्ध धर्माचीं होतीं. एकंदर लोकसमाजांतही याचप्रमाणें स्थिति होती. परंतु पौराणिक देवतांकडे लोकांचा कल जास्त होऊं लागला होता; तथापि एकमेकांसंबंधानें तीव्र द्वेष व मत्सर बिलकूल नव्हता. मात्र कधीं कधीं धर्मद्वेषमूलक गुन्हे[1] घडत असत.

हर्ष राजा हि–उएन–त्संग याचे संभाषणानें इतका खूष झाला कीं, त्यानें आपली राजधानी कनोज येथें मोठी परिषद भरवून त्या विद्वान उपदेशकाच्या उपदेशाचा फायदा सर्व लोकांना करून देण्याचा बेत केला. दुसरी परिषद त्यानें प्रयाग येथें भरविली. या परिषदांत वेगवेगळ्या धर्मांच्या आचार्यांनीं धर्मसंबंधीं चर्चा

१ मध्य बंगालचा राजा शशांक यानें बुद्धगया येथील बोधि वृक्ष खणून जाळून टाकला. पाटलिपुत्र शहरांतील बुद्धाच्या पाषाणाच्या पादुका फोडून टाकिल्या; मठाचा नाश केला व यतींना हाकून दिलें. याप्रमाणें हि–उएन–त्संग यानें लिहिलें आहे. पुढें कांहीं दिवसांनीं मगध देशचा राजा पूर्णवर्मा यानें बोधिवृक्ष पुन्हां लाविला.

करावी अशी त्याची इच्छा होती. पहिल्या परिषदेच्या वेळेस त्याला अशी खबर लागली कीं, हि-उएन-त्संग याच्या प्रति-स्पर्ध्यांचा त्याचा प्राण घेण्याचा विचार आहे. त्यावरून त्यानें असा जाहिरनामा काढला कीं, " या धर्म गुरूच्या केंसास जर कोणी धक्का लावील तर त्याचें शीर उडविलें जाईल; त्याच्या विरुद्ध कोणी भाषण करील तर त्याची जीभ छाटली जाईल; परंतु जे कोणी त्याचा उपदेश ऐकावयास येतील त्यांना कोणच्याही तऱ्हेची भीति नाहीं असें आम्ही फरमावितों. " अर्थात् हा जाहि-रनामा लागल्यावर वादास कोण येणार ? वादाची मुदत १८ दिव-सांची होती. ती संपेपर्यंत वादास कोणीही आलें नाहीं.

या परिषदेकरितां तो गंगा नदीच्या दक्षिण तीरानें कनोज शहरीं जाण्यास निघाला. त्यानें आपल्या बरोबर कामरूप ( आसाम ) चा राजा कुमार यास घेतलें. कुमार राजा गंगेच्या तीरानें निघाला. दोन्ही राजांबरोबर फौजफाटा व तमासगीर मंडळी मिळून मोठा समुदाय होता. राजधानींत आल्यावर कुमार राजानें, वल्लभीच्या

---

१ मि. व्हिन्सेंट स्मिथ यांनीं दुसरे आवृत्तींत खालीं लिहिलेली गोष्ट चुकीनें हर्षवर्धनाची म्हणून लिहिली होती. ती हकीकत वास्तविक राज-पुतान्यांतील एका श्रीहर्ष नांवाच्या राजाबद्दलची आहे.

तारानाथ नांवाच्या तिबेटी इतिहासकारानें एक चमत्कारिक गोष्ट लिहिली आहे ती अशीः—परधर्मी उपदेशकांकरितां मुलतान शहराज-वळ त्यानें एक मोठा मठ बांधला. त्या मठांत असे हजारों परधर्मी उप-देशक येऊन राहिले. राजानें कित्येक महिनेपर्यंत त्यांची उत्तम बरदास्त ठेविली. एके दिवशीं त्यानें त्या मठाला आग लावून दिली. त्या होम कुंडांत बारा हजार परधर्मी लोक व त्यांचीं पुस्तकें जळून भस्म झालीं. या कृत्यामुळें इराणी व शक धर्मानें शंभर वर्षें डोकें वर काढलें नाहीं. या धर्माच्या लोकांपैकीं खुरासान प्रांतांतील एक कोष्टी मात्र जिवंत राहिला होता.

राजानें व आणखी दुसऱ्या अठरा मांडलिक राजांनीं व चार हजार बौद्ध भिक्षूंनीं हर्ष राजाचें स्वागत केलें.

या समारंभांत मुख्य पाहण्याचें ठिकाण म्हणजे एक भव्य मठ होता. त्या मठांत राजाचे आकृतीएवढी बुद्धाची सुवर्णमूर्ति स्थापन केली होती. त्याशिवाय दुसरी एक दीड हात उंचीची सोन्याची भोगमूर्ति तयार केली होती. दररोज या मूर्तीची मिरवणूक निघत असे. त्या वेळेस ती मूर्ति हर्ष राजा स्वतः आपल्या डोक्यावर घेऊन जात असे. कामरूपचा राजा त्या मूर्तीवर चौरी, मोर्चेल धरीत असे. बाकीचे वीस राजे व तीनशें हत्ती मागें चालत असत. वाटेनें राजाच्या दोन्ही बाजूंस त्याचे सेवक त्याचे आज्ञेनें मोतीं व सोन्याचीं फुलें व इतर मौल्यवान जिनसा उधळीत होते. मूर्ति पूजास्थानीं ठेवल्यावर हजारों मौल्यवान वस्त्रें तो देवास अर्पण करीत असे. नंतर मोठा भोजनसारंभ होई. याप्रमाणें कित्येक दिवस ही परिषद् चालू राहिली. व वर सांगितल्याप्रमाणें वाद करण्यास दुसऱ्या बाजूनें कोणीही विद्वान आला नाहीं. हि-उएन-त्संग याचें मात्र एकतर्फी भाषण होत असे. एके दिवशीं या मठाला एकदम आग लागली. परंतु राजा स्वतः येण्याबरोबर ती आग विझून गेली. एके दिवशीं हर्ष राजा स्तूपावरून खालीं उतरत असतांना एक मनुष्य हातांत जंबिया घेऊन त्याच्यावर चाल करून आला. भोंवतालच्या मनुष्यांनीं त्यास पकडलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, जैन व ब्राह्मण लोकांनीं हें कृत्य करावयास मला सांगितलें. त्यावरून पुष्कळ: ब्राह्मणांना पकडलें व मुख्य मुख्य पुढाऱ्यांचा शिरच्छेद केला व पांचशें ब्राह्मणांना हद्दपार केल.

यानंतर हर्ष राजानें हि-उएन-त्संगाचे सन्मानार्थ प्रयाग येथें दुसरी परिषद् भरविली. ती पंचाहत्तर दिवस चालली. त्या वेळेस कनोजप्रमाणेंच सर्व समारंभ झाला. परंतु दुसरेच दिवशीं सूर्य-

देवाच्या व शिवाच्या मिरवणुकी काढल्या होत्या, व ब्राह्मण व जैन यांनाही पुष्कळ देणग्या देण्यांत आल्या आणि एक महिनाभर आंधळे, पांगळे, अनाथ व गरीब लोक यांना धर्मादाय करण्यांत आला.

या देणग्यांमुळें व धर्मादायांमुळें, राजाच्या खजिन्यांतील सर्व शिल्लक संपली. त्याचीं स्वतःचीं अलंकारभूषणेंही नाहींशीं झालीं. व शेवटीं त्यानें आपली बहीण राजश्री इच्याकडून एक जुना पोषाख मागून घेतला व तो घालून त्यानें बुद्धाची पूजा केली. आपली सर्व संपत्ति धर्मादायांत खर्च झाली हें पाहून त्याला फार आनंद झाला.

यानंतर दहा दिवसांनीं हि–उएन–त्संग यास आपल्या देशीं जाण्याची परवानगी मिळाली. जाण्याचे वेळीं हर्ष राजा व कुमार राजा यांनीं त्यास कांहीं बहुमोल वस्तु घेण्याचा आग्रह केला. परंतु त्यानें कुमार राजाची एक बिनबाह्यांची उबदार कफनी मात्र घेतली. त्याचे प्रवासाचा बंदोबस्त राजानें सढळ हातानें केला. त्याच्याबरोबर कांहीं घोडेस्वार दिले व त्याच्यावर उधीत नांवाच्या राजाची नेमणूक केली. खर्चाकरतां तीन हजार सोन्याचीं नाणीं व दहा हजार चांदीचीं नाणीं हत्तीवर घालून दिलीं. हि-उएन-त्संग सहा महिन्यांनीं पंजाबांतील जालंदर शहरास जाऊन पोंचला. तेथें एक महिनाभर राहून मोठमोठाले व कठीण पर्वत चढून पामीरचे रस्त्यानें ६४६ चे उन्हाळ्यांत चीन देशांत आपले घरीं जाऊन पोंचला.

त्यानें आपल्या बरोबर ६५७ पोथ्या व सोन्याचांदीच्या व चंदनाच्या बुद्धाच्या पुष्कळ मूर्ति व बुद्धाच्या स्मारक म्हणून १५० जिनसा आणल्या. याप्रमाणें त्यानें सामानानें भरलेलीं वीस घोडीं आपले बरोबर हिंदुस्थानांतून आणलीं. त्यानें एकंदर चौऱ्याहत्तर

ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं. नंतर तो इ०स०६६४ मध्यें मरण पावला. हर्ष राजानें चीनच्या बादशाहाकडे एक ब्राह्मण वकील पाठविला होता. तो ६४३सालीं चीनच्या बादशाहाचें उत्तर घेऊन परत आला. त्याचे बरोबर चिनी वकीलही आले होते. ते ६४५ सालापर्यंत हिंदुस्थानांत राहिले. पुढचे सालीं चीनचे बादशाहानें तीस घोडेस्वार बरोबर देऊन वंग-हि उएन-त्से नांवाचा दुसरा वकील हर्ष राजाकडे पाठविला. परंतु तो वकील मगध देशांत येण्याचे पूर्वींच हर्ष राजा ६४६ किंवा ६४७ त मरण पावला.

त्याचे मरणानंतर त्याचा प्रधान अर्जुन यानें गादी बळकाविली. त्यानें चिनी वकिलाचा अपमान केला, त्याची मालमिळकत लुटली, व त्याच्या स्वारींतील बरेच लोक ठार केले. परंतु खुद्द वकील व त्याचे जोडीदार हे रात्रीं पळून गेल्यामुळें वांचले.

त्यांना तिबेटच्या राजानें आश्रय दिला, व एक हजार स्वारांची फौज त्यांचे बरोबर दिली. नेपाळांतूनही त्यांना सात हजार लोक मिळाले. या फौजेनिशीं वंग–हि–उएन–त्से हा परत आला, व तिरहूत शहर त्यानें घेतलें. त्या वेळेस तेथील शिपायांपैकीं तीन हजार लोक त्यानें ठार केले व दहा हजार लोक जवळच्या नदींत बुडून मेले. अर्जुन तेथून पळाला व नवी फौज गोळा करून लढाईस उभा राहिला. परंतु त्याचा पुन्हां पराभव झाला व स्वतः तो पकडला गेला. वकिलानें अर्जुन राजाच्या कुटुंबांतील सर्व माणसें पकडलीं. शिवाय बारा हजार लोक कैद केले, आणि तीस हजार गुरें घेतलीं. अर्जुनास तो चिनांत घेऊन गेला.

वंग–हि–उएन–त्से हा आपले यजमानाच्या हुकुमावरून ६५७ सालीं पुन्हा हिंदुस्थानांत आला. परंतु या खेपेस बौद्ध धर्माच्या पवित्र मंदिरास देणग्या देण्याकरितां मात्र तो आला होता. तो

नेपाळांतून वैशाली व बुद्धगया येथें आला, आणि काबूल, उत्तर अफगाणिस्थान, हिंदुकुश व पामीर या रस्त्यानें परत गेला.

हि–उएन–त्संग यानें वेगळ्या वेगळ्या प्रांतांची माहिती दिली आहे. तिजवरून असें समजतें कीं, त्या वेळेस उत्तरेस काश्मिरचें राज्य प्रबल होतें; आणि तक्षशिला, सिंहपूर व इतर लहान लहान संस्थानें काश्मिरचीं मांडलिक होतीं. पंजाबांत सेहकिआ नांवाचें राज्य होतें.

सिंधप्रांतांत एक शूद्र राजा होता. त्या वेळेस त्या राज्यांत दहा हजार बौद्ध भिक्षु होते; परंतु ते आळशी, व्यसनी व अनीतिमान् होते. त्या राजाचें नांव सिंहरस राई असें होतें. त्याचे कारकीर्दींत आरब लोकांनीं त्याजवर स्वारी केली, व त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें. त्याचा मुलगा साहसी याचीही तीच दशा झाली. ( इ० स० ६४६ ). त्याचे पश्चात् चच नांवाच्या ब्राह्मण प्रधानाकडे राज्य गेलें. त्यानें ४० वर्षें राज्य केलें. इ०स० ७१०–७११ चे सुमारास आरब लोकांनीं पुन्हां स्वारी करून चचचा मुलगा दाहीर यास ठार मारलें. ( इ०स०७१२ ) तेव्हांपासून सिंधप्रांत कायमचा मुसलमानांचे ताब्यांत गेला.

मध्य हिंदुस्थानांत उज्जनीचे ब्राह्मण जातीचे राजे होते. कामरूपच्या कुमार राजानंतर भास्करवर्मा नांवाचा ब्राह्मण राजा होता. कलिंग देशांत कोणी राजा नव्हता. हर्षवर्धन हा हिंदुस्थानांतील देशी राजांपैकीं शेवटचा सार्वभौम राजा होता. त्याचे मरणानंतर पांचशें वर्षेंपावेतों हिंदुस्थानांत देशी अगर परदेशी कोणीच प्रबळ राजा राहिला नाहीं; जिकडे तिकडे लहान लहान संस्थानें झालीं. आजपावेतों आर्य लोकांची सर्व दिशेनें जी प्रगति होत चालली होती, ती आतां बंद पडली, असें मि० विन्सेंट स्मिथ यांचें म्हणणें आहे. परंतु इ० स०चे पांचवे शतकापासून तों

चौदावे शतकापावेतों चालुक्य व राष्ट्रकूट वंशांचीं राज्यें, तसेंच दक्षिण हिंदुस्थानांत नववे शतकापासून चौदावे शतकापावेतों चोल साम्राज्य, बंगाल्यांत आठवे शतकापासून बारावे शतकापावेतों पाल राजांचें राज्य, याप्रमाणें मोठमोठीं राज्यें झाला. या गोष्टी ध्यानांत ठेवल्या तर या म्हणण्याचें महत्त्व बरेंच कमी होतें.

---

# भाग ११ वा.



## हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा उदय, प्रसार व ऱ्हास[१].

हिंदुस्थानांत आर्य लोकांनीं आपला धर्म स्थापन केला, त्यांत यज्ञयागाचें महत्त्व जरी बरेंच वाढलें तरी आध्यात्मिक विचारांचा धर्म त्यामुळें नाहींसा झाला असें नाहीं, व शेवटीं त्या तत्त्वाची पूर्ण वाढ उपनिषत् काळांत झाली. ऋग्वेद संहितेंत दहावे मंडळांत १२९ सावे मंत्रांत म्हटलें आहे कीं, विश्वांत आरंभीं सर्व अंधार होता; परंतु त्यांत एक शक्ति होती, तिच्या योगानें कामना ( वासना ) उत्पन्न झाली. ती शक्ति म्हणजे मन किंवा विचार शक्तीचें बीज. बौद्ध धर्माचें मूळ या तत्त्वांत आहे. बौद्ध धर्मांतील चार मुख्य सिद्धांतांपैकीं पहिला सिद्धांत हा आहे कीं, जगांत दुःख आहे. दुसरा सिद्धांत असा आहे कीं, या दुःखाचें कारण वासना हें आहे. तिसरा सिद्धांत असा आहे कीं, दुःख नाहींसें करण्यास उपाय वासना नाहींशी करणें हाच आहे. वासना नाहींशी करण्यास उपाय आठ आहेत, हा चवथा सिद्धांत होय. हे आठ

१ डॉ. भांडारकरांच्या " A *peep into the Early History of India* " नामक निबंधाच्या आधारानें मुख्यत्वेंकरून हा भाग लिहिला आहे.



हिमालय पर्वत
हर्षाचें साम्राज्य
गुरजर
पर्यात्र
कामरूप
पुंड्रवर्धन
नेपाळ
स्थाण्वेश्वर
अहिछत्र
जेजाकभुक्ति
कोशांबी
काशी
पाटलीपुत्र
महाकोसल
उद्र
समतट
कलिंग
गोदावरी नदी
नाशिक
सुरत
पुरी
गंजाम
वेंगीपूर
धनकटक
चोल
कांची
मदुरा
हर्षाचें साम्राज्य
इ० स० ६४०
(मि० विन्सेंट स्मिथ यांचे ग्रंथावरून)
मैलांचें प्रमाण

उपाय म्हणजे सम्यक्‌दृष्टि सम्यक्‌संकल्प, सम्यक्‌वाक्, सम्यक्कर्म, सम्यगाजीव, सम्यग्व्यायाम, सम्यक्‌स्मृति व सम्यक्‌समाधि हे होत. वासना नाहींशी झाली असतां निरंतरचें सुख प्राप्त होतें. आत्म्याचें अस्तित्व जे मानितात त्यांना निरंतरचें सुख म्हणजे आत्म्याचा मोक्ष हें होय. परंतु बौद्ध मतास आत्मा मान्य नसल्यामुळें, त्यांचें निरंतरचें सुख म्हणजे निर्वाण होय.

बृहदारण्यकोपनिषदांत एक मंत्र आहे. ( अ. ३ मधील ब्राह्मण २ मंत्र १३) त्यांत सुद्धां आत्म्याच्या स्वतंत्र अस्तित्वाबद्दल शंका ध्वनित केली आहे. याज्ञवल्क्य ऋषि व जरत्कारूचा मुलगा आर्तभाग यांचा संवाद तेथें दिला आहे तो असाः—" हे याज्ञवल्क्य, पुरुषाचे मरणानंतर त्याची वाचाशक्ति अग्नीकडे जाते, त्याचा श्वास वायूस जाऊन मिळतो, त्याची दृष्टि सूर्यास, त्याचें मन चंद्रास, त्याची श्रवण शक्ति दिशांस, देह पृथ्वीस, आत्मा आकाशास, शरिरावरील रोम वनस्पतीस, शिरावरील रोम वृक्षास, रक्त व शुक्र पाण्यास मिळून जातात, तेव्हां पुरुषाचें काय होतें ? " याज्ञवल्क्य म्हणतात, ' आर्तभाग, चल, माझा हात धर; तूं व मीच फक्त या गोष्टीसंबंधानें बोलूं. येथें बसलेल्या मंडळींना हा संवाद कळणें योग्य नाहीं. ' असें म्हणून ते दोघे निघून गेले[1]. त्यांच्या

---

१ याज्ञवल्क्य हो वाच—

यत्रास्य पुरुषस्य मृतस्याग्निं वागप्येति वातं प्राणश्चक्षुरादित्यं मनश्चंद्र दिशः श्रोत्रं पृथिवी शरीरमाकाशमात्मौषधीर्लोमानि वनस्पतीन्केशा अप्सु लोहितं च रेतश्च निधीयते क्वायं तदा पुरुषो भवतीत्याह रसोन्य हस्तमार्तभागाऽऽवामेवैतस्य वेदिष्यावो न नावेतत्सजन इति । तौ होत्क्रम्य मन्त्रयांचक्राते तौ ह यदूचतुः कर्म हैव तदूचतुरथ यत्प्रशशऽ सतुः कर्म हैव तत्त्वशशऽ सतु पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति ततो ह जारत्कारव आर्तभाग उपरराम ॥ १३ ॥

संवादाचें तात्पर्य हें होतें कीं, जो सत्कर्म करतो तो पुण्यवान् होय. जो दुष्कर्म करतो तो पापी होय. या उत्तरानें आर्तभागाच्या शंकेचें निरसन झालें, व तो स्तब्ध राहिला. या संवादावरून तीन गोष्टी निघतात त्या ह्या:—१ आत्मा हा पदार्थ मनुष्याच्या घटकावयापासून भिन्न नाहीं. २ पुनर्जन्म हा कर्मामुळें होतो; ३ कर्म चांगलें वाईट असेल त्याप्रमाणें पुढील जन्म पवित्र अगर पापी होतो. या सिद्धांतांपैकीं तिसरा सिद्धांत सर्व दर्शनांत आहे. परंतु पहिले दोन सिद्धांत उपनिषत्काळीं पुढें येऊं लागले होते, व ते बौद्ध मतांत गृहीत झाले. याज्ञवल्क्य व आर्तभाग यांचे संवादाचे वेळीं ते सामान्य विद्वानांना चमत्कारिक वाटत होते, व म्हणून तो संवाद एका बाजूस व्हावा हें याज्ञवल्क्य ऋषींस इष्ट वाटलें. शाकल राजा मिलिंद ऊर्फ मेनँडर व बौद्ध साधु नागसेन यांचा संवाद आहे तो असा:—

राजा:—आपल्यास कसे ओळखतात ? आपलें नांव काय ?

नागसेन:—माझे वडील, उपाध्ये वगैरे मला नागसेन म्हणतात, परंतु नागसेन ही कांहीं वेगळी वस्तु नाहीं.

या गोष्टीची पुरी समजूत घालून देण्याकरितां नागसेनानें रथाचा दाखला दिला. रथाचे वेगवेगळे भाग एकत्र केले म्हणजे जसा रथ होतो तसे पांच स्कंध एकत्र झाले म्हणजे मनुष्य होतो. हे पांच स्कंध म्हणजे रूप, विज्ञान, वेदना, संज्ञा व संस्कार असे होत. ज्याप्रमाणें रथ ही जिन्नस त्याचे घटकावयावांचे एकीकरणाशिवाय वेगळी नाहीं, तसेंच मनुष्यप्राणी हा त्याचे घटकावयवांशिवाय कांहीं वेगळा नाहीं. राजा पुढें विचारतो:—

राजा:— नागसेन, पुनर्जन्म होतो तो कशाचा ?

नागसेन:—नाम–रूप यांचा पुनर्जन्म होतो.

राजा:—म्हणजे काय, हें नामरूपच पुन्हा जन्मास येतें काय

**नागसेन**:—नाहीं. परंतु या नामरूपांच्या योगानें बरीं अथवा वाईट कर्मे घडतात, व या कर्मांच्या योगानें नवें नामरूप जन्मास येतें.

बौद्ध मताप्रमाणें बाह्य जगताला अस्तित्वच नाहीं. सर्व ज्ञान म्हणजे मनुष्याचा अनुभवच आहे, व म्हणूनच जगतांतील सर्व वस्तु क्षणिक आहेत.

बौद्धमताचा प्रसार होण्यास त्यांतील अध्यात्म विचार फारसे कारणीभूत झाले असें नाहीं. जनतेवर त्या मताचा परिणाम मुख्यत्वेंकरून, त्याचे नीतिसंबंधी शिक्षणामुळें झाला. बौद्ध उपदेशक लोकांना धर्म अथवा नीति सांगूं लागले. महाभारतांत शांतिपर्व व अनुशासन पर्व यांत अशा प्रकारची म्हणजे धर्माचीं व परमेश्वराव्यतिरिक्त केवळ नीतीचीं विवेचनें आहेत. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें दुःख नाहींसें होण्यास बौद्धमतानें आठ उपाय आहेत. अशोक राजाचे व बौद्ध उपदेशकांचे यत्नांचा लोकांवर जो विशेष परिणाम झाला, त्याचें कारण बौद्धमताचा हा नीतिवर्धक मार्ग हें होय. गौतम बुद्धाचें सामर्थ्य कांहीं अलौकिक प्रकारचें होतें, व तो देवाचाच अंश होता अशी सामान्य जनतेची समजूत असल्या कारणानेंही त्याच्या मताचा प्रसार मोठ्या झपाट्यानें झाला. गौतम बुद्धाचा विशेष कटाक्ष यज्ञयागावर होता. ब्राह्मणांचें म्हणणें असें होतें कीं, वेद हे मनुष्यास मोक्षप्राप्ति करून देण्यास समर्थ आहेत. हें म्हणणें गौतम बुद्धास कबूल नव्हतें. त्याच्या मतांत जाति व वर्ण हीं जरी नव्हते तरी त्या मतांचा मुख्य हेतु जाति व वर्ण काढून टाकण्याचा नव्हता. इतकेंच नव्हे, तर पूर्वींपासून चालत आलेल्या व्रतवैकल्याच्या गोष्टी सुद्धां त्याचे अनुयायांनीं केल्यास त्याची त्यासंबंधानें विशेष हरकत नव्हती. बौद्ध धर्म सामाजिक सुधारणा करण्याचे हेतूनें स्थापित झाला होता असें नाहीं. तो ज्यांनीं स्थापित केला व त्याचा ज्यांनीं प्रसार केला त्यांनीं समाजाचा पूर्णपणें

त्याग केला होता. त्यांना मुख्यत्वेंकरून वेदांचें व यज्ञयागांचें जें बंड माजलें होतें व ज्यामुळें हिंसा अतिशय होऊं लागली होती तें बंड मोडून व तें वर्चस्व टाकावयाचें होतें. ब्राह्मणांना बौद्धांचा द्वेष वाटण्यास हें मुख्य कारण होतें.

अशोक राजाची बौद्ध धर्मावर जरी निस्सीम भक्ति होती तरी इतर धर्मासंबंधानें त्याचा द्वेष नव्हता, इतकेंच नव्हे तर, त्याचें म्हणणें सर्व धर्मांत कांहींना कांहीं तरी सत्याचा अंश आहेच असें होतें. त्याचा मुख्य हेतु सर्व लोकांत नीति व सत्य यांची वृद्धि व्हावी हाच कायतो होता.

बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन ब्राह्मण धर्माचें वर्चस्व सुरू झाल्याचें स्पष्ट चिन्ह समुद्रगुप्तानें अश्वमेध यज्ञ केला हें होय. ही गोष्ट इतकी महत्त्वाची होती कीं, समुद्रगुप्तानें त्या प्रसंगीं मुद्दाम विशेष सुवर्ण नाणीं पाडून त्यांवर ' अश्वमेध पराक्रम ' अशीं अक्षरें खोदलीं व अश्व मोकळा सोडल्याचें चित्र त्यांवर काढलें. दुसरा चंद्रगुप्त,कुमारगुप्त व स्कंधगुप्त यांचे नाण्यांवर त्यांना 'परम भागवत ' असें म्हटलें आहे. इ० स० ४०० सालांतील उदयगिरीचा एक लेख आहे, त्यावर विष्णु व चंडी देवीच्या मूर्ति आहेत. इ० स० ४१४ सालापासून इ० स० ५७० सालापर्यंतचे लेखांवरून ब्राह्मणधर्माचें वर्चस्व स्थापित झाल्याचें स्पष्ट दिसत आहे. शिव, विष्णु, सूर्य व महासेन या देवांची भक्ति फार प्रचारांत आली. या काळाच्या पूर्वींच्या लेखांत पाली अथवा प्राकृत भाषा होती, ती जाऊन तिच्याऐवजीं सर्वत्र संस्कृत भाषा सुरू झाली. यावरूनही ब्राह्मणांचें वर्चस्व स्थापित झाल्याचें सिद्ध होतें.

कनिष्क राजाचे वेळेस अश्वघोषानें बुद्धचरित्र लिहिलें तें उत्तम संस्कृत भाषेंत लिहिलें. तें चरित्र दुसऱ्या शतकाच्या शेवटीं लिहिलें असावें. कनिष्क राजानें बुद्ध परिषद भरविली, त्या वेळेस तीन



एका वृक्षावर राहणाऱ्या नाग लोकांना बुद्ध उपदेश करित आहे.
( प्रो. ऱ्हिस डेव्हिड्स यांचे ' बुधिस्ट इंडिया ' नामक ग्रंथावरून. )

संस्कृत ग्रंथ नव्यानें निर्माण झाले. याप्रमाणें संस्कृत भाषेचें महत्त्व वाढल्यामुळें, ती अवगत असलेल्या ब्राह्मण विद्वानांचेंही महत्त्व सहजच वाढलें.

अशोकाच्या वेळेपासून कनिष्काच्या वेळेपर्यंत म्हणजे [ इ०सं० पूर्वी तिसरे शतकापासून तों इ० स० नंतर दुसरे शतकापर्यंत ] ज्या देणग्या देण्यांत आल्या त्यांपैकीं तीन चतुर्थांश किंवा ज्यास्त बौद्ध लोकांस किंवा बौद्ध धर्मार्थ दिल्या असल्याचें दिसतें; व बाकीच्या एक चतुर्थांशाचा बराच मोठा भाग जैन धर्माकडे दिला गेला. परंतु इ० स० चे दुसरे शतकापासून हें पारडें अगदीं बदलूं लागलें, व तें पांचवे शतकांत इतकें बदललें कीं, तीन चतुर्थांश देणग्या ब्राह्मणांना व त्यांचे धर्माला दिल्या आहेत व राहिलेल्या एक चतुर्थांशाचा बराच मोठा भाग जैन धर्माकडे दिल्याचें दिसतें. शेवटीं ज्या देशांत बौद्ध धर्माचा उदय झाला त्या देशांत बौद्ध धर्माचा अनुयायी क्वचितच आढळण्यांत येतो.

हा सर्व प्रकार घडून येण्यास किती काळ लागला हें चिनी प्रवाशांचे लेखांवरून आपणांस समजून येतें. इ० स० चे चवथे शतकाचे आरंभीं फा--हिआन हा हिंदुस्थानांत आला, तेव्हां बौद्ध धर्म त्यास लयास जात असल्याचीं चिन्हें चोहींकडे दिसत होतीं. सातवें शतकांत हि--उएन--त्संग आला तेव्हां बौद्ध धर्माचे सुमारें दोन लक्ष लोक हिंदुस्थानांत होते. त्यांपैकीं तीन चतुर्थांश जुन्या मताचे होते व एक चतुर्थांश लोक महायानी पंथाचे होते.

वुईल्सन व कोलब्रूक म्हणतात कीं, बौद्धांचा ऱ्हास कुमारिल भट्ट नांवाच्या ब्राह्मणाच्या चिथावणीवरून बौद्ध लोकांचा इ० स० च्या आठवे शतकांत जो भयंकर छळ झाला, त्यामुळें झाला. रे०

१ ऱ्हिसडेविस ३१५—३१९.

डब्ल्यू० टी० उइल्किन्स लिहितात कीं, "बौद्ध धर्माचे अनुयायांचा इतका छळ झाला कीं, ते सर्व मारले गेले, किंवा त्यांना देशांतून हांकून लावलें, किंवा त्यांना आपला धर्म बदलण्यास भाग पाडलें. हिंदुस्थानांतून बौद्धधर्माची उचलबांगडी जुलमामुळें जशी झाली, तसें धर्माच्या छळाचें उदाहरण क्वचितच सांपडेल." परंतु ह्यांत सत्याचा अंश मुळींच नाहीं.

बौद्ध धर्माचा ऱ्हास होण्याचीं खरीं कारणें अशीं आहेत कीं, गौतमबुद्धानें तो धर्म स्थापन केला, तेव्हां त्याचें जें उज्ज्वल नीतिविषयक स्वरूप होतें तें हलके हलके ग्रीक, सिथियन, तार्तर वगैरे लोकांच्या संगतीमुळें मलिन झालें. या लोकांनीं बौद्ध धर्म स्वीकारला खरा, परंतु तो स्वीकारतांना त्यांनीं आपल्या रानटी चालीरीति पूर्णपणें सोडल्या नाहींत. त्यांच्या संसर्गानें बौद्ध धर्मांत मूर्तिपूजा शिरली व महायान पंथास सुरुवात झाली. आपल्या धर्माचें व आपल्या उपदेशकांचें लोकांवर वजन ज्यास्त पडावें म्हणून त्यांनीं संस्कृत भाषेचा अंगीकार केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वीं बौद्ध धर्माचा सामान्य लोकांत जो प्रसार होत होता तो बंद होऊन, ब्राह्मण धर्माप्रमाणेंच तो थोडक्या लोकांना समजूं लागला. बुद्ध, धर्म, व संघ या तीन शब्दांचा लोकांचे मनावर जो एक विलक्षण परिणाम होत होता तो नाहींसा झाला. बौद्ध धर्माचा जसजसा ऱ्हास होत चालला, तसतसा ब्राह्मणधर्माचा जोर जास्त वाढूं लागला. ख्रिस्ती शकापूर्वीं सुमारें १००वर्षें व ख्रिस्ती शकानंतर सुमारें साडेतीनशें वर्षांत कोणीही शक्तिमान असा ब्राह्मणधर्मी राजा झाला नाहीं. हिंदुस्थानावर परदेशी लोकांचे हल्ले वारंवार येऊं लागले. त्या परदेशी

---

१ ऱ्हिसडेविसचें बुधिस्ट इंडिया पानें ३१५-३१९.

राजांकडून अर्थातच ब्राह्मण धर्मास आश्रय मिळाला नाहीं. यवन, शक व पल्हव राजांकडून आपणांस आश्रय मिळत नाहीं अशी ब्राह्मणांची तक्रार होती. इ० स० चे तिसरे शतकाचे मध्याचे सुमारास वेमकदफिसीज राजा झाला. त्याचेकडून मात्र ब्राह्मण धर्मास आश्रय मिळाला. त्याचे नाण्यांवर नंदी व शिव ह्यांच्या मूर्ति आढळतात व तो आपल्यास महेश्वरभक्त असें म्हणवितो. त्याचे पश्चात् जे कुशान राजे झाले, त्यांनीं ब्राह्मणांचे देवांस आश्रय दिला खरा, परंतु ग्रीक, झोरोऑस्ट्रियन व बौद्ध यांचे धर्मासही त्यांनीं आश्रय दिला. गुप्त राजाचे कारकीर्दींत मात्र केवळ ब्राह्मण धर्मासच उत्तेजन मिळण्यास सुरुवात झाली. समुद्रगुप्त व कुमारगुप्त यांनीं अश्वमेधाची पुनः सुरुवात केली. समुद्रगुप्तास कविराज ही पदवी मिळाली. त्यानें कवींस उत्तेजन दिलें, इतकेंच नव्हे तर स्वतःही त्यानें काव्यें लिहिलीं. विक्रमादित्याबद्दल ज्या आख्यायिका ऐकण्यांत येतात त्या जर कोणा राजास लागू पडण्यासारख्या असतील तर त्या दुसऱ्या चंद्रगुप्तासच लागू पडतात. त्यानें माळवा प्रांत काबीज केला, व तेथील शक क्षत्रप यांस हांकून दिलें. कुशान लोकांसही त्यानें घालवून दिलें. त्यानें उज्जनी हें आपलें राजधानीचें नगर केलें, व विक्रमादित्य ही पदवी त्यानें धारण केली. सहावे शतकांत विक्रमादित्य राजा झाला असल्याचें कोठें दिसत नाहीं. विक्रमादित्य शकारीचे वेळेस नवरत्नें असल्याची कल्पना खरी दिसत नाहीं. वराहमिहिर यानें पंच सिद्धांतिका नांवाचा ग्रंथ लिहिला.

---

१ या नवरत्नांचीं नांवें:—धन्वन्तरिक्षपणकामरसिंहशङ्कुवेतालभट्टघटखर्परकालिदासाः । ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै वररुचिर्नव विक्रमस्य ॥ १ ॥ सुभाषितरत्नभाण्डागारम् पृ. ३८.

चंद्रगुप्त विक्रमादित्य याचा मृत्यु इ० स० ४११ व ४१४ या सालांचे दरम्यान झाला असल्याकारणानें ते दोघे समकालीन नव्हते. वराहमिहिर इ० स० ५८७ सालांत वारला. राजतरंगिणी ग्रंथांत विक्रमादित्य शकारी विद्वान् लोकांचा आश्रयदाता असल्याचें लिहिलें आहे. नवरत्नांपैकीं कालिदास हा चंद्रगुप्ताचे वेळेस होता.[२]

राजाश्रय नसल्याकारणानें ब्राह्मण धर्माचा जो ऱ्हास होऊं लागला होता, तोच ब्राह्मण धर्म गुप्ताचे साम्राज्यांत पुन्हा उदयास येऊं लागला व तेव्हांपासून ब्राह्मणांचा धर्म व त्यांचें वाङ्मय फार झपाट्यानें वाढावयास लागलें. आपला धर्म लोकांना ज्यास्त पसंत पडावा व त्याचा पाया शास्त्रीय पद्धतीवर रचावा या हेतूनें ब्राह्मण लोक मोठमोठे ग्रंथ लिहावयास लागले. स्मृति, पुराणें व भाष्यें याच कालांत लिहिलीं गेलीं.

पूर्वीं आपस्तंब, बौधायन, कठ, आश्वलायन वगैरे शाखांचीं सूत्रें होतीं; तीं समजण्यास कठीण होतीं, म्हणून आतां अनुष्टुप छंदाचे श्लोकांत, त्यांच्या स्मृति लिहिण्यांत आल्या. या नव्या ग्रंथांत पूर्वींच्या कांहीं चालींचा निषेध केल्याचें आढळतें. उदाहरणार्थ, गोवध यज्ञांत सुद्धां बंद केला; नियोगाची चाल मोडून टाकली; यज्ञाकरितां पशुवध मात्र कायम ठेवला. ह्या पद्यस्मृति कुशान व गुप्त कालांत लिहिल्या गेल्या याचें प्रत्यंतर मनुस्मृतींतील दहावे अध्यायाचे ४३–४४ श्लोकांत दिसून येतें. त्यांत असें सांगितलें आहे

---

२ कालिदासानें रघुवंशाच्या कुमारादिग्विजयांत जें हूण लोकांचें पराजयाचें वर्णन केलें आहे तें स्कंदगुप्तास लागू पडतें. यावरून कालिदास स्कंदगुप्ताच्या वेळीं अगर त्याचे नंतर असला पाहिजे. प्रो. पाठक यांचा कालिदासावरील निबंध. ( इंडियन ऑटिक्वरी भाग ४१–नोव्हेंबर १९१३. )

कीं, पुंड्रक, द्रवीड, यवन, शक व पल्हव या जाती मूळच्या क्षत्रिय कुळांतील होत्या; परंतु त्या ब्राह्मणांस मानीतनाशा झाल्या, व वैदिक धर्मक्रिया त्यांनीं सोडून दिल्या कारणानें त्या जातींतील लोक शूद्र झाले. या जातींतील राजांनीं व लोकांनीं ब्राह्मणांचा अनादर केल्याचें यावरून उघड दिसतें व सदर्हू स्मृतींतील तसेंच महाभारतांतल्या अनुशासन पर्वांतील त्याच अर्थाचे श्लोक या लोकांची सत्ता नष्ट झाल्यानंतर व ब्राह्मणांचें वर्चस्व सुरू झाल्या-नंतर लिहिले असावेत. वायु, लिंग, मार्कंडेय व विष्णु या पुराणांना सांप्रतचें रूप त्याच वेळेस आलें असावें. ज्योतिष शास्त्राचे पंच-सिद्धांत, रोमक व पौलिश नांवाचें ग्रंथाचा हाच काळ होय. आर्य-भट्टाचा जन्म इ० स० ४७६ त झाला. वराहमिहिराचा मृत्यु इ०स० ५८७ त झाला. शबरस्वामींनीं आपलें मीमांसाभाष्य बहुधा इ०स०चे पांचवे शतकांत लिहिलें असावें. वार्तिककार कुमारिल भट्ट सातव्या शतकांत होते. वार्तिकतात्पर्य टीकेचा कर्ता वाचस्पति यानें उद्योग ग्रंथाचा कर्ता भारद्वाज याचा उल्लेख केला आहे. भारद्वाजाचा काल सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास असावा. शंकराचार्यांचे व त्यांचे शिष्य सुरेश्वर यांचे ग्रंथ यानंतर झाले. संस्कृत पुराणांप्रमाणें पाली भाषेंत दीपवंश व महावंश नांवांचे ग्रंथ आहेत. दीपवंश इ०स०चे चवथे शतकांतील आहे, व महावंश सहावे शतकांतील आहे. दोन्ही ग्रंथांचा हेतु बौद्ध धर्माचा प्राचीन काळापासूनचा इतिहास लिहिण्याचा आहे.

जैन धर्माचा स्थापनकर्ता वर्धमान ज्ञानपुत्र हा होय. त्याला जिन अथवा महावीरही म्हणतात. तो ज्ञात नांवाचे क्षत्रिय कुळां-तला असून वैशाळीचे राजघराण्यांपैकीं होता. ह्या धर्माचा मुख्य हेतु मनुष्यास मुक्ति मिळण्यास मार्ग म्हणजे त्यानें तीन रत्नांचा उपयोग करणें हा होय. तीं तीन रत्नें म्हणजे सम्यक्भक्ति,

सम्यग्ज्ञान व सम्यक्कर्म हीं आहेत. या प्रत्येक रत्नांचे पुष्कळ पोट विभाग आहेत. जैन लोकांचा धर्म हिंदुस्थानांत अद्याप पुष्कळ ठिकाणीं आहे. या धर्माचे अनुयायी धनाढ्य आहेत. अबू व शत्रुंजय पहाडावरील व अमदाबाद, मुंबई, कलकत्ता, वगैरे ठिकाणचीं त्यांचीं मंदिरें फार सुरेख व नामांकित आहेत. त्यांचे जती फार विद्वान् असतात. त्या लोकांचें वर्तन निस्पृह व शुद्ध असतें. त्यांच्या धर्माच्या लोकांत त्यांचें फार वजन आहे व धर्माचें व विशेषें-करून प्राणिसंरक्षणाचे कामीं त्यांची फारच मदत असते. हिंदुस्थानांतील पांजरपोळ संस्थांना जैन लोकांचीच विशेष मदत आहे.

---

# भाग १२ वा.

—:०:—

## उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानें.

इ०स० ६४७—१२००

### तिबेट.

इ०स० ५५० च्या सुमारास चीनचा हिंदुस्थानच्या पश्चिम प्रांतांवरील अंमल नाहींसा होऊन, एफ्यालिटीज ऊर्फ गौरहूण लोकांचा अंमल बसला. त्यांचे राज्यांत काश्गारिआ ( सांप्रतचे काषार ) काश्मिर, आणि गांधार या प्रांतांचा समावेश होत होता.

सुमारें ५६५ सालीं या गौरहूण लोकांचा अंमल नाहींसा होऊन, तुर्क व इराणी लोकांचा अंमल बसला. पण पुढें एकट्या तुर्कांचाच अंमल तेथें राहिला. इ ० स० ६३० मध्यें हि—ऊएन—त्संगला कपीस ( काबूल ) पावेतों तुर्क लोकांचे परवान्यानेंच प्रवास



बुद्धदेव ( आयंगार यांच्या हिंदुस्थानच्या प्राचीन इति-
हासावरून हें चित्र घेतलें आहे. )

करितां आला. ६३० पासून ६४८ पावेतों या प्रांतांवर चिनी लोकांचें वर्चस्व होतें. या वेळेस तिबेटचा राजा स्रंग–त्संग–गंपो नांवाचा होता. त्यानें इ०स०६३९ मध्यें ल्हासा शहराची स्थापना केली. देशांत बौद्ध धर्माचा प्रसार केला, व तिबेटी लिपी काढली. त्यानें नेपाळची राजकन्या भ्रुकुटी हिच्याशीं लग्न केलें; व दोन वर्षांत ( इ० स० ६४१ ) चिनी बादशहाची कन्या वेनशंग हिच्याशींही विवाह केला. त्या दोघीही बौद्ध धर्माच्या होत्या. त्यांचा त्या तरुण राजावर पूर्ण पगडा बसला व बौद्धांनीं त्या राजाला अवलोकितेश्वर ( बुद्धाचा अवतार ) असा किताब दिला. नेपाळच्या राजकन्येस हरिततारा व चिनी राजकन्येस धवलतारा असे किताब दिले. या विवाहासंबंधानें चीनची व तिबेटची चांगलीच दोस्ती झाली. ६६१ पासून६६९ पर्यंत चीनचा अंमल इराणापासून कोरियापर्यंतचा होता. पुढें तिबेटशीं त्यांचा बेबनाव झाला, व ६७० सालांत तिबेटच्या लोकांनीं चिनी लोकांचा मोठा पराभव केला. या वेळेस काश्गारिआ प्रांत चीन लोकांचे ताब्यांतून गेला. तो त्यांनीं ६९२ सालीं परत घेतला इ० स० ७१३ पर्यंत तुर्क, अरब व तिबेटी लोकांशीं चीनच्या लढाया चालल्या होत्या. त्या सालांत चीनचा बादशहा हि-उएन–त्संग यानें आपल्या पराक्रमानें या तिन्ही लोकांवर वर्चस्व मिळविलें व त्याचा अंमल काश्मिर प्रांतापर्यंत बसला. त्यांत काश्मिरचा राजा चंद्रापीड याला इ०स० ७२० मध्यें राजा हा किताब दिला. इ०स० ७७३ मध्यें चंद्रापीडाचा भाऊ मुक्तापीड ललितादित्य यासही त्यानें तोच किताब दिला. परंतु चीनची ही भरभराटी फार दिवस टिकली नाहीं. ७५१ सालीं कर्लक लोकांच्या मदतीनें अरब लोकांनीं त्यांचा पूर्ण पराभव केला. या पराभवाचे वेळेस कांहीं चिनी कैदी समरकंद येथें आणून ठेवले होते. त्यांनीं तेथें कागद

तयार करण्याचा धंदा सुरू केला. तेथून ती युक्ति युरोपांत गेली. त्यापूर्वीं युरोपांत कागद तयार करण्याचें माहीत नव्हतें. युरोपांतील कागदांनीं जगावर काय परिणाम गाजविला आहे हें लिहिण्याचें कारण नाहीं. या वेळेपासून हिंदुस्थान व चीन यांचे दरम्यान राजकीय दळणवळण जें बंद पडलें, तें इंग्रज लोकांनीं १८८९ सालीं उत्तर ब्रह्मदेश काबीज करीपर्यंत पुनः सुरू झालें नाहीं.

इ० स० ७४३–७८९ मध्यें बौद्ध धर्माचा प्रसार तिबेटांत जोरानें झाला. शांतरक्षित व पद्मसंभव नांवांचे दोन साधु हिंदुस्थानांतून चीनचे बादशहानें नेले. त्यांच्या मदतीनें जी धर्मव्यवस्था सुरू केली ती अद्याप लामा पद्धतीनें चालू आहे. इ० स० १७५१ सालीं चीनचा अंमल तिबेटावर पूर्णपणें बसला.

---

## २.

## नेपाळ.

अशोकाचे कारकीर्दींत मौर्यांचा नेपाळ प्रांतावर प्रत्यक्ष अंमल होता. त्या प्रांतांतील पाटण शहरांत अशोक राजा व त्याची मुलगी यांनीं ज्या इमारती बांधल्या होत्या, त्यांतील कांहीं विद्यमान आहेत, त्यांवरून या गोष्टीस बळकटी येते. चौथे शतकांत समुद्रगुप्ताचे वेळेस तो प्रांत गुप्तांचे मांडलिक संस्थानांपैकीं एक होता, असें प्रयाग येथें असलेल्या समुद्रगुप्ताचे स्तंभावरील लेखांत लिहिलें आहे. नंतर तो प्रांत स्वतंत्र झाला. हर्ष राजानें त्या प्रांता-

---

२कर्कपॅट्रिकचा account of Nepal व राइटची History of Nepal व इतर ग्रंथांचे आधारानें रा. जगन्नाथ रघुनाथ अजगांवकर यांनीं ऐतिहासिक, पुस्तकमाला नंबर १८ चे पुस्तकांत बरीच माहिती दिली आहे.

वर आपलें वर्चस्व बसविलें होतें. पुढें अंशुवर्मा राजानें तेथें ठाकुरवंश स्थापित केला. अंशुवर्मा इ० स० ६४२ त मरण पावला. आठवे शतकाचे आरंभीं नेपाळ देश तिबेटच्या कह्यांत होता. इ० स० ८७९ सालीं नेपाळचा स्वतंत्र शक सुरू झाला. यावरून तिबेटचें वर्चस्व तेव्हां नष्ट झालें असावें.

नेपाळ प्रांत कधींहि मुसलमानांचे ताब्यांत गेला नाहीं. गुरखे लोकांनीं तो इ० स० १७६८ सालीं जिंकला. ते लोक राजपुतान्यांतून आले होते. ते हिंदु होते. त्यांचेपूर्वीं मल्लवंशाचे रजपूत राजे १३ वे शतकापासून राज्य करीत होते. त्यांचेपूर्वीं अयोध्येहून आलेले हरसिंहदेव याचे वंशाच्या राजांनीं इ० स० १३२४ पासून राज्य केलें.

अशोकानें नेपाळांत बौद्ध धर्म सुरू केला. त्याच्या मुलीनें राजधानीजवळ जीं मंदिरें वगैरे बांधलीं तीं अद्याप दाखविण्यांत येतात. सातव्या शतकांत महायान पंथाचें प्राबल्य झालें व शेवटीं हिंदुस्थानांतून ज्याप्रमाणें व ज्या कारणांनीं बौद्ध धर्माचें उच्चाटन झालें त्याप्रमाणें व त्याच कारणांनीं नेपाळांतही तो धर्म बहुतेक नामशेष झाला.

---

## ३.

## कामरूप ऊर्फ आसाम.

सांप्रतच्या आसाम प्रांतापेक्षां कामरूप देश जरा विस्तृत होता. कारण त्यांत कुचबिहार संस्थान व रंगपूर जिल्हा यांचा समावेश

होत होता. त्याची पश्चिमेकडील हद्द रंगपूर जिल्ह्यापावेतों होती. इ० स० ३६० किंवा ३७० सालांत समुद्रगुप्तानें अलाहाबाद येथील स्तंभावर कामरूप देश गुप्त साम्राज्याचे सरहद्दीवर असून गुप्त राजांना खंडणी देत असल्याचें लिहिलें आहे. त्यापूर्वीचा या प्रांताचा कांहीं इतिहास उपलब्ध नाहीं. यानंतर पुढें हि-उएन-त्संग इ० स० ६४३ त नालंद मठांत राहात होता. तेव्हां त्याला कामरूपचे राजानें आपल्या भेटीस यावयास लाविलें, असा त्या प्रवाशाच्या लेखांत मजकूर आहे. कांहीं दिवस तेथें राहिल्यानंतर कनोजचा राजा हर्षशिलादित्य यानें कामरूपचे राजास त्या प्रवाशास कनोजला पाठविण्याबद्दल लिहिलें, परंतु कामरूपचे राजानें उत्तर पाठविलें कीं, शक्य असेल तर हर्षानें त्याचें डोकें कापून न्यावें, परंतु सदर चिनी प्रवाशास मी पाठविणार नाहीं. परंतु शेवटीं हर्ष राजानें सक्तीचा हुकूम पाठविला तेव्हां कामरूपचा राजा हि-उएनत्संग यास बरोबर घेऊन हर्ष राजाचे भेटीस आला.

कामरूपच्या या राजाचें नांव भास्करवर्मा ऊर्फ कुमार असें होतें. तो मूळचा कूच असावा. हि-उएन-त्संग यानें त्याला जरी ब्राह्मण म्हटलें आहे तरी तो क्षत्रिय असावा असें त्याचे नांवावरून वाटतें. या प्रांतांत बौद्ध धर्माचा प्रवेश कधींही झाला नाहीं.

पुढें बंगालचे पाल राजांचे राज्यांत हा प्रांत मोडूं लागला. बारावे शतकांत कुमारपाल राजानें वैद्यदेव नांवाचा आपला प्रतिनिधि या प्रांतावर नेमला होता.

इ० स० १२२८ सांत शान लोकांपैकीं आहोम टोळींचे हल्ले या प्रांतावर सुरू झाले. क्रमाक्रमानें ते या प्रांताचे मालक झाले. व त्यांनीं जो वंश स्थापन केला, तो इ० स० १८२९ त इंग्रजांचे ताब्यांत तो प्रांत येईपर्यंत टिकला.

या प्रांताचें महत्त्व मुख्यत्वेंकरून आहे तें चीन प्रांतांतून मंगो-

लियन लोकांच्या झुंडी या मार्गानें येत असत म्हणून आहे. या प्रांतांत राहणारे पुष्कळ लोक मंगोलियन जातीचे आहेत. बंगाल प्रांतांत बौद्ध व हिंदु धर्मास जें तांत्रिक रूप आलें आहे, तें या प्रांतांत जे मंगोलिया प्रांताचे लोक येऊन राहिले त्यांच्या संसर्गा-मुळें आलें. शाक्तपंथाचें कामाख्या नांवाचें जें प्रसिद्ध मंदिर आहे, तें या प्रांतांत गौहाटी येथें आहे. जारणमारणादि मंत्रांचा हा देश असल्याबद्दल हिंदुस्थानांत त्याचा लौकिक आहे. ब्राह्मण लोक आर्येतर लोकांना व राजांना आपले धर्मांत व आपले ताब्यांत कसे आणतात हें या देशाच्या धर्मविषयक इतिहासावरून चांगलें समजतें.

या प्रांतांचें महत्त्व दुसऱ्या एका कारणामुळें आहे. तें कारण म्हटलें म्हणजे शेवटपावेतों हा प्रांत मुसलमानांचे ताब्यांत गेला नाहीं. या कामीं मुसलमानांचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. बंगाल व बहार प्रांत काबीज करणारा बखत्यार याचा मुलगा महंमद यानें या प्रांतावर इ. स. १२०४—५ सालाचे सुमारास स्वारी केली. पश्चिम सरहद्दीवर असलेल्या करतोया नदीच्या कांठाकांठानें चाल करून दार्जिलिंगच्या उत्तर बाजूच्या पहाडापर्यंत त्यानें प्रवेश केला. परंतु तेथून त्याला परत फिरावें लागलें. कामरूपचे लोकांनीं नदीवर असलेला पुष्कळ कमानीचा दगडी पूल आयते वेळीं पाडून टाकला व त्यामुळें महंमदचे बहुतेक लोक नदींत बुडून मेले. महंमद स्वतः १०० स्वारांनिशीं पोहून पार पडला परंतु तो आजारी पडला व सन १२०५—६ सालीं त्याचा कोणीं खून केला. त्यानंतरच्याही मुसलमानांच्या स्वाऱ्या याप्रमाणें निष्फळ झाल्या. इ. स. १८१६ सालांत ब्रह्मी लोकांनीं हा देश जिंकीपर्यंत तो स्वतंत्र होता. इ. स. १८२५ त ब्रह्मी लोकांचा पराभव करून इंग्रजांनीं हा प्रांत आपले ताब्यांत घेतला.

---

४

## काश्मीर.

अशोकाचे वेळेस हा देश मौर्य साम्राज्यांत मोडत होता. कनिष्क व हविष्क यांचेही राज्यांत तो सामील होता. हर्ष राजाच्यानें हा प्रांत घेववला नाहीं. परंतु बुद्धाचा एक दांत काश्मीरच्या राजाजवळ होता तो त्यानें त्या राजास आपल्याला द्यावयाला लाविलें. तो दांत हर्ष राजानें कनोज येथें नेऊन ठेविला.

हर्ष राजाच्या हयातींत काश्मीर प्रांतांत दुर्लभवर्धनानें कर्कोट वंश स्थापन केला. त्याचे नातू चंद्रापीड व मुक्तापीड ऊर्फ ललितादित्य या दोघांस चीनच्या बादशहानें राजा हा किताब दिला. ललितादित्यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. त्यानें कनोजचा राजा यशोवर्मा याचा पराभव केला व तिबेट, भूतान, व सिंधूनदीवरील तुर्क लोक यांनाही जिंकलें परंतु त्याची कीर्ति मुख्यत्वेंकरून त्यानें बांधलेलें सूर्याचें मार्तंड मंदिर यावरून आहे. हें मंदिर अद्यापि आहे. त्याचा नातू जयपीड ऊर्फ विजयादित्य याचे संबंधानें बऱ्याच गोष्टी राजतरंगिणींत लिहिल्या आहेत. त्या सर्व खऱ्या आहेत असें वाटत नाहीं. परंतु तो राजा क्रूर व लोभी होता असे बिल्हणाचे पुढील आशयाचे लेखावरून स्पष्ट दिसून येतें. " याप्रमाणें या प्रसिद्ध राजाचें एकतीस वर्षें राज्य चाललें. त्याच्या मनोवृत्ति अनावर होत्या. राजांच्या व पाण्यांतील माशांच्या स्थितींत बरेंच साम्य आहे. ज्याप्रमाणें मासे वाईट पाण्याच्या किंवा इतर आमिषानें मोहित होऊन जेव्हां आपलें स्थळ सोडितात, तेव्हां ते कोळ्याच्या जाळ्यांत सांपडून मरण पावतात; त्याप्रमाणें राजे जेव्हां संपत्तीच्या लोभाच्या पाशांत सांपडतात, तेव्हां ते अनीतीच्या मार्गाचें अवलंबन करितात व त्यांचा अंत कष्टमय होतो. "

इ० स० ८५५ पासून ८८३ पावेतों अवंतीवर्मा नांवाचा राजा येथें राज्य करीत होता. तो विद्वान् लोकांचा मोठा अश्रयदाता होता. त्याचा प्रधान सुय्य यानें फार उपयोगी असे तलाव व पाट बांधिले. त्याच्या नंतर शंकरवर्मा नांवाचा राजा झाला. तो जुलमी होता.

त्याचे राज्यांत ललिया नांवाचे ब्राह्मणानें काबूलच्या तुर्की शाहिया राजास पदच्युत केलें व आपला हिंदू शाहिय नांवाचा वंश स्थापन केला. तो इ० स० १०२१ पर्यंत चालू होता. त्या सालीं मुसलमान लोकांनीं तो नाहींसा केला.

इ०स० ९१७ ते ९१८ सालांत पार्थ नांवाचा बाल राजा काश्मिरच्या गादीवर होता. त्याचा कारभार पंगू नांवाचा त्याचा बाप पाहत होता. त्याच्या कारकिर्दींत एक भयंकर दुष्काळ पडला. त्याचें वर्णन एका ब्राह्मण ग्रंथकारानें दिलें आहे. एका ठिकाणीं त्यानें असें म्हटलें आहे. " वितस्ता ( झेलम ) नदींत इतकीं प्रेतें फुगून पडलीं होतीं कीं, नदीचें पाणी दिसण्याची सुद्धा मारामार पडे. देशांत चोहींकडे सर्व जमिनीवर इतकीं हाडें पडलीं होतीं कीं, पहाणारास आपण एकाद्या विस्तीर्ण स्मशानांत आहोंत असें वाटे. राजाचे प्रधान व तंत्री ( सेनाधिकारी ) यांनीं मात्र पूर्वींचे साठविलेले तांदूळ अति महाग भावानें विकून पुष्कळ द्रव्य मिळविलें. तंत्री लोकांचें देणें देण्याकरितां, जो मनुष्य लोकांकडून अशा रीतीनें पैसा वसूल करून ज्यास्त पैसा आपल्याला देईल अशा मनुष्याला राजा प्रधान नेमीत असे. आपण स्वस्थ घरांत बसून बाहेर प्रचंड वाऱ्या-पावसानें लोकांचे हाल होत असलेले एखाद्या माणसानें पहात बसावें, त्याप्रमाणें हा क्रूर पंगू राजा आपल्या राजवाड्यांत बसून आपल्या सुखाची प्रशंसा करीत, प्रजेचे हाल पाहात असे. "

पार्थराजा आपल्या प्रजेस चाबकानें मारी परंतु त्याचा मुलगा उन्मत्तावंती लोकांना विंचवांचे दंश करवी. इतिहासकार लिहितो, "माझी कथा पुढें पाऊल टाकण्यास कचरते. या राजाचें वर्णन ऐकून भ्यालेल्या घोडीसारखी ती चमकून थबकते." या राजानें प्रत्यक्ष आपल्या बापाचा खून केला. याच्या सर्व पशुतुल्य कृती लिहिणें हें फार घाणेरडें काम होईल. सुदैवानें त्याचें राज्य लवकरच संपलें. त्यास एक भयंकर व्याधि जडली व त्यामुळें त्याचा इ०स० ९०९ वर्षीं अंत झाला.

दहाव्या शतकाच्या शेवटीं काश्मिरांत दिद्दा नांवाची जुलमी राणी राज्य करीत होती. तिनें सुमारें ५० वर्षें वाईट रीतीनें राज्यकारभार केला. अकराव्या शतकांत कलश व हर्ष नांवाचे राजे झाले. हर्षानें शंकरवर्म्याप्रमाणेंच देवळांचीं उत्पन्नें जप्त केलीं.

इ. स. १३३९ त एका मुसलमान वंशाकडे काश्मीरचें राज्य आलें, व मुसलमानी धर्माचा जरी बराच प्रसार झाला, तरी त्या प्रांताच्या नैसर्गिक स्थितीमुळें अकबराच्या वेळेपर्यंत हिंदुस्थानच्या राजाच्या ताब्यांत तो गेला नाहीं. अकबरानें इ. स. १५८७ सालीं तो जिंकून आपले राज्यांत सामील केला.

---

५.

## दिल्ली, कनोज, अजमीर आणि ग्वाल्हेर.

कनोज, ऊर्फ कान्यकुब्ज हें फार प्राचीन नगर होय. महाभारतांत त्याचा उल्लेख आहे. व ख्रि. पू. चे दुसरे शतकांत पतंजलीनें तें शहर प्रसिद्ध असल्याचें लिहिलें आहे. त्याचा खात्रीलायक उल्लेख चिनी प्रवासी फाहि-एन याचे लेखापूर्वीं सांपडत

नाहीं. सदर प्रवासी दुसरा चंद्रगुप्त विक्रमादित्य याचे कारकीर्दींत कनोज शहरीं आला. ( इ. स. ४०९ ) त्या वेळेस तेथें हीनयान बौद्धांचे तीन मठ व एक स्तूप होता. परंतु पुढें श्रीहर्ष राजाचे वेळेस तेथें शंभर मठ असून दहा हजार बौद्ध धर्माचे लोक होते. हर्षानें कनोज नगरीं आपली राजधानी केली. गंगानदीच्या तीरावर ह्या शहराचा विस्तार सुमारें चार मैल होता. तेथें सुंदर बागबगीचे व तलाव पुष्कळ होते, व तेथील रहिवासी उंचीं उंची रेशमी कपडे वापरीत असून ललितकलांत कुशल होते.

कनोज हें पूर्वी पांचाळ देशाची राजधानी होतें. हर्षराजाचे मृत्यूनंतर ( इ. स. ६४७ ) आठव्या शतकांत यशोवर्मा सिंहासनारूढ झाला. प्रसिद्ध कवि भवभूति व वाक्पतिराज हे दोघे या राजाचे आश्रित होते. यशोवर्म्याला काश्मिरचा राजा ललितादित्य मुक्तापीड यानें पदच्युत केलें. ( इ. स. ७४१ ). त्याचे मागून झालेला राजा वज्रायुध यालाही जयापीडानें पदच्युत केलें इ. स. ८०० च्या सुमारास वज्रायुधाच्या नंतरचा राजा इंद्रायुध याला बंगालचा राजा धर्मपाळ यानें पदच्युत केलें. धर्मपाल स्वतः राज्य करीत नव्हता. त्यानें राज्यकारभार चक्रायुधाकडे सोपाविला. त्या चक्रायुधाला इ० स० ८१६ चे सुमाराला गुर्जर प्रतिहार राजा नागभट यानें पदच्युत केलें. त्याचा वंश बरेच वर्षं चालला त्याचेच वंशांत मिहिरभोज नांवाचा राजा झाला. ( इ. स. ८४० ते ८९० ) हा राजा मोठा पराक्रमी होता. त्यानें पंजाबांतील सतलज नदीचे अलीकडील प्रांत, रजपुतस्थानाचा बराच मोठा भाग, आग्रा, अयोध्या व ग्वाल्हेर हे प्रांत काबीज केले. त्याचप्रमाणें काठेवाड प्रांत गुजराथ व माळवा हेही प्रांत त्याचे ताब्यांत आले. पूर्वेस त्याचें राज्य बंगाल्यापर्यंत होतें. नैर्ऋत्य दिशेस राष्ट्रकूट व दक्षिणेस बुंदेलखंड प्रांतापर्यंत त्याचें राज्य विस्तारलें

हात. भोजराजा आदिवराहाचा अवतार होता अशी समजूत होती. त्याचें राज्य त्याचा मुलगा महेंद्रपाल यानें कायम राखिलें. महेंद्रपालाचा गुरु कर्पूरमांजिरीचा कर्ता राजशेखर कवि हा होता. महेंद्रपालानंतर त्याचा मुलगा दुसरा भोज, व या भोजानंतर त्याचा सावत्र भाऊ महिपाल असे राजे झाले. ( इ. स. ९१० ते ९४० ) इ. स. ९१६ त राष्ट्रकूटाचा राजा तिसरा इंद्र यानें प्रतिहार वंशाचा पराभव केला, व कनोज शहर घेतलें. या वेळेपासून कनोज राज्याचें वैभव कमी होऊं लागलें. एकेक प्रांत त्याचे ताब्यांतून गेला. महिपालानंतर देवपाल व देवपालानंतर विजयपाल असे राजे झाले.

इकडे गझनीचा सुलतान सबक्तगीन याचे हिंदुस्तानावर हल्ले सुरू झाले. त्यानें पंजाबचा राजा जयपाळ याचा पराभव केला. त्या वेळेस कनोजचा राजा राज्यपाळ हा जयपाळचे बाजूस होता. इ. स. १०१८ त गझनीचा सुलतान महमुद हा कनोजवर चाल करून आला. तेव्हां राजपाळानें त्याच्याशीं तह केला, व कनोज शहर सोडून देऊन, गंगेच्या दक्षिण तीरावरील बारी शहरांत तो रहावयास गेला.

राज्यपाळ हा मुसलमानांना शरण गेला, ही गोष्ट हिंदु राजांना न आवडून त्यांनीं कनोज शहरावर हल्ला केला व त्यास मारिलें. या कामांत चंडेलचा राजा गंड हा पुढारी होता. सुलतान महंमद यास ही हकीकत कळली तेव्हां त्याला फार त्वेष आला, व तो इ० स० १०१९ त फौज घेऊन हिंदुस्तानावर चालून आला. इ० स० १०२० त त्यानें बारी शहर घेतलें, व तो गंड राजावर चाल करून गेला. तो राजा भयभीत झाला. महमुदास प्रतिरोध न करितां तो पळून गेला. पुढें इ० स० १०९०

चे सुमारास गहरवार कुळीचा राजा चंद्रदेव यानें कनोज शहर घेऊन आपला वंश तेथें स्थापित केला. तो वंश इ० स० ११९३ पर्यंत चालला. त्या सुमारास शहाबुद्दीनानें कनोज शहराचा पूर्णपणें नाश केला. त्या सालीं राजा जयचंद हा कनोज सोडून काशीकडे पळून गेला. परंतु त्याचा पाठलाग करून शत्रूनें त्यास मारिलें. हा जयचंद म्हणजे ज्याची रूपवती कन्या पृथ्वीराज चव्हाण ऊर्फ राई पिठोर यानें स्वयंवर मंडपांतून उचलून घोड्यावर घालून नेली तोच होय. गहरवार वंशानंतर महोबाचे चंडेल राजे आठ पिढ्यांपर्यंत कनोजास राज्य करीत होते.

---

## दिल्ली.

इंद्रप्रस्थ, कुरुक्षेत्र व दिल्ली हीं सर्व शहरें एकच आहेत, अशा समजुतीमुळें दिल्ली शहर फार प्राचीन आहे, व त्याचा हिंदुस्थानाच्या सार्वभौमत्वाशीं आजपर्यंत संबंध जुळविण्याची इंग्रज लोकांना संवय लागली आहे. त्यामुळें दिल्ली शहर इ० स० चे अकराव्या शतकांत मात्र स्थापन झालें, या गोष्टीची त्यांना अगदीं विस्मृति पडते. पाटलिपुत्र, उज्जयिनी, काशी, प्रयाग वगैरे शहरें दिल्लीपेक्षां फार प्राचीन आहेत. दिल्लीची स्थापना अंगपाळ नांवाच्या रजपूत राजानें अकराव्या शतकांत केली. तेथील ज्या प्रसिद्ध लोहस्तंभावर चंद्रराजाचें स्तुतिस्तोत्र खोदलें आहे, तो स्तंभ त्यानें इ० स० १०५२ सालांत मथुरेहून तेथें आणिला.

सांभर (शाकंभरी) संस्थानांत अजमीर शहर होतें. त्या संस्थानांत चव्हाण कुळीचे पुष्कळ रजपूत राजे झाले. त्यांपैकीं पृथ्वीराज व विशाळदेव यांचींच नांवें लिहिण्यासारखीं आहेत.

विशाळ देवानें दिल्ली जिंकून घेतली असा लौकिक आहे. तो विद्वानाचा चाहता असून स्वतः त्यानें हरकली नाटक लिहिलें, व ललितविग्रहराज नाटक त्याचे बहुमानार्थ लिहिलें आहे. तो इ. स. ११६३ सालीं मृत्यु पावला. त्याचे नंतर तीन राजे होऊन पुढें त्याचा पुतण्या प्रसिद्ध पृथ्वीराज चव्हाण हा राज्यारूढ झाला. (इ. स. ११७९.) पृथ्वीराजानें चंदेल राजा परमाल याचा पराभव केला व इ. स. ११८२ त महोबा शहर घेतलें. व इ. स. ११९१ सालीं शहाबुद्दीनच्या फौजेचा पराभव करून त्यास सिंधू नदी-पलीकडे हाकून लाविलें. परंतु पुढील सालीं शहाबुद्दीन नवीन फौज घेऊन परत आला, व त्यानें पृथ्वीराजाचा पराभव करून त्यास ठार मारिलें. (११९२) इ. स. ११९३ व इ. स. ११९४ मध्यें शहाबुद्दीनानें दिल्ली व कनोज शहरें घेतलीं. इ. स. ११९६ त ग्वाल्हेर, ११९७ त अन्हिलवाडा, व १२०३ सालीं कालंजर अशीं शहरें घेतलीं, व उत्तर हिंदुस्थानचा तो पूर्ण मालक झाला.

त्यानें कनोज शहर घेतल्यानंतर तेथें राहणारे गहरवार लोक हे रजपुतस्थानांतील मारवाडचे वालुकामय प्रदेशांत राहावयास गेले. तेच पुढें राठोड या नांवानें प्रसिद्धीस आले, व त्यांची राजधानी जोधपूर हें शहर झालें. बाकीचीं रजपूत संस्थानांतील संस्थानेंहि याचप्रमाणें मुसलमानांच्या हल्ल्यामुळें स्थापित झालीं.

---

६

## जेजाक भुक्तीचे चंडेल व चेदीचे कलचूरी लोक.

यमुना व नर्मदा ह्या दोन नद्यांच्या मधल्या प्रदेशास जेजाक-

---

१ चंदबरदाई यानें 'पृथ्वीराज राइसा' नांवाचे काव्यांत पृथ्वीराजाचें सविस्तर चारित्र लिहिलें आहे.

भुक्ति असें नांव होतें. याच प्रांताला हल्लीं बुंदेलखंड असें म्हणतात. या प्रांताचे दक्षिणेकडील भागास पूर्वीं चेदीचा प्रांत म्हणत असत. तो प्रांत हल्लीं साधारणपणें मध्यप्रांत या नांवानें प्रसिद्ध आहे. या दोन प्रांतांत इ. स. चे १० वे व ११ वे शतकांत चंदेल व कलचुरी नांवाच्या वंशजांचे राजे राज्य करीत असत.

इ. स. ८३१ चे सुमारास जेजाकभुक्तीच्या परिहार राजाचा पराभव करून नन्नक चंडेल हा त्या प्रांताचा मालक झाला. परिहारापूर्वीं गहरवार राजे तेथें राज्य करीत होते. चंडेल राजांचीं मुख्य शहरें महोबा, कालंजर आणि खजुराहो अशीं होतीं. त्या शहरांत त्यांनीं भव्य मंदिरें व सुंदर सरोवरें बांधलीं. हे लोक मूळचे गोंड असून पुढें हिंदु झाले असावेत. प्रथम त्यांनीं छत्रपूरचें राज्य मिळविलें. तें वाढवीत वाढवीत यमुनानदीपावेतों कनोजचे सरहद्दीपर्यंत वाढविलें. हर्ष चंडेल यानें कनोजचे महीपाल राजास इ. स. ९१६ सालीं मदत केली. हर्षाचा मुलगा यशोवर्मा यानें महीपाळाचा मुलगा देवपाळ यास एक मौल्यवान विष्णूची मूर्ति आपल्या मंदिराकरतां द्यावयास लाविली. यशोवर्म्याचा मुलगा ढंग नांवाचा होता. हा १०० वर्षांचा होऊन इ. स. ९९९ सालीं वारला. खजुराहो येथील मोठमोठीं देवळें त्यानें बांधलीं. ९८९ अथवा ९९० सालीं गझनीचे राजाचा सुभा सबक्तगीन याजवर हल्ला करण्याकरतां लाहोरचा राजा जयपाळ व अजमीर आणि कनोज येथील राजे यांनीं जो कट केला, त्या कटांत तो सामील झाला. या सर्वांचा कुरम खोऱ्यांत मोठा पराभव झाला.

पुढें इ. स. १००८ सालीं अनंगपाल राजाला ढंगचा मुलगा गंड हा सामील झाला. परंतु त्या दोघांचाही गझनीच्या महंमदानें पराभव केला. पुढें १३ वर्षांनीं गंडाच्या मुलानें कनोजच्या

राजावर हल्ला करून त्यास ठार मारिलें. परंतु १००३ सालीं त्याला कालंजरचा किल्ला महमदाचे स्वाधीन करणें भाग पडलें.

याच सुमारास चेदीचा राजा गांगेय देव कल्चुरी याचे मनांत उत्तर हिंदुस्थानांत आपली सत्ता स्थापन करण्याचें येऊन तिरहूत-पर्यंत त्यानें आपलें राज्य वाढविलें. त्याचा मुलगा कर्णदेव व गुजराथचा राजा भीम या दोघांनीं मिळून माळव्याच्या प्रसिद्ध भोज राजाचा १०५३ सालीं पराजय केला. परंतु त्याच कर्ण-देवाचा कीर्तिवर्मा चंडेल यानें १०४९ ते ११०० सालाचे दर-म्यान पराभव केला. प्रबोधचंद्रोदय नांवाच्या प्रसिद्ध नाटकाच्या कर्त्याचा आश्रयदाता हाच कीर्तिवर्मा होय.

चंडेल राजांपैकीं सांगण्यासारखें असें अखेरचें नांव परमर्दि ऊर्फ परमाल याचें आहे. ११८२ सालीं पृथ्वीराज चव्हाणा-नें त्याचा पराभव केला, व १२०३ सालीं कुतुबुद्दिनानें त्याचा कलिंजर किल्ला घेतला.

चंडेल राजे हे पुढें १६ व्या शतकापर्यंत कसे तरी जीव धरून होते. परंतु त्यांचें महत्त्व अगदीं नाहींसें झालें होतें. मोंगीर शहरा-जवळील गिधाऊरचा राजा हा त्यांचा वंशज आहे.

चेदीच्या कलचुरी राजांचें नांव इ० स० ११८१ च्या पुढें ऐकूं येत नाहीं. चेदीचे राजे त्रयकूटक नांवाचा शक वापरीत होते. त्याचा आरंभ इ० स० २४८–२४९ पासून झाला. पश्चिम हिंदु-स्थानांत हा शक चालू होता.

---

७

## माळव्याचे परमार ऊर्फ पवार राजे[1]

परमार वंश अग्निकुळ रजपूत यांच्यापैकीं होता. हे परमार राजे प्राचीनकाळीं अबूचे पहाडाजवळ अचलगड व चंद्रावती नगर येथें राहात होते. यांचा मूळ पुरुष उपेंद्र ऊर्फ कृष्णराज नांवाचा होता. तो इ. स. ८०० पासून ८२९ पर्यंत राज्य करीत होता. त्याची व त्यानंतर झालेले वैरसिंह, सियक, वाक्पति व दुसरा वैरसिंह या राजांची फारशी खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. वाक्पति व त्याची राणी कमला देवी यांनीं एकुणचाळीस वर्षें राज्य केलें व नंतर वानप्रस्थ आश्रम धारण करून कुरुक्षेत्रीं त्यांनीं वास केला, व आपले गादीवर त्यांनीं आपला मुलगा दुसरा वैरसिंह यास बसविलें. हा वैरसिंह गयेस यात्रेकरितां गेला तेव्हां गौड देशचे राजासत्यानें मदत केली. ते उपकार स्मरून त्या राजानें आपली मुलगी ललिता ही वैरसिंहास दिली. त्यानें सत्तावीस वर्षें राज्य केलें व तो आपले वयाचे एकाहत्तरावे वर्षीं उज्जनीस मरण पावला.

त्याचा मुलगा सियक हा त्याचे गादीवर बसला. त्याला श्रीहर्षदेव, व सिंहभट, असेंही म्हणतात. त्यानें हूण जातीचे यवनांचा व मान्य खेत येथील राष्ट्रकूट राजा होट्टिग, याचा पराभव केला. त्याचे राणीचें नांव वडजा ऊर्फ वाग्देवी, असें होतें. भोज प्रबंधांत तिला रत्नावली असेंही म्हणतात. मान्यखेतचे राजाकडून त्यानें नऊ लाख दीनार नाणीं, ४९ हत्ती, २१ रथ

---

१या भागांतील हकीकत विशेषें करून मेजर ल्युअर्ड व रा. काशिनाथ कृष्ण लेले यांचे इंग्रजी निबंधाचे आधारानें लिहिली आहे.

३०० घोडे व बैलांच्या शंभर जोड्या घेतल्या. त्यानें ९४१ ते ९७३ पावेतों राज्य केलें.

श्रीहर्ष देवाच्या मागून त्याचा ज्येष्ठ मुलगा दुसरा सियक, हा त्याचे गादीवर बसला. त्याला वाक्पति, उत्पलराज, मुंज, अमोघवर्ष, पृथ्वीवल्लभ, श्रीवल्लभ, व नरेंद्र अशीं बिरुदें आहेत. त्याचें मुंज हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, हर्ष राजा एक दिवस एका नदीच्या तीरावर फिरत असतांना मुंज जातीचे गवतांत नुकतेंच उपजलेलें एक मूल त्याच्या दृष्टीस पडलें. आपल्या सेवकांकडून त्यानें त्या मुलास आणविलें. राजाला मूल नव्हतें व या मुलाचा नालच्छेदहि झालेला नव्हता. तेव्हां राजानें या सांपडलेल्या मुलाला आपला मुलगा म्हणून वाढविलें. मुंज नांवाचे गवतांत हा मुलगा सांपडला,म्हणून त्याला मुंज राजा असें नांव पडलें. यानंतर हर्ष राजाला जो मुलगा झाला, तो एक दिवस नाहींसा झाला व शेवटीं तो एका कुंजांत सांपडला. म्हणून त्याला कुंज राजा असें नांव पडलें. हल्लीं धारेजवळ मुंजसागर, व कुंजसागर असे दोन तलाव आहेत.

या राजाची कीर्ति भोज राजाचे खालोखाल आहे. तो मोठा संस्कृत पंडित व कवि होता. व विद्वान् लोकांचा तो मोठा आश्रयदाता होता. पद्मगुप्तानें त्यास कविमित्र व कविबांधव अशीं विशेषणें दिलीं आहेत. मेरुतुंगानें त्याचे संबंधानें म्हटलें आहे, "गते मुंजे यशःपुंजे निरालंबा सरस्वती" त्यानें प्राकृत गौडवहो नांवाचें काव्य लिहिलें आहे. त्यानें कर्नाट, लाट, केरल, व चोल या लोकांचा पराभव केला. त्रिपुरीचा चेदिराजा युवराज यास जिंकलें.

चालुक्य राजा दुसरा तैलप याजवर त्यानें सोळा स्वाऱ्या केल्या, व एका प्रसंगीं वर्धा नदीच्या कांठीं त्याचा पराभव करून

त्याला कैद केलें. पण पुढें त्यानें त्याला सोडूनहि दिलें. (इ० स० ९७९)परंतु इ० स० ९९९ चे सुमारास हा तैलप राजा मोठी फौज घेऊन मुंजाचा सूड उगवण्याकरतां माळव्यांत शिरला. मुंजाचा प्रधान रुद्रादित्य यानें तैलपाशीं युद्ध न करण्याबद्दल मुंजास पुष्कळ सांगितलें.परंतु त्याचें न ऐकतां मुंजराजा तैलपाच्या देशांत चालून गेला. तेथें त्याचा पूर्ण पराभव झाला. व तैलपानें त्यास कैद केलें. आरंभीं मुंजाची तैलप राजानें चांगली बरदास्त ठेविली, परंतु तैलपाची बहीण कुसुमावती ऊर्फ मृणालवती हिचें मुंज राजावर प्रेम जडलें व तिच्या साह्यानें आपली सुटका करून घेण्याचा यत्न केला. मृणालवतीनें ही गोष्ट तैलप राजास कळविली, तेव्हां त्यानें मुंज राजाचा शिरच्छेद केला.

मुंज राजा शिवभक्त होता. तो सारखा स्वाऱ्या व लढाया करण्यांत गुंतला होता, तरी त्यानें पुष्कळ इमारती व तलाव बांधले. धारेजवळील मुंजसागर व मांडू येथील मुंज तलाव, हे त्यानें बांधिले. मांधाता, महेश्वर, व कुब्जासंगम येथील घाट त्यानेंच बांधिले. उज्जनी व धारशहरांतही त्यानें सुंदर इमारती बांधिल्या ह्याचे दरबारांत पद्मगुप्त, हलायुध,धनपाल,व धनंजय आणि धनिक हे दोघे बंधू हीं विद्वद्रत्नें होतीं. धनपाल हा जैन कवि होता. पद्मगुप्तानें नवसाहसांकचरित्र नांवाचें काव्य लिहिलें.

धनंजयानें दशरूप नांवाचा नाटकावर ग्रंथ लिहिला.त्याचा भाऊ धनिक यानें दशरूपावलोक नांवाची त्या ग्रंथावर टीका लिहिली.

मुंजाला मुलगा नसल्या कारणानें त्याचा भाऊ सिंधुराज गादीवर बसला. त्याला नवसाहसांक, कुमार, नारायण, व कुंज अशींही नांवें होतीं. तो स्वभावानें फार उच्छृंखल असल्या कारणानें मुंज राजा त्याला फार सक्तीनें वागवी. यावरून तो गुजराथेंत गेला. कांहीं दिवसांनीं तो परत आला तेव्हां मुंजराजानें त्याला कैदेंत

ठेविलें, इतकेंच नाहीं, तर त्यास एका लाकडी पिंजऱ्यांत कोंडून ठेविलें.तो कैदेंत असतांना त्याचा मुलगा प्रसिद्ध भोज राजा याचा जन्म झाला. सिंधु राजानें चालुक्य चामुंडराज व अन्हिल वाड्याचा वल्लभ राजा यांच्याशीं लढाया केल्या. नवसाहसांक चरित्रांत पद्म-गुप्तानें सिंधुराज व नागराजाची कन्या शशिप्रभा यांचे भेटीचें, प्रेमाचें, व विवाहाचें हृदयंगम कथानक दिलें आहे.[1]

सिंधुराजा शैव होता. त्याचे मागून त्याचे गादीवर त्याचा मुलगा प्रसिद्ध भोजदेव हा बसला.

---

१ तें थोडक्यांत असें आहे. सिंधु राजा एक दिवस शिकारीस गेला असतां एक हरिण त्याचे दृष्टीस पडलें. त्याचे गळ्यांत सोन्याचा पट्टा होता. राजानें त्यास तीर मारिला. तो हरिण जखमी झाला खरा,परंतु पळून गेला. राजा पुढें चालला असतां आकाशांतून उडत जात असलेल्या हंसाचे तोंडांतून राजाचे पायापाशीं एक रत्नमाला पडली. त्या मालेंतील रत्नावर राजकन्या शशिप्रभा असें नांव खोदलेलें होतें. इकडे राजकन्या शशिप्रभा ही नर्मदातटाकीं बसली असतांना तिचा आवडता हरिण तिचे जवळ आला. तिनें त्याचे शरिरांतील तीर उपटून काढिला. त्या तिरावर नवसाहसांकराजाचें नांव होतें तें तिच्या दृष्टीस पडलें. रत्नावरील नांव पाहून सिंधु राजाचें शशिप्रभेवर जसें प्रेम जडलें, त्याप्रमाणेंच शशिप्रभेचें नवसाहसांक राजावर प्रेम बसलें. राजा जेव्हां नर्मदा नदीवर गेला, तेव्हां त्याची व शशिप्रभेची गांठ पडली. त्याचे बरोबर त्याचा प्रधान रुक्मांगद हा होता. तीं सर्व नदीतीरीं बसलीं असतांना एकदम एक मोठें तुफान झालें. त्या वादळाच्या योगानें शशिप्रभा व तिच्या दासी ह्या भोगावती नांवाचे नागनगरीस उडून गेल्या. इकडे एक आकाशवाणी झाली कीं, रत्नावती नगरांत राहणाऱ्या वज्रांकुश नांवाच्या राक्षसास जो वीर मारील त्याला शशिप्रभेचा पिता शंखपाल शशिप्रभा देईल. राजानें शशिखंड नांवाचें विद्याधराचे मदतीनें हें कृत्य केलें. त्यानंतर शशिप्रभेचें व सिंधु राजाचें लग्न झालें.

मुंज राजाला मुलगा नसल्या कारणानें भोजाचे जन्मामुळें त्यास फार आनंद झाला. परंतु एका ज्योतिष्यानें भोजाचे हातून तुझा नाश होणार आहे असें सांगितल्यावरून मुंज राजा भोजाचा छळ करूं लागला व त्यास मरण्याची त्यानें आज्ञा केली. परंतु वररुचीनें राजास सांगितलें कीं

" पंचाशत्पंच वर्षाणि सप्तमासं दिनत्रयं ।
भोजराजेन भोक्तव्यः स गौडो दक्षिणापथः ॥ "

त्यावरून मुंज राजानें त्यास मारण्याचा बेत रहित केला. कांहीं दिवसांनीं मुंज राजाचे मनांत मत्सर उत्पन्न झाला, तेव्हां भोजराजानें पुढील कविता त्याजकडे लिहून पाठविली.:—

मान्धाता स महीपतिः कृतयुगालंकारभूतो गतः
सेतुर्येन महोदधौ विरचितः क्वासौ दशास्यान्तकः ॥
अन्ये चापि युधिष्ठिरप्रभृतयो याता दिवं भूपते
नैकेनापि समागता वसुमती मन्ये त्वया यास्यति ॥

आपला मत्सर व महत्त्वाकांक्षा या संबंधाची आपल्या पुतण्याची व्याजोक्ति मुंज राजाचे लक्षांत येऊन त्यानें भोजाचा छळ करण्याचें सोडून दिलें.

राज्यारोहणाच्या वेळेस भोजाचें वय अवघें पंधरा वर्षांचें होतें. राज्यारोहणानंतर लवकरच त्यानें उज्जनीऐवजीं धार ही आपली राजधानी केली. चालुक्य, चेदी, गुजराथ या देशांच्या राजांशीं भोजाच्या लढाया झाल्या. चालुक्यांशीं झालेल्या लढाईंत पांचव्या विक्रमादित्त्याचा त्यानें पराभव केला व त्याला कैद करून ठार मारिलें. परंतु पुढें इ० स० १०१९ सालांत जयसिंहानें भोजाचा पराभव केला. इ० स० १०४० ते १०६९ चे दरम्यान सोमेश्वर आहवमल्ल चालुक्य यानें भोज राजाचा मोठा पराभव केला. त्याचें वर्णन कुवलयानंद काव्यांत समुद्र व नर्मदा यांचे दर-

ग्यान झालेल्या संवदांत फार मार्मिक रितीनें केलें आहे. तो श्लोक असा आहे:—

कालिन्दि ब्रूहि कुम्भोद्भवजलधिरहं नाम गृण्हासि कस्मात् । शत्रोर्मे नर्मदाहं त्वमपि वदसि मे नाम कस्मात्सपत्न्याः ॥ मालिन्यं तर्हि कस्माद्वहसि ननु मिलत्कज्जलैर्मालवीनाम् ॥ नेत्राम्भोभिःकिमासं समजनि कुपितः कुन्तलक्षोणिपालः ॥

नर्मदेचें पाणी काळें होण्याचें कारण माळव्याच्या कुलस्त्रियांनीं आपल्या राजाच्या पराजयानिमित्त ढाळलेले कज्जलमिश्रित शोकाश्रु हें कवीनें दिलें आहे, यावरून तो पराभव माळव्याचे लोकांना बराच दुःखद झाला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. या पराभवानंतर दोन्ही राजांची बरीच मैत्री झाली.

अन्हिलवाड्याचे भीमदेवाचे लढाईत आरंभीं भोजराजाचा पराभव होऊन तो कैदही झाला होता. परंतु भीमदेवानें त्यास सोडून दिलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं भोजराजाचा जैन सेनापति कुलचंद्र यानें गुजराथच्या राजावर स्वारी करून त्याची राजधानी हस्तगत केली, व राजवाड्याचे दरवाज्यासमोर कवड्या पेरल्या, व अन्हिलवाड्यांकडून जयपत्र घेतलें. पुढें भीमराजाचा वकील दामर ऊर्फ दामोदर याचे शिष्टाईमुळें दोन्ही राजांचे दरम्यान सख्य झालें. (१०२३—१०६३) चेदीचा राजा गांगेयदेव याचे मरणानंतर त्याचा मुलगा प्रसिद्ध कर्णदेव हा राज्यारूढ झाला. आरंभीं त्याचें व भोजाचें सख्य होतें व भोजराजानें कर्णदेवास एक सोन्याची पालखी नजर म्हणून पाठविली. परंतु पुढें ही स्थिति अगदीं बदलली, व इ. स. १०५५ सालीं कर्ण व अन्हिलवाड्याचा भीमराजा या दोघांनीं मिळून धारेवर स्वारी केली, आणि भोजराजाचा पराभव करून त्यास त्याचे राजधानींतून हांकून लावलें. यानंतर थोड्याच दिवसांनीं भोजराजा मरण पावला.

भोज राजाचा लौकिक मुख्यत्वेंकरून त्याचे विद्वत्तेवरून व त्यानें विद्वान् लोकांस दिलेल्या आश्रयावरून आहे. काव्यप्रकाशांत मंमट म्हणतो:—

यद्विद्वद्भवेनषु भोजनृपतेस्तत्यागलीलायितम्

प्रबंधकाराचे लिहिण्यावरून मुंज व सिंधुराज यांचेपेक्षांही भोज राजाचा विद्वान् लोकांस आश्रय ज्यास्त उदार होता. भोज स्वतः शैव होता तथापि जैन विद्वानांना त्याचा मोठा आश्रय होता. प्रभाचंद्र नांवाचे जैन विद्वानाचे पायांची तो पूजा करीत असे, असें एका कानडी लेखांत लिहिलें आहे. भोजाची इतर धर्माविषयीं सहानुभूति इतकी होती कीं, धार येथील शहाचंगाल साईचे कबरीवर एक लेख आहे, त्यांत असें म्हटलें आहे:–‘ भोज मुसलमान झाला व त्यानें अबदुल्ला हें नांव धारण केलें. ’ अर्थात् या गोष्टींत सत्याचा यत्किंचितही अंश नाहीं. भोजाला कविराज असा जरी किताब दिला आहे, तरी त्याचे ग्रंथ धर्मशास्त्र, वैद्यकशास्त्र, ज्योतिषशास्त्र, व व्याकरण या विषयांवरहि आहेत. त्याचे ग्रंथांपैकीं सरस्वतिकंठाभरण व चंपूरामायण हे ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. विज्ञानेश्वराचे मिताक्षरांत भोजाचे ग्रंथांचा उल्लेख केला आहे.

भोजाचे वेळचे विद्वान् लोकांपैकीं धनपाल, कालिदास, उआत यांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. हा कालिदास म्हणजे अर्थात् शाकुंतलाचा कर्ता नव्हे.

भोजाचे राज्याचा विस्तार फारसा होता असें दिसत नाहीं. नर्मदेच्या उत्तरेस बुंदेलखंड व बाघेलखंड वजा केलें असतां सांप्रतच्या मध्यहिंदुस्तानाइतका तो होता. दक्षिणेस मात्र तो गोदावरीपर्यंत होता.

भोज राजानें पुष्कळ मंदिरें बांधिलीं. धार येथील भोजशाळा, उज्जनीचे घांट, भोपाळ संस्थानांतील भोजपूर तलाव व काश्मिरांतील

पापसूदन तलाव हे त्यानेंच बांधिले. धार येथील गांगी ऊर्फ ' गांग्ली तेलीणकीलाट, ' याबद्दलची हकीकत मनोरंजक आहे. कारण " कहां राजा भोज और कहां गांग्ली तेलीण " ही म्हण बहुतेक सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. धार शहरांत लाट मशिदीजवळ एक प्रचंड लोखंडी खांब पडलेला आहे. भोज राजानें चालुक्यास जिंकलें व चेदीचा राजा गांगेयदेव याचा पराभव केला, तेव्हां त्यानें हा विजयस्तंभ तयार केला असावा, व त्याचें मूळचें नांव ' गांगेय तेलिंगण लाट ' असें असावें. त्याचा अपभ्रंश ' गांग्ली तेलीण असा झाला असावा. कालांतरानें मागील इतिहासाची विस्मृति झाल्यावर गांग्ली तेलीण कोणी राक्षसीण असावी व हा खांब, तिची तोल करण्याची दांडी असावी, व जवळ पडलेले प्रचंड धोंडे, हे तिचीं वजनें असावींत अशी दंतकथा उदयास आली.

मांडू ऊर्फ मंडपदुर्ग येथें भोजराजानें किल्ला बांधिला व एक पाठशाळाही बांधिली. त्या पाठशाळेंत पंडित भट्टगोविंद हे मुख्य अध्यापक असून, शेंकडों विद्यार्थी तेथें अध्ययनास होते.

भोपाळ संस्थानांत भोजपूर तलाव त्यानें बांधिला. त्याच्या कांहीं भिंती अद्याप उभ्या आहेत. पंधरावे शतकांत माळव्याचा हुशंगशहा यानें तो तलाव पाडून बुजवून टाकला. त्याचा विस्तार सुमारें दोनशें पन्नास चौरस मैल होता. हल्लीं त्या सरोवराचे जागेवरून इंडियन मिड्लंड रेल्वे जात आहे. काश्मिरांतील पापसूदन सरोवर कुठर परगण्यांत कपाटेश्वर ऊर्फ कोठर या गांवीं आहे. तें बांधण्याकरितां भोज राजानें पद्मराज नांवाचे मनुष्यास द्रव्य पाठविलें होतें.

भोजराजानंतर धारानगरचे अकरा राजे झाले. त्यांत उदयादित्य ( १०५९–१०८१ ) व नरवर्मदेव ( ११०४ ते

११३३ ) यांचा लौकिक विद्वान् लोकांस आश्रय दिल्याबद्दल आहे. या वंशांतील शेवटचा राजा चौथा जयसिंह नांवाचा होता. ( इ० स० १३१० ) त्यानंतर तोमार वंशाच्या राजाकडे व तोमारांच्या नंतर चव्हाण वंशाकडे धारा नगरचें राज्य गेलें. इ० स० १४०१ साली मुसलमान राजे झाले. १५६९ साली अकबरानें तें राज्य मोगल बादशाहींत सामील केलें.

## बहारचे व बंगालचे पाल वंश व सेन वंश.

हर्ष राजाची सत्ता कामरूम आणि पश्चिम व मध्य बंगाल प्रांतांत होती. त्याचे मरणानंतर स्थानिक राजे स्वतंत्र झाले. इ. स. ७०० चे सुमारास आदिसूर नांवाचा गौड देशाचा राजा होता. त्यानें कनोजहून पांच ब्राह्मण व पांच क्षत्रिय आणविले व त्यांचेपासून बंगाल प्रांतांतील पुष्कळ प्रसिद्ध घराण्यांची उत्पत्ति झाली, अशी दंतकथा आहे. इ. स. ७३० ते ७४९ चे सुमारास गोपाळ नांवाचा बंगालचा राजा झाला. त्यानें ४५ वर्षें राज्य केलें. शेवटीं शेवटीं मगध ऊर्फ बहार प्रांत त्याचे ताब्यांत आला. त्याचा गुर्जरराजा वत्सराज यानें पराभव केला. तो बौद्धधर्मी होता. त्यानें उदंडपूर येथें एक मोठा मठ स्थापन केला. त्याचे वंशास पाल वंश म्हणतात. त्या वंशांतील दुसरा राजा धर्मपाल यानें निदान ३२ वर्षें राज्य केलें असावें. तिबेटचा इतिहासकार तारानाथ याचें म्हणणें असें आहे कीं, धर्मपालाचें राज्य बंगालचे उपसागर पासून तों दिल्ली, व जालंदरपावेतों, व दक्षिणेस विंध्याद्रीपावेतों होतें. त्यानें कनोजचा राजा इंद्रायुध यास पदच्युत करून त्याचे गादीवर चक्रायुधास बसविलें. ( इ. स. ८०० ) प्रसिद्ध विक्रमशीला नांवाचा मठ त्यानेंच स्थापन केला. त्यांत १०७ मंदिरें व सहा पाठशाळा होत्या. तिसरा राजा देवपाळ याचे लाऊसेन नांवाच्या सेनापतीनें आसाम वं कलिंग हे प्रांत जिंकले. देवपाळ

राजानें समारें ४८ वर्षे राज्य केलें. त्यानंतर कांहीं वर्षे कांबोज नांवाच्या डोंगरी लोकांनीं आपला अमल बसविला. त्यांना पाल वंशांतील नववा राजा महिपाल यानें हांकून लाविलें. ( इ. स. ९०८ अगर ९८० ) पाल वंशांतील सर्व राजांपेक्षां याचेंच नांव बंगाल प्रांतांत जास्त लोकप्रिय आहे, व त्याचेसंबंधाचीं गाणीं अद्याप खेड्यापाड्यांत ऐकूं येतात. त्याचे कारकीर्दींत तिबेटांत बौद्ध धर्माचें पुनरुज्जीवन झालें. पंडित धर्मपाल व दुसरे साधुपुरुष मगध देशांतून तिबेटांत गेले. (१०१३)व बौद्ध धर्माचा त्या देशांत त्यांनीं पुन्हां उद्धार केला. महिपाल १०३० चे सुमारास मृत्यु पावला. त्यानें ५२ वर्षे राज्य केलें.

इ० स० १०८० चे सुमारास दुसरा महिपाल नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें आपले भावास बंदींत ठेविलें. राज्य फार अनीतीनें केलें. त्यामुळें राज्यांत बंडें उद्भवलीं. चसिकैवर्त कुळींचा मुख्य दिव्य ऊर्फ दिव्योक यानें पुढाकार घेऊन महिपालास ठार मारिलें व राज्य आपल्या हातीं घेतलें. दिव्यानंतर त्याचा पुतण्या भीम हा राज्यकारभार पाहूं लागला. पुढें महिपालाचा भाऊ रामपाल यानें कैदेंतून आपली सुटका करून घेतली व राष्ट्रकूटांच्या साहाय्यानें भीमाचा पराभव करून त्यास ठार मारिलें व आपली गादी पुनः मिळविली.

कैवर्त बंडाचा याप्रमाणें मोड केल्यानंतर रामपालानें मिथिल ऊर्फ उत्तर बहार प्रांत जिंकला. कामरूप प्रांतही त्याचे राज्यांत सामील झाला असावा. कारण, त्याचा मुलगा कुमारपाल यानें त्या प्रांतांचा पूर्ण अधिकार आपला प्रधान वैद्यदेव यास दिल्याचें वर्णन आहे. रामपालाचे कारकीर्दींत बौद्ध धर्माचा उत्कर्ष झाला. मगध देशांतील मठांत हजारों यति रहात होते, यावरून ही गोष्ट स्पष्ट होते.

रामपालानंतर पालवंशाचे पांच राजांनीं राज्य केलें. गोविंदपाल व इंद्रद्युम्न हे त्यांपैकीं होते. पालवंशाचे राजांनीं एकंदर ४५० वर्षें राज्य केलें. मगध व मोंगीर प्रांत त्यांचे राज्यांत होते. धीमान व त्याचा मुलगा वित्तपाल हे फार कुशल चित्रकार होते. धर्मपाल व देवपाल यांचे कारकीर्दींत त्यांनीं तलाव वगैरे लोकोपयोगी पुष्कळ कामें केलीं. (इ० स० ७८०–७९२)

पालवंशानंतर सेन वंशाचे राजे झाले. ते ब्राह्मण जातीचे होते. कलिंग राजाचा सरदार सामंतदेव यानें दक्षिणेंतून येऊन काशीपुरी ( मयूरभंज संस्थानांतील सांप्रतचें काशिआरी नांवाचें गांव ) येथें एक लहानसें राज्य स्थापन केलें. त्याचा नातू विजयसेन यानें इ. स. १११९ चे सुमारास पालराजांचे ताब्यांतून बंगालचा बराच भाग हिरावून घेतला. इतर राजांशींही त्यानें लढाया केल्या. त्यानें सुमारें ४० वर्षें राज्य केलें. विजयसेनाचा मुलगा बल्लाळसेन यानें ब्राह्मण, वैद्य, व कायस्थ या जातींत कुलीन संप्रदाय सुरू केला. त्यानें मगध, भूतान, चितेगांग, आराकान, ओरिसा व नेपाळ या प्रांतांत ब्राह्मण उपदेशक पाठविले. इ. स. ११७० सालांत बल्लाळसेनानंतर त्याचा मुलगा लक्ष्मणसेन ऊर्फ राय लखमणिया राज्यारूढ झाला.

इ. स. ११९३ चे सुमारास मुसलमानांच्या स्वारीमुळें पाल व सेन वंश नाहींसे झाले. त्या सालीं कुतुबुद्दीनचा सेनापति महंमद यानें बहार प्रांत घेतला, व पुढचे सालीं नडिया शहर घेतलें. बहारचा शेवटचा हिंदू राजा इंद्रद्युम्न नांवाचा होता. महंमदानें बहारचा किल्ला घेतला तेव्हां त्याला पुष्कळ लूट मिळाली. त्यानें तेथील मुंडण केलेले सर्व संन्यासी यांची कत्तल केली. तेथें असलेल्या पुस्तकांत काय लिहिलें आहे हें समजून घेण्याची त्याला जेव्हां पुढें इच्छा झाली तेव्हां एकही मनुष्य तें सांगण्यास जिवंत राहिला

नव्हता. याप्रमाणें बहार प्रांतांतील बौद्ध धर्माचा एका मुसलमानाच्या तरवारीनें नाश झाला. त्याच्या कत्तलींतून जे यति वांचले ते तिबेट, नेपाळ व दक्षिण हिंदुस्तान या प्रांतांत पळून गेलें. सेन घराण्याचा राजा राय लखमणिया याची राजधानी कलकत्त्याच्या उत्तरेस भागीरथीचे कांठीं नुदिया ही होती.

त्यानें ८० वर्षें राज्य केलें असें म्हणतात. तो मोठा न्यायी व उदार होता, असा त्याचा लौकिक आहे. बहार काबीज केल्यानंतर पुढच्या वर्षीं महंमद बंगाल जिंकण्याकरितां फौज घेऊन निघाला, व एके दिवशीं सर्व फौज मागें ठेऊन १८ घोडेस्वारांनिशीं नुदिया शहरांत आला. तो कोणी घोड्यांचा व्यापारी आहे असें समजून थेट राजवाड्याच्या दरवाजापाशीं येईपर्यंत त्याला कोणीं हरकत केली नाहीं. दरवाज्यांतून आंत प्रवेश करण्याबरोबर त्यानें आपली तरवार उपसली व वाड्यांतील लोकांवर हल्ला केला. राजा त्या वेळेस जेवीत होता. त्याला हें समजतांच तो वाड्याच्या मागच्या दरवाज्यानें अनवाणीच पळाला. त्याच्या राण्या, दासी, इतर बायका, नोकर व सर्व खजीना महंमदाचे हातीं सांपडला. महंमदाची फौज मागून आली तेव्हां त्यानें सर्व शहराचा बंदोबस्त केला. राय लखमणिया हा जगन्नाथपुरीस पळून गेला व तेथेंच तो मृत्यु पावला. गीतगोविंदाचा कर्ता प्रसिद्ध जयदेव कवि या राय लखमणिया ऊर्फ लक्ष्मण सेनचे राज्यांत झाला. याप्रमाणें बंगाल व बहार प्रांतांतील हिंदु राज्यांचा शेवट झाला.

---

## ९

## रजपूत कुळी.

सांप्रतचे रजपूत राजे हे रामकृष्णादि प्राचीन सूर्यवंशाच्या व

चंद्रवंशाच्या राजांपासून झाले आहेत अशी बहुतेक सर्व हिंदु लोकांची समजूत आहे. परंतु मि. व्हिसेंट स्मिथ यांचें असें म्हणणें आहे कीं, ही समजूत निराधार आहे. वास्तविक हे राजे परदेशांतून शक, युएर्ची, व हूण वगैरे जे लोक आले त्यांचे वंशज होत.

हा अभिप्राय स्पष्ट रितीनें सिद्ध करतां येईल असा जरी पुरावा नाहीं, तथापि परिस्थिति या अभिप्रायास बरीच अनुकूल आहे. क्षत्रिय जात सर्वांशीं नष्ट झाली हें म्हणणें खरें आहे किंवा कसें याचा जरी निश्चय करतां आला नाहीं,तरी पवार, परिहार, चव्हाण व सोळंकी वगैरे कुळी गुर्जर नांवाच्या कुळीप्रमाणें हूण लोकांचे वंशज आहेत असें दिसतें. कनोजचे भोज वगैरे राजे गुर्जर जातीच्या प्रतिहार ऊर्फ परिहार कुळीचें असल्याचा शोध अलीकडे लागला आहे. जॅक्सन, भांडारकर व किलहॉर्न या विद्वानांनीं ही गोष्ट निश्चित केली आहे. हे गुर्जर लोक हूण लोकांपैकीं होते. पृथ्वीराज चव्हाण याची कथा ज्या चंद्रराईसा नांवाच्या काव्यांत दिली आहे, त्या काव्यांत पवार, परिहार, चव्हाण व सोळंकी ह्या जाती अबूचे पहाडावरील अग्निकुळांतून उत्पन्न झाल्या आहेत, असें म्हटलें आहे. यावरून असें अनुमान निघतें कीं, या चार जाती परदेशस्थ असून अग्निहोमानें शुद्ध झाल्या व त्या क्षत्रिय बनल्या. तेव्हां परिहार कुळीप्रमाणें ह्या बाकीच्या कुळीही परदेशस्थ हूण जातींपैकींच असाव्यात असें मानण्यास हरकत नाहीं.

रजपुतांपैकीं दक्षिण भागांतील कुळी, गोंड, भर, कोळ वगैरे ह्या देशांतील मूळच्या रहिवाशांपासून झाल्या असाव्यात. चंडेल रजपूत हे भर अथवा गोंड ह्या जातींपासून झाले असावेत. बुंदेले लोक, व उत्तरेकडील राठोर हे गहरवारींच्या शाखा आहेत. राष्ट्रकूट व राठोर या शब्दांची व्युत्पत्ति जरी एकच आहे, तरी त्यांच्यांत

कांहीं जातिसंबंध नाहीं. राष्ट्रकूट हे या देशांतील मूळच्या रहिवाशांपैकींच असावेत.

वर लिहिलेल्या उत्तरेच्या व दक्षिणेच्या रजपुतांमध्यें वरचेवर लढाया होत असत. यांचे मुळाशीं हें कारण होतें कीं, उत्तरेकडील रजपूत हे परदेशस्थ होते, व दक्षिणेकडील रजपूत हे या देशांतील मूळचे रहिवासी होते.

---

१०

## गुजराथ[१].

हिंदुस्थानच्या वायव्येकडून हिंदुस्थानांत जे हूण लोक आले त्यांपैकीं **गुज्जर** नांवाचे जे लोक होते ते प्रथम पंजाबांत येऊन राहिले आणि नंतर ते **गुजराथ**कडे आले. तेव्हांपासून या प्रांताचें नांव **गुज्जरराठ** ( **गुजराथ** ) असें पडलें.

या प्रांताचे प्राचीन काळीं **आनर्त**, **सुराष्ट्र**, ऊर्फ **सौराष्ट्र** व **लाट** असे तीन भाग होते. सर्वांत उत्तरेकडील भागाचें नांव **आनर्त** होतें त्या प्रांताची राजधानी **आनर्तपूर** ऊर्फ **आनंदपूर** नांवाची होती. त्याच नगराला पुढें **वृद्धपुर** ऊर्फ बडनगर असें म्हणूं लागले. त्याचे दक्षिणेकडील भागास **सुराष्ट्र** म्हणत. सुराष्ट्र हें नांव सूस नांवाचे लोकांवरून पडलें. **काठेवाड**चे दक्षिण भागाला

---

१ मुंबई ग्याझेटियरच्या आधारानें हा भाग लिहिला आहे. नवव्या व दहाव्या शतकांतील शिलालेखावरून असें दिसतें कीं, गुजरराठ हें नांव सांबर सरोवर व अजमीर याच्या उत्तरेच्या देशाला लागत असे, व दहावे शतकापासून तेराव्या शतकापावेतों हें नांव अन्हिलवाड्याच्या सोळंकी राज्याला लागत असे (Imperial Gazeteer Provincial Series, Bombay Presidency पृ० २०१)

अद्याप सोरठ असें म्हणतात. मही व तापी नद्यांचे दरम्यानच्या भागाला लाट हें नांव होतें. हें नांव बहुधा रट नांवाचे लोकांची तेथें वस्ती असल्यामुळें पडलें असावें.

गुजराथ प्रांतांत बाहेरून लोक आले ते दोन मार्गांनीं आले; जलमार्गानें व खुष्कीच्या मार्गानें. जलमार्गानें प्रथम खि. पू. १५००—५०० या एक हजार वर्षांत यादव आले. ख्रि. पूर्वी ३००–इ. स. १०० वर्षंपावेतों ग्रीक, ब्याकट्रियन, पार्थियन, व सिथियन वगैरे यवन लोक आले. इ. स. ६००–८०० वर्षं-पावेतों पारशी व त्यांचे पाटलाग करणारे आरब लोक आले. इ. स. ९००—१२०० वर्षंपावेतों संगन नांवाचे चांचे लोक आले. पोर्तुगीज व तुर्क १५००—१६०० त; आरब व इराणी चांचे १६००—१७०० त; आफ्रिकन, अरब, इराणी व मक्राणी लुटारू लोक १५००—१८०० पावेतों आले. अर्मिनियन, डच व फ्रेंच १६००—१७५० पर्यंत आले. ब्रिटिश लोकांनीं इ. स. १६१२ त सुरत येथें आपली वखार स्थापन केली. इ. स १६१३ त आल्डवर्थ व विथिंग्टन नांवाचे दोन इंग्रज व्यापारी भडोच शहरीं आले. इ. स. १६१४ त त्यांनीं वखार स्थापन कर-ण्याकरतां एक घर भाड्यानें घेतलें. इ. स. १६१५ त सर टामस रो साहेबानें जहांगिर बादशहाची भडोच येथें वखार काढण्याची परवानगी मिळविली. इंग्रज व्यापाऱ्यांना सुभ्याचे वाड्याजवळ राहून द्यावें, व त्यांचेकडून जकात घेऊं नये, व त्यांना कोणीं त्रास देऊं नये असे सदर फरमानांत लिहिलें होतें. भडोचचे वखारीच्या मुख्य मुनीमानें सुरतच्या मुख्य अधिकाऱ्याचे ताब्यांत राहावें व त्याला दरसाल ४०० रुपये पगार होता. ( मुंबई गॅझेटीअर, सुरत व भडोच जिल्ह्याचें पुस्तक पृ. ४६८ ) खुष्की मार्गानें उत्तरेकडून सिथिअन व हूण (खि. पू. २०९ इ. स.५००), गुर्जर ( इ.स.४००-

ते ६०० ), जाडेज व काठी लोक ( इ. स. न. ७५०–९०० ), अफगाण, तुर्क, मोगल व उत्तेरकडील मुसलमान ( इ. स. १००० १५०० ), याप्रमाणें उत्तेरकडून लोक आले. वायव्येकडून आर्यन लोक आले. पूर्वेकडून लोक आले ते येणेंप्रमाणें:—

मौर्य ( खि. पू. ३०० ); निमसिथियन क्षत्रप खि. पू. १०० इ. स. ३००; गुप्त (इ. स. ३८०); गुर्जर (इ. स. ४००–६००); मोगल(१५३०); मराठे (१७५०).

दक्षिणेकडून लोक आले, ते येणें प्रमाणें:—

शातकर्णी (इ. स. १००); चालुक्य व राष्ट्रकूट ( इ. स. ६५०-९५० ); मुसलमान लुटारू ( १४००—१६०० ); पोर्तुगीज ( १५०० ); मराठे ( १६६० ते १७६० ); ब्रिटिश (१७८० ते १८२० )

या प्रांतासंबंधानें पौराणिक कथा अशी आहे कीं, मनूचा नातू व शर्यातीचा मुलगा आनर्त हा पहिला राजा होय. त्याचा रेवत नांवाचा मुलगा होता. त्याची राजधानी कुशस्थळी ऊर्फ द्वारका ही होती. तो आनर्त देशावर राज्य करीत होता. त्याला शंभर मुलगे होते. त्यांपैकीं रैवत ऊर्फ कुकुद्मी हा ज्येष्ठ होता. रेवताला रेवती नांवाची मुलगी होती. ती उपवर झाली तेव्हां रेवत ब्रह्मदेवाकडे गेला. तेव्हां ब्रह्मदेव गाणें ऐकण्यांत गर्क होऊन गेले होते. त्यामुळें रेवताला वाट पहात बसावें लागलें. ब्रह्मदेव गायन आटपल्यानंतर बाहेर आले तेव्हां रेवतानें त्यांस आपले मुलीस योग्य वर पाहण्याची विनंति केली. ब्रह्मदेवानें त्यास सांगितलें कीं, तूं येथें वाट पाहात बसलास त्या काळांत तिकडे तुझें राज्य गेलें. आतां तूं आपली मुलगी द्वारकेचा राजा बलदेव यास द्यावी. त्याप्रमाणें रेवतानें बलदेवास आपली मुलगी दिली.

यावरून रेवताचें राज्य जाऊन त्यास पळून जावें लागलेसें दिसतें. तो परत आला तेव्हां यादवांची सत्ता पूर्णपणें स्थापित झाली होती.

यादवांचे कुळीच्या पुष्कळ शाखा झाल्या. त्यांचे कुळीचा मूळ पुरुष यदु होता.त्यांत वृष्णि, मधु,शातवत, शूरसेन वगैरे राजे झाले. शातंवत हा यदूपासून सदतिसावा वंशज होता. त्याचेच कुळींत देवकी व वसुदेव हे झाले. त्यांचा मुलगा श्रीकृष्ण होय. कृष्ण मथुरेस असतांना त्याजवर कालयवन व मगध देशांतील जरासंध यांनीं स्वाऱ्या केल्या तेव्हां तो पळून सुराष्ट्राकडे आला. तिकडे एका गुहेंत मुचकंद ऋषि तप करीत बसले होते. कालयवन कृष्णाचा पाठलाग करीत करीत त्या गुहेंत शिरला, व कृष्ण समजून त्यानें त्या ऋषीला लत्ताप्रहार केला. त्यावरून त्या ऋषींनीं त्यास जाळून भस्म केलें. राजसूययज्ञाकरितां कृष्ण हस्तिनापुरास गेले, तेव्हां शौभ देशांतील मृत्तिकावतीचा राजा शाल्व यानें द्वारकेवर हल्ला केला. पुष्कळ लुटालूट करून द्वारकेचें सैन्य बरेंच मारून तो निघून गेला. कृष्ण परत आल्यावर त्यानें शाल्वावर स्वारी केली, व त्याचा पराभव केला. पुढें महाभारतांतील युद्धानंतर सुमारें ३६ वर्षांनीं प्रभास ऊर्फ सोमनाथपट्टणाजवळ यादवांची आपसांत लढाई होऊन त्यांचा कुलक्षय झाला.

यादवानंतरचा गुर्जरांथचा इतिहास कळण्यास पूर्ण साधनें उपलब्ध नाहींत. मौर्य वंशांतील प्रसिद्ध अशोक राजानें धम्मरखितो नांवाचा यवन या प्रांतांत उपदेश करण्यास पाठविला. यावरून त्या प्रांतांत परदेशीय लोक असावेतसें दिसतें. मौर्यांचा अमल खि० पू. ३१९—१०० पर्यंत होता. त्यांची राजधानी गिरीनगर ऊर्फ गिरनार अथवा जुनागड ही होती. त्यांची दक्षिणेंतील राजधानी सोपारा ही होती. शेवटचा मौर्य राजा संमति नांवाचा होता ( खि पू. १९७ ). त्या सालापासून खि. पू. १८०

सालापर्यंतचा इतिहास समजत नाहीं. खि. पू. १८०—१०० पावेतों युक्रेटायडीज, मेन्यांडर, आपालाडोटस नांवाचे ब्याकट्रिअन ग्रीक राजे होते. रुद्रदामनाच्या गिरनार पर्वतावरील लेखावरून क्षत्रपांचें राज्य गुजराथेंत असल्याचें स्पष्टपणें सिद्ध होतें. (बॉंबे गॅझेटिअर, भडोच व सुरतेचा भाग पृ. ४६४). तें खि. पू. ७० ते इ. स. ३९८ पावेतों होतें. त्यांचीं दोन घराणीं होतीं; एक उत्तरेकडील व एक पश्चिमेकडील. उत्तरेकडील क्षत्रपांचे राज्य काबूलपासून गंगायमुनेच्या संगमापावेतों होतें. पश्चिमेकडील क्षत्रपांचें राज्य अजमीरपासून उत्तर कोंकणापावेतों व माळव्यापासून अरबी समुद्रापावेतों होतें. उत्तर क्षत्रपांचें राज्य माऊसाचे राज्यारोहणापासून (खि. पू. ७०) तें कनिष्काचे राज्यारोहणापावेतों होतें. (इ० स० ७८).

पश्चिम क्षत्रपांत पहिला क्षत्रप नहपान हा होता. तो कनिष्काचा सेनापति ह्मणून किंवा स्वतंत्र राजा म्हणून पूर्व रजपूतस्थानांतून पश्चिम माळव्याकडून दक्षिण गुजराथेंत प्रांत जिंकीत आला. पुढें त्यानें आपला अमल काठेवाड व नाशीकपावेतों बसविला.

नहपानानंतर त्याचा जावई उषवदात हा गादीवर बसला. हा राजा फार उदार होता. व त्यानें फार मोठे दानधर्म केले; ब्राह्मणांस लक्षावधि गाई त्यानें दिल्या. अबूचे पहाडाजवळ बारनस नदीवर घाट बांधिला; ३२ हजार नारळाचीं झाडें चरक ब्राह्मणास दिलीं; पुष्कर तीर्थीं एक गांव व तीन लक्ष गाई दिल्या. केळवें माहीम व डहाणू येथील ब्राह्मणांस झाडें व सुवर्ण दिलें. पुष्कळ नद्यांवर उतारूंकरितां नावा ठेविल्या; तापीवर व कावेरीवर घाट बांधले.

त्याचे नंतर चष्टन व जयदामा क्षत्रप झाले. चवथा क्षत्रप रुद्रदामा होता. [१४३—१९८]. त्याचे राज्यांत गिरनार जव-

ळील सुदर्शन तलावाची दुरुस्ती झाली. त्याला महाक्षत्रप म्हणत असत. त्यानें यौधेय नांवाचे शूर जातीचे लोकांचा व दक्षिणेकडील शातकर्णी राजाचा पराभव केला. यानंतर पुढें बरेच क्षत्रप राजे झाले. एकंदर २७ क्षत्रप राजे झाले.

क्षत्रपानंतर त्रैकूटकांचे राज्य झालें. हे आभीर जातीचे लोक होते. त्यांचा मूळपुरुष ईश्वरदत्त नांवाचा होता. ज्याप्रमाणें पल्लवांचे म्हणणें आम्ही भारद्वाज ऋषीचे वंशज आहों, गुर्जरांचें म्हणणें आम्ही महाभारतांतील कर्णवीराचे वंशज आहों, तसें आभीरांचें म्हणणें आह्मी हैहयाचे[1] वंशज आहोंत. इ. स. ३०० चे सुमारास क्षत्रपांचा अमल कमजोर होऊन त्रैकूटकांचा वाढला. पांचवे शतकाचे मध्याचे सुमारास गुप्त वंशानें त्यांचा अमल नाहींसा केला. त्यांची सत्ता महाराष्ट्र व दक्षिण कोंकण प्रातांत होती.

प्रसिद्ध चंद्रगुप्त, समुद्रगुप्त ( ३७०–३९५ ), दुसरा चंद्रगुप्त ( ३९५–४१५ ), कुमारगुप्त, ( ४१६–४५३ ), स्कंधगुप्त

---

१ हाइहाय व नालजंग नांवाचे लोक परदेशांतून भरत खंडांत आल्याचें पुराणांतरीं लिहिलें आहे. हरिश्चंद्र राजाचे वंशजांपैकीं बाहुक नांवाचे राजाचे कारकीर्दीत हाइहयांनीं अयोध्या प्रांतावर स्वाऱ्या केल्या व त्या राजास राज्यांतून हाकलून लाविलें. पुढें बाहकाचा मुलगासगर यानें त्या लोकांना आपले राज्यांतून हाकून दिलें.

नहुष राजाचा ज्येष्ठ मुलगा सहस्रजित याचा मुलगा शतजित नांवाचा होता. त्याला हइहाय, वेणू ,व हय नांवाचे तिघे मुलगे होते. हइहयाचा पणतू महित नांवाचा होता. त्यानें नर्मदातटाकीं महिष्मति नांवाची नगरी स्थापन केली. सांप्रतचे चूलीमहेश्वर किंवा मानधाता शहर हेंच ती नगरी असावी. ( Dalall's History of India, vol. 1 पृ. १०८ )

( ४६४–४७० ); यांचें राज्य गुजराथ व काठेवाडांत होतें.[1]

गुप्तांचे नंतर काठेवाडांत वल्लभी राजे झाले. त्यांची राजधानी हल्लीं-चे वळे नांवचें गांव आहे, तेथें होती. हिउएन त्संग हा या राजाचे कारकीर्दींतच या प्रांतावर आला होता. त्याचे वेळेस या राज्याचा विस्तार १०० मैल होता, व राजधानीचा विस्तार ५ मैल होता. या राज्यांत ६००० साधू होते व माळव्याचे शिलादित्याचा पुतण्या ध्रुवपटु नांवाचा राजा गादीवर होता. या राजाचा धर्म शैव होता. यांचा मूळ पुरुष भटार्क नांवाचा गुर्जर होता. या वंशांत एकंदर १९ राजे झाले. त्यांत शिलादित्य नांवाचे सात राजे झाले. शेवटीं अरब लोकांनीं हल्ला करून राजधानी लुटली, व राजास ठार मारिले व या वंशाची समाप्ति झाली. यानंतर दक्षिणेंतील चालुक्य राजांचा अमल येथें बसला.[1]

---

१ मि. विन्सेन्ट स्मिथनें दिलेली वर्षें येणेंप्रमाणें आहेत; व तींच आतां खरीं मानावींत असें मत आहे:—चंद्रगुप्त ३२०—३२६; समुद्रगुप्त ३२६—३७५; दुसरा चंद्रगुप्त ३७५–४१३; कुमारगुप्त ४१३–४५५; स्कंधगुप्त ४५५–४८०;

२ वल्लभी ताम्रपटावरून त्या वेळच्या ग्रामसंस्थांच्या व वसूल करण्याच्या खात्याच्या अधिकाऱ्यांचीं वगैरें नांवें समजतात तीं अशीं आहेत:–

१ आयुक्तक } नेमलेला अधिकारी.
२ विनियुक्तक }

३ द्रांगिक–शहराचा ( द्रांग ) अधिकारी.

४ महत्तर–गांवांतील मुख्य अधिकारी; मराठी शब्द म्हातारा या शब्दापासूनच निघाला आहे.

५ चाटफट–चाट ( लबाड ) लोक पकडण्याकरितां नेमलेले भट ( शिपाई ); सांप्रतचे पोलीस.

६ ध्रुव–कायमचे वंशपरंपरेनें गांवच्या हिशेबाचें व दप्तराचें काम

( पान १२९ पहा. )

जयसिंहवर्मा चालुक्यानें प्रथम आपला अमल बसविला.

इ. स. ७४० चे सुमारास राष्ट्रकूटांनीं चालुक्यांचा पराभव करून त्यांचें राज्य घेतलें.

गुर्जर राजांचें राज्य इ. स. ५८० पासून ८०८ पावेतों होतें. या वंशांत सहावा राजा तिसरा जयभट नांवाचा होता. त्याचे वेळेपर्यंत मात्र त्यांचा अमल जारी होता. त्यानंतर या वंशाचा अमल केवळ नांवाचा होता.

---

करणारे सांप्रतचे तलाठी अगर कुळकर्णी. रयतेकडून सरकारचे अधिकारी अयोग्य रीतीनें वसूल करतात कीं काय हें पाहण्याचें त्यांचें काम होतें. कच्छ प्रांतांत कुळकर्ण्यांना अद्याप ध्रू व ध्रुव म्हणतात. नागर ब्राह्मणांत व मोध व इतर वाण्यांत ध्रू हें उपनांव आहे.

७ अधिकरणिक—मुख्य न्यायाधीश.

८ दंडपाशिक—मुख्य पोलीस अधिकारी अथवा अपराध्यांचा वध करणारा.

९ चौराद्धरणिक—चोर पकडणारा.

१० राजस्थानीय—परराष्ट्रासंबंधीं व्यवहार करणारा.

११ अमात्य—प्रधान अथवा मंत्री.

१२ अनुत्पन्नादान समुग्राहक--थकलेले सरकारी कर वसूल करणारा.

१३ शौल्मिक--जकातीचा अमलदार.

१४ भोगिक ऊर्फ भोगोद्धरणिक--जमिनीचे उत्पन्नाचा राजाचा सहावा भाग वसूल करणारा. काठेवाडांत मालकाला कुळें जो उत्पन्नाचा भाग देतात त्याला भोग असें म्हणतात.

१५ वर्त्मपाळ--रहदारीचे रस्त्यांचा चौकीदार.

१६ प्रातिसरक--शेतांचे व गांवाचे रात्रीचे पहारा करणारे.

१७ विषयपति--सुभेदार.

१८ राष्ट्रपति--प्रांताचा अधिकारी.

( पान १३० पहा. )

राष्ट्रकूट लोक मूळ कोठून आले, हें समजत नाहीं. त्यांचा मूळ राजा अभिमन्यु नांवाचा होता. ( इ. स. ४५० ). त्यांची राजधानी मान्यखेत अथवा मान्यखेट ( मालखेड ) ही होती. हें गांव सोलापुराचे अग्नेय दिशेस साठ मैलांवर दूर आहे. राष्ट्रकूटांच्या गुजराथेंतील सत्तेस आरंभ दंतिदुर्गापासून झाला. त्या राजानें गुर-जर राजा जयभट याचा पराभव करून लाट प्रांत घेतला. या वंशांतील ध्रुवराजा बलिष्ठ होता. त्याचें राज्य दक्षिण हिंदुस्थाना-पासून अलाहाबादपावेतों होतें. त्यानें आपला मुलगा गोविंद यास गुजराथेचें स्वतंत्र राज्य दिलें. ( इ. स. ८४० ). गोविंदानें तें आपला भाऊ इंद्र यांस दिलें. राष्ट्रकुटांचे गुजराथेंतील सत्तेचे तीन विभाग करतां येतील. पाहला काळ इ. स. ७४३ पासून ८०८ पावेतों ६३ वर्षांचा. या मुदतींत गुजराथेंतील राष्ट्रकूट राजे दक्षिणेंतील मुख्य राष्ट्रकूटवंशाचे सत्ताधीन होते. दुसरा काळ ८०८ पासून ८८८ पावेतों ८० वर्षांचा. त्या काळांत गुजराथेंतील राष्ट्र-

---

१९ ग्रामकूट- ग्रामाधिकारी.

राज्याचे मुख्य भाग चार होते ( १ ) विषय; ( २ ) आहार ऊर्फ आहरणी; ( ३ ) पथक; ( ४ ) स्थळी.

खेडा प्रांत व काठेवाड प्रांत यांतील जमिनीचा सारा वसूल कर-ण्याच्या पद्धति भिन्न भिन्न होत्या. खेडा प्रांतांत जमिनीच्या उत्पन्नावर कर घेत असत. दरएक पिटक अथवा टोपलीप्रमाणें कर ठरविण्यांत येई. काठेवाडांत जमिनीच्या विस्तारावर कर ठरविण्यांत येत असे. पादावर्त म्हणजे दोन पावलांमधील अंतरावरून जमीन मोजण्यांत येई.

चालुक्यांनीं कोणाचा पराभव करून गुजराथचें राज्य मिळविलें हें नक्की समजत नाहीं. परंतु बहुधा गुर्जर राजांचा त्यांनीं पराभव केला असावा. चालुक्यांची वंशावळ येणेंप्रमाणें आहे.

पुलकेशी सत्याश्रय इ. स. ६१०–६४०

( पान १३१ पहा. )

कूट राजे स्वतंत्र होते. तिसरा काळ ८८८ पासून ९७४ पावेतों.

( ज्यानें हर्षवर्धनाचा पराभव केला. )

मुख्य चालुक्य शाखा — गुजराथ शाखा

मुख्य चालुक्य शाखा:

विक्रमादित्य सत्याश्रय ( ६६९–६८० )

विनयादित्य

गुजराथ शाखा:

जयसिंहवर्मा धाराश्रय ६६९–६९१

| ( नवसरी ) | ( नवसरी ) | ( खेडा ) | ( नाशिक ) | ( नवसरी ) |
| --- | --- | --- | --- | --- |
| शिलादित्य श्राश्रय युवराज ६६९–७० आणि ६९१–९२ | मंगलराज ऊर्फ मंगलाश्रय ७३१–३२ | बुद्धवर्मा | नागवर्धन | पुलकेशी जनाश्रय ७३८–३९ |

हे राजे स्वतंत्र होतेसें दिसत नाहीं. ते बहुधा वल्लभी राजांचे मांडलिक होते. त्यांची वंशावळ येणेंप्रमाणें आहे.:—

पहिला दद्द इ. स. ५८०

पहिला जयभट ,, ६०५

दुसरा दद्द ,, ६३३

दुसरा जयभट ,, ६५५

तिसरा दद्द ,, ६८०

तिसरा जयभट ,, ७०६–७३४

या काळांत पुनः दक्षिणेंतील राष्ट्रकूट राजांची प्रत्यक्ष सत्ता गुजराथेवर होती. ९७२ वर्षाचे सुमारास पश्चिमेकडील चालुक्य राजा तैलप यानें इंद्र ऊर्फ नित्यवर्ष रट्टकंदर्प याचा पराभव केला व राष्ट्रकूट वंश समाप्त झाला.

मैत्रिक ऊर्फ भिहीर ऊर्फ मेर लोकांनीं गुप्त अंमलाचा ऱ्हास होण्याचे सुमारास आपला अमल काठेवाडांत बसविला. पोरबंदरचे राजे त्या लोकांचेच वंशज आहेत. आम्ही मकरध्वजाचे वंशज आहोंत असें त्यांचें म्हणणें आहे. मेर कुळाचे निशाणांत मकराचें चित्र होतें, यावरून त्यांच्या म्हणण्यास कांहीं आधार आहे असें दिसतें मालव, जाट, गुजर व पल्लव जातींप्रमाणें हे मेर लोकही परदेशांतून आले असावेत.

**अनहिलवाडयाचें राज्य** ( इ. स. ७२०—१३०० ).

या वेळेपर्यंतचा इतिहास ताम्रपट, नाणीं इत्यादि गोष्टींवरून अदमासानें लिहिलेला आहे. अर्थात् तो अपूर्ण व अनिश्चित आहे. परंतु इ. स. ७२० नंतरचा इतिहास बराच खात्रीलायक आहे. तथापि चावडा वंशाचे आरंभीचे इतिहासाची माहिती पूर्ण खात्रीलायक मिळत नाहीं. या इतिहासास आधारभूत ग्रंथ म्हणजे मुख्यत्वेंकरून हेमचंद्राचें द्व्याश्रयकाव्य,मेरुतुंगाचें प्रबंध चिंतामणिकाव्य, त्याचाच विचारश्रेणि ग्रंथ, कृष्णभटाची रत्नमाला, सोमेश्वराची कीर्तिकौमुदी, व अरिसिंहाचें सुकृतसंकीर्तन हे होत.

आरंभीं गुजराथ व कच्छ यांचे दरम्यान पंचासर नांवाचें एक गांव होतें. तेथें चावडा नांवाचें एक लहानसें राज्य होतें. इ. स. ६९६ मध्यें चालुक्य राजा भुवड यानें चावडा राजा जयशेखर याजवर स्वारी करून त्याचा पराभव केला. त्या वेळेस जयशेखराची स्त्री रूपसुंदरी ही गर्भवती होती. तिला त्यानें तिचा भाऊ सूरपाळ याचे बरोबर अरण्यांत पाठवून दिलें. जयशेखराच्या मृत्यू-

नंतर रूपसुंदरी प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. अरण्यांत जन्म झाल्यामुळें त्या मुलाचें नांव वनराज असें ठेविलें. (इ. स. ७२०)

तो आपल्या मामाजवळ राहिला. एका कान्यकुब्ज राजानें एका गुजराथचे राजाचे मुलीशीं लग्न केलें. त्या गुजराथच्या राजानें वरदक्षिणा देण्याकरितां आपल्या प्रजेवर कर बसविला. ती रकम वसूल करण्याकरिता कान्यकुब्ज राजाकडून जे अधिकारी आले. त्यांनीं वनराजास आपला प्रमुख म्हणून नेमलें. वनराजानें चोवीस लाख द्राम नाणीं व चार हजार घोडे जमा केले. हें द्रव्य व घोडे राजाचे अधिकारी राजाकडे घेऊन जाण्यास निघाले. वाटेंत वनराजानें त्यांच्यावर हल्ला केला, व तें द्रव्य व घोडे त्यानें आपल्या स्वाधीन करून घेतले आणि तो एक वर्ष लपूनछपून राहिला. त्या मुदतींत त्यानें बरीच फौज जमविली व राजा हें पद धारण केलें; व अनहिलवाडा हें शहर आपली राजधानी केली. हें नांव पडण्याचें कारण असें झालें कीं, वनराज आपल्या राजधानीकरितां जागा शोधीत असतां अनहिल नांवाचे धनगरास त्यानें विचारलें. तो म्हणाला, तुमचे राजधानीस माझें नांव द्याल तर मी उत्तम शकुनाची यशस्वी जागा तुम्हांस दाखवीन. वनराजानें ती गोष्ट मान्य केली आणि ते दोघे हिंडत हिंडत गेले तों त्यांनीं एके ठिकाणीं ससाचे मागें शिकारी कुत्रे लागले असतां, तो ससा कुत्र्याच्या आंगावर धावून गेला असा चमत्कार पाहिला. यावरून ही जागा शौर्याची व यशस्वी आहे असें समजून वनराजानें तेथें आपली राजधानी स्थापन केली.

राज्यप्राप्त होण्याचे पूर्वीं एका प्रसंगीं वनराज कांहीं साथीदार बरोबर घेऊन एका गांवीं दरवडा घालण्याकरितां गेला होता. त्या गांवांतील एका घरांत तो शिरला तेव्हां त्याचा हात एका दह्याचे हंडींत पडला. दहीं खाणें हें जेवण्याप्रमाणेंच आहे, अशी समजूत

होती; व ज्या घरांत आपण जेवतों, तें घर आपल्या स्नेहाचें अशी दृढ समजूत गुजराथेंत फार प्राचीन काळापासून असल्यानें वनराजानें त्या घरांतील कोणत्याही मालास हात लाविला नाहीं. ही गोष्ट त्या घराची मालकीण श्रीदेवी हिला समजली. त्यावरून तिनें वनराजास आपले घरीं जेवण्यास बोलाविलें. वनराजानें ती गोष्ट कबूल केली व तिला वचन दिलें कीं, तूं माझी बहीण झाली आहेस, तेव्हां माझा राज्याभिषेक तुझ्याहातून मी करून घेईन. त्याप्रमाणें वनराजाचा राज्याभिषेक श्रीदेवीचे हातानें झाला.

चावडा घराण्याचें राज्य एकंदर १९६ वर्षें चाललें, त्यांची शकावली येणेंप्रमाणें:—

वनराज (७६९–७८०)
|
योगराज (८०६–८४१)
|
रत्नादित्य ८४२ | वैरसिंह ८४९ | क्षेमराज ८९६

क्षेमराज ८९६
|
चामुंड ८८१
|
घाघड ९०८
|
नांव माहीत नाहीं ९३७—९६१

योगराज राज्य करीत असतांना त्याचा मुलगा क्षेमराज यानें त्यास सांगितलें कीं, प्रभास ऊर्फ सोमनाथ येथें पुष्कळ फिरस्ती जहाजें अडकून पडलीं आहेत त्या जहाजांवर पुष्कळ द्रव्य व जवाहीर वगैरे मौल्यवान माल असून दहा हजार घोडे व हत्तीही आहेत. तरी तीं जहाजें आपल्या हस्तगत करून घ्यावींत. राजाला ती गोष्ट पसंत पडली नाहीं व त्यानें आपल्या मुलास तसें करण्यास निषेध केला. परंतु राजपुत्रांनीं राजाज्ञा अमान्य करून तीं जहाजें पकडलीं. हीं गोष्ट सेवकांनीं राजाच्या कानावर घातली, तेव्हां राजा कांहीं न बोलतां स्तब्ध राहिला. सेवकांनीं राजास आपण कांहींच आज्ञा देत नाहीं, तेव्हां काय समजावें म्हणून प्रश्न केला, तेव्हां राजा म्हणाला " ही गोष्ट मीं मान्य केल्यास मला पाप लागेल व अमान्य केल्यास तुम्हांस पसंत पडणार नाहीं. आमचे पूर्वजांस लुटारू म्हणून आजपर्यंत लोक शिव्याशाप देत आले. अलीकडे आमचें आचरण शुद्ध झाल्या करणानें आमच्यावरील आरोप नाहींसा होत आला होता. आतां ह्या कृत्यानें आमच्या नांवास पुनः बट्टा लागणार. तेव्हां आतां देह न ठेवणें हेंच बरें. " असें म्हणून राजानें अग्निकाष्ठें भक्षण केलीं. चावडा वंशानंतर अन्हिलवाड्याचें राज्य चौलुक्य ऊर्फ सोळंकी वंशाकडे गेलें.

---

## चौलुक्य ऊर्फ सोळंकी वंश.

या वंशाची हकीकत हेमचंद्राचे द्व्याश्रय काव्यांत सिद्धराजापर्यंत [ ११४३ ] पूर्णपणें दिली आहे. हेमचंद्रानें या ग्रंथास इ. स. ११६० सालीं आरंभ केला. तो त्याचे मरणानंतर आभ्यतिलकगणी नांवाचे जैन साधूनें १२९५ सालीं पुरा केला.

चावडा वंशांतील शेवटचे राजाचे मृत्यूनंतर त्याचे मुलीचा मुलगा

मूळराज हा गादीवर बसला. ब्रह्मदेवाचे तळहाताचे खोलग्यापासून [चुलुक] या वंशाची उत्पत्ति झाली अशी दंतकथा आहे, यावरून या वंशास चौलुक्य असें नांव पडलें. मूळराजाचा जन्म मूळ नक्षत्रावर झाल्या कारणानें त्याचें नांव मूळराज असें ठेविलें. मूळराजा उदरांत असतांना त्याची आई लीलादेवी ही मृत्यु पावली व नंतर मूळराजास उदरांतून काढून घेतलें मूळराजा मोठा पराक्रमी होता.त्यानें काठेवाड, कच्छ, लाट हे प्रांत जिंकले, व अजमीरचे विग्रहराजाचा पराभव केला. त्यानें अनहिलवाडयास 'त्रिपुरुषप्रासाद' नांवाचें व सिद्धपुरास 'रुद्रमहालय' नांवाचें अशीं भव्य मंदिरें बांधलीं. मुळराजानें ब्राह्मणांस पुष्कळ दानधर्म केला. औदिच, श्रीगौड, व कनोज ब्राह्मणांस त्यानें कुरुक्षेत्र, बंगाल व कान्यकुब्ज येथून बोलावून आणलें. त्याचे मरणानंतर चामुंड हा गादीवर बसला [ ९९७ ]. त्यानंतर त्याचा मुलगा वल्लभ व पुढें दुर्लभ असे राजे झाले. दुर्लभानें अनहिलवाडा येथें दुर्लभ सरोवर नांवाचा तलाव बांधिला. त्याचा पुतण्या भीम याचे कारकीर्दींत महंमुदानें सोमनाथावर स्वारी केली. भीमानें सिंधच्या व चेदीच्या राजांचा पराभव केला, परंतु भोजराजाचा सेनापति कुलचंद्र यानें भीमाचा पराभव केला. व त्याचे राजधानीच्या वेशींत कवडया पेरल्या; हेतु हा कीं, अन्हिलवाडयाची किंमत कवडीइतकी आहे हें दाखवावें. भीमाचा सेनापति विमल यानें अबूचे पहाडावरील परमार राजाचा पराभव करून तेथें विमलवस्ती नांवाचें जैन मंदीर बांधलें. [१०२४]. भीमाचा मुलगा दुसरा मुळराज होता. मुळराजाचें आपलें मुलावर फार प्रेम होतें. तो मुलगा घोडयावर बसण्यांत फार निपुण होता. एके दिवशीं राजा त्या मुलावर फार खुष होऊन त्यानें त्यास कांहीं बक्षीस मागण्यास सांगितलें. त्या सालीं राज्यांत मोठा दुष्काळ पडला होता; कुणब्यांना जमिनीचा सारा देण्यास

फार जड झालें होतें. हजारों लोक सारा माफ करावा म्हणून राजास विनंति करीत होते. राजपुत्रानें या कुणब्यांचा सारा माफ करावा, एवढीच मला देणगी द्यावी असें सांगितलें. राजानें ती विनंति मान्य केली. किरसान लोक [ कुणबी लोक ] खुष होऊन आपापले घरीं परत गेले. यानंतर तीन दिवसांतच राजपुत्र एकाएकीं मरण पावला. त्यामुळें प्रजाजनांस फार दुःख झालें. पुढचे सालीं शेताचें पीक दुप्पट आलें. तेव्हां कुणबी लोक आपण होऊन दोन्ही सालचा सारा आमचेकडून घ्यावा असें म्हणूं लागले. माझे मुलाचे सांगण्यावरून मागील सालचा सारा माफ केला आहे, तेव्हां मी तो घेणार नाहीं, असें राजानें निक्षून सांगितलें. कुणबी लोक ऐकेनात. शेवटीं त्यानें पंच नेमिले व पंच सांगतील त्याप्रमाणें करावें असें ठरलें. पंचांनीं दोन्ही सालचा सारा घेऊन त्यांतून महादेवाचें मोठें मंदिर बांधावें, असें ठरविलें व त्रिपुरुषप्रासाद नांवाचें नवें मंदिर बांधलें.[१] पुढें भीम राजानें आपला मुलगा **कर्ण** यास गादीवर बसविलें, व आपण वानप्रस्थ आश्रम धारण करून मुंडकेश्वर क्षेत्रीं जाऊन राहिला. कर्णराजानें ' कर्णमेरु ' नांवाचें देवालय व ' कर्णसागर ' नांवाचा तलाव बांधला. तसेंच कर्णावती शहर बसवून तेथें कर्णेश्वर नांवाचें महादेवाचें देवालय बांधलें. हेंच कर्णावती शहर पुढें अमदाबाद झालें. कर्णाच्या लग्नाची हकीकत चमत्कारिक आहे. ती अशी:—एके दिवशीं राजाकडे एक फिरस्ता चित्रकार आला, व त्यानें राजास सांगितलें कीं, दक्षिणेंतील कदंब राजा जयकेशी याची कन्या उपवर आहे; तिनें आपली कीर्ति ऐकून आपणांशीं लग्न करण्याचा निश्चय केला आहे व आपल्यास भेटीदाखल एक हत्ती पाठविला आहे. राजा हत्ती पाहावयास

---

१ पाहिले मूळराजानें या नांवाचें मंदिर बांधलें म्हणून जें कांहीं ग्रंथकारांनीं लिहिलें आहे तें चुकीचें आहे.

गेला त्या हत्तीवर राजकन्या बसली होती. राजाला ती आवडली नाहीं, व त्यानें तिला वरण्याचें नाकारिलें. राजकन्येला ती गोष्ट कळतांच आपल्या आठ दासींसह प्राणत्याग करण्याचा तिनें निश्चय केला. राजाच्या आईच्यां कानावर ही गोष्ट गेली तेव्हां तिनें या राजकन्येशीं तूं लग्न केलेंच पाहिजे असा आग्रह धरिला. शेवटीं या गोष्टीस राजा कबूल झाला. परंतु कांहीं दिवसांनीं राजाचें मन एका वेश्येवर बसलें. त्यामुळें राणी फार कष्टी झाली व या गोष्टीस काय उपाय करावा या विवंचनेंत पडली. राजाचे प्रधानांनीं राणीला युक्ति सांगितली कीं, आपण त्या वेश्येचें सोंग घ्यावें व तिचे ठिकाणीं जाऊन बसावें. राणीला ही गोष्ट पसंत पडून त्याप्रमाणें तिनें वर्तन केलें. राजा तिच्या पाशांत पडला. तिनें राजाजवळून खुणेची मुद्रिका मागून घेतली. योग्य कालानंतर तिला मुलगा झाला. तोच पुढें प्रसिद्ध सिद्धराज झाला. कर्णास लढाई करण्याचा प्रसंग फक्त एक वेळेसच आला; तो आशा नांवाचे भिल्लाशीं. हा सहा लाख भिल्लांचा मुख्य होता. त्याचा कर्णानें पराभव केला. सिद्धराज तीन वर्षांचा असतांना एके दिवशीं सिंहासनावर जाऊन बसला. राजाला ही गोष्ट अपशकुनाची वाटलीं, व त्यानें आपल्या मंत्र्यास व ज्योतिष्यांस विचारून सिद्धराजास तेव्हांपासून युवराज केलें. कर्ण इ. स. १०९४ मध्यें मरण पावला. तेव्हां त्याचा मुलगा सिद्धराज लहान असल्या कारणानें राज्यकारभार जगदेव नांवाच्या सेनापतीच्या हातांत ठेविला. सिद्धराजाची आई एक वेळ सोमनाथाच्या यात्रेस निघाली. वाटेंत पुष्कळ यात्रेकरू, दुःखी व कष्टी असल्याचें तिच्या नजरेस पडलें. तिनें त्यांस दुःखाचें कारण विचारतां तिला असें समजलें कीं, यात्रेकरूंना जबर कर द्यावा लागतो. तो देण्याची ऐपत नसल्या कारणानें पुष्कळ

यात्रेकरूंना दर्शन झाल्याशिवाय परत जावें लागतें. राजमातेला हें ऐकून फार वाईट वाटलें व ती तेथून तशीच परतली. सिद्धराजाची गांठ पडली तेव्हां यात्रा झाल्याशिवाय परत येण्याचें कारण तिनें त्यास सांगितलें व हा कर माफ झाला नाहीं, तर मी अन्नपाणी घेणार नाहीं, अशी प्रतिज्ञा केली. कराचें उत्पन्न सुमारें ७२ लाख होतें. एवढी मोठी रकम सोडून देणें म्हणजे राज्याचें फार नुकसान होणार असें मंत्र्यांनीं सांगितलें, परंतु शेवटीं राजानें तो कर सोडून मातोश्रीच्या हातानें मंदिरांत उदक सोडविलें तेव्हां राजमातेनें यात्रा पुरी केली व देवास पुष्कळ मौल्यवान देणग्या दिल्या. सिद्धराज हा जसा मोठा धार्मिक व उदार राजा होता तसाच तो पराक्रमीही होता. राजाधिराज, महाभट्टारक, जयसिंहदेव, त्रिजगत्पति अशीं त्यांचीं नामाभिधानें होतीं. त्याला मंत्रविद्या साध्य होती अशी लोकांची समजूत असे. त्यानें गिरनारचा राजा खेंगार याचा पराभव केला, व त्याचें सोरट राज्य घेतलें. तेथें त्यानें सज्जन नांवाचा आपला प्रतिनिधि नेमला. त्या प्रतिनिधीनें तीन वर्षांचा वसूल खर्चीं घालून नेमिनाथाचें एक मोठें मंदिर बांधलें. सिद्धराजाची दुसरी लढाई माळव्याचे राजाशीं झाली, ती बारा वर्षें चालली. शेवटीं तेथील राजा यशोवर्मा यास सिद्धराजानें पकडून आणिलें. यानंतर त्यानें बुंदेलखंडांतील महोबाचा चंडेल राजा मदनवर्मा याजवर स्वारी केली व त्याजकडून खंडणी घेऊन त्याचें राज्य त्याजकडेसच ठेविलें. सिद्धराजानें अनहिलवाडा पाटण येथें सहस्त्रलिंग नांवाचा मोठा तलाव बांधला व सिद्धपुरास रुद्रमहालय नांवाचें मंदिर बांधलें. भोजराजाप्रमाणेंच सिद्धराजाही विद्वान् लोकांचा मोठा आश्रयदाता होता. त्याचे समक्ष श्वेतांबर जैन आचार्य भट्टारक देवसूरी व दिगांबर जैन आचार्य कुमुदचंद्र यांचा वाद झाला. कुमुदचंद्राचें म्हणणें, स्त्रियांना

मोक्ष मिळणें अशक्य आहे, व जैनांनीं वस्त्र परिधान करणें हें अशास्त्र आहे. वादांत शेवटीं भट्टारक सूरीचा जय झाला. हेमाचार्य ऊर्फ हेमचंद्र हा सिद्धराजाचा आश्रित होता.

सिद्धराजास मुलगा नव्हता. त्याचे राज्याला वारस कुमारपाळ नांवाचा दूरचा नातलग होता. तो पहिल्या भीमदेवाचा पणतू त्रिभुवनपाळ याचा मुलगा होता. हा त्रिभुवनपाळ दहि·थळीचा राजा होता. सिद्धराजाला कुमारपाळ गादीवर बसणें ही गोष्ट पसंत नव्हती, म्हणून त्यानें त्रिभुवनपाळाचें सर्व कुटुंब ठार मारण्याचा हुकूम केला. त्रिभुवनपाळ ठार झाला, परंतु कुमारपाळ निसटून पळाला. बैराग्याचें सोंग घेऊन बरेच दिवस तो पळत होता. राजाच्या कानावर ही गोष्ट आली तेव्हां त्याला पकडण्याकरितां सर्व बैराग्यांना एक दिवस भोजनास बोलाविण्याचा त्यानें घाट घातला. कुमारपाळ जेवणास गेला, परंतु राजानें आपल्याला ओळखिलें अशी त्याला शंका आल्याबरोबर तो तेथून निसटला. राजानें त्याचा पाठलाग करण्याकरितां लोक पाठविले, तेव्हां कांहीं कुणब्यांना त्याची दया येऊन त्याला त्यांनीं झाडझाडोऱ्यांत लपविलें, त्यामुळें तो वांचला. पुढें त्यानें आपल्या जटा काढिल्या. कांहीं दिवसांनीं तो फिरत असतां त्याला देवस्त्री नांवाची स्त्री भेटली. तिनें कांहीं दिवस त्याचा सांभाळ केला. पुढें हेमाचार्याची व त्याची गांठ पडली. हेमाचार्यानें त्यास तूं राजा होशील, असें भविष्य सांगितलें. एक दिवस राजाचा प्रधान उदयन हा हेमाचार्याकडे आला तेव्हां कुमारपाळाची व त्याची भेट झाली. त्यानें त्यास गुप्त रीतीनें मदत करण्याचें कबूल केलें. राजाला ही खबर लागली तेव्हां कुमारपाळास पकडण्यास राजानें फौज पाठविली. राजाचे लोकांनीं हेमाचार्याच्या घराची झडती घेतली. हेमाचार्यानें त्यास पोथ्या व ताडपत्रें यांत

लपवून ठेविलें. यामुळें तो वांचला. तेथून कुमारपाळ बडोद्यास ( वटपद्रपुर ) आला व तेथून भडोंचेस आला. तेथेंही त्यास तूं राजा होशील असें भविष्य एका ज्योतिषानें सांगितलें. नंतर कुमारपाळ उज्जनी, कोल्हापुर, कांची, कालंबपट्टण ( कोलम ऊर्फ क्विलोन ) वगैरे ठिकाणीं जाऊन शेवटीं अनहिलवाड्यास परत आला व सिद्धराजाचे मरणानंतर मंत्रिमंडळानें त्यास गादीवर बसविलें. ( इ. स. ११४३ ).

कुमारपाळानें सांभरचा राजा अर्णराज व माळव्याचा राजा बल्लाळ व कोंकणचा राजा मल्लिकार्जुन यांच्याशीं लढाया करून त्यांचा पराभव केला. कुमारपाळाचे राज्याचा विस्तार उत्तरेस तुर्कांच्या राज्यापावेतों, पूर्वेस गंगानदीपर्यंत, दक्षिणेस विंध्याद्रीपर्यंत व पश्चिमेस सिंधुनदीपावेतों होता. त्यानें सोमनाथाचें नवें दगडी देवालय बांधिलें. हल्लीं त्याचे गाभाऱ्यांत मशीद आहे.

कुमारपाळाचें मेवाडचे राजाचे मुलीशीं लग्न होण्याचें ठरलें तेव्हां तिला असें समजलें कीं, राजवाड्यांत प्रवेश होण्यापूर्वीं राणीनें हेमाचार्याचे मठींत जैन विद्या शिकण्यास राहावें लागतें. ही गोष्ट करण्याचें तिनें नाकबूल केलें तेव्हां कुमारपाळाच्या राजकवीनें तिला वचन दिलें कीं, तुला हेमाचार्याच्या मठींत जावें लागणार नाहीं. राजवाड्यांत कांहीं दिवस राहिल्यानंतर हेमाचार्यानें राजास विचारलें कीं, मेवाड घराण्यांतील तुझी राणी आमचे मठींत कां आली नाहीं ? तेव्हां राजानें तिला मठींत जाण्यास सांगितलें. राणीनें ती गोष्ट नाकबूल केली व ती आजारी झाली. राजकवीच्या स्त्रिया तिच्या समाचारास आल्या तेव्हां तिनें ही गोष्ट त्यांना कळविली. त्या स्त्रियांनीं राणीला आपल्या घरच्या स्त्रीचा पोषाख घालून आपले घरीं आणलीं. राजकवीनें तिला एका तळघ-

रांतून मेवाडला घेऊन जाण्याचा घाट घातला. इकडे राजाला राणी पळून गेल्याचें समजलें तेव्हां तो दोन हजार घोडेस्वार बरोबर घेऊन तिचा पाठलाग करण्यास निघाला. पाठलाग करतां करतां ईदरपासून पंधरा मैलांवर त्यांची गांठ पडली. राजकवीबरोबर दोनशें निवडक स्वार होते. त्यानें राणीस सांगितलें कीं, आपण धैर्य धरावें. आमच्यापैकीं एक मनुष्य जिवंत आहे तोंपर्यंत आपल्यास भीति नाहीं व ईदरला पोंचल्यावर आपण सुरक्षित आहों. लढाई सुरू झाली. परंतु ऐन वेळीं राणीचा धीर खचला व तिनें आपल्या गाडींतच आत्महत्त्या केली. राजाचे लोक तिचे गाडीजवळ आले तेव्हां तिच्या दासी म्हणाल्या "आतां युद्ध कशाकरतां करतां ? राणी गतप्राण झाली आहे." बिचारा कुमारपाळ हताश होऊन आपल्या राजधानीस परत आला.

कुमारपाळाचे पदरीं रामचंद्र व उदयचंद्र नांवाचे विद्वान् जैन पंडित होते. परंतु त्याचा मुख्य पंडित हेमचंद्र हा होता. त्याच्या सहवासानें त्याच्यावर जैन मताचा इतका पगडा बसला कीं, त्यानें दारू पिणें, मांस खाणें व शिकार करणें, हें सोडून दिलें व आपल्या राज्यांत हिंसा बंद केली व कोळी, फांसेपारधी, व शिकारी यांचे परवाने काढून घेतले.

हेमचंद्राचें 'हैमीनाममाला' 'अनेकार्थमाला' 'द्व्याश्रय काव्य' 'अध्यात्मोनिषद' इत्यादि ग्रंथ आहेत.

कुमारपाळ इ. स. ११७४ मध्यें मरण पावला. त्याचेनंतर त्याचा भाऊ महीपाळ याचा मुलगा अजयपाळ हा गादीवर बसला. हा राजा फार क्रूर होता. त्यानें जैन मंदिरें पाडून टाकलीं. आपला ब्राह्मण प्रधान कपर्दी यास तापलेल्या तेलाच्या कढईत टाकून दिलें; आणि जैन पंडित रामचंद्र यास तांब्याचे तापविलेल्या

पञ्यावर बसविलें. शेवटीं त्याचे पहारेकऱ्यानें त्याचा स्वतःचा खून केला.

त्याचेनंतर त्याचा मुलगा दुसरा मूळराज व मूळराजानंतर दुसरा भीम असे राजे झाले. भीमापासून साळंकी वंश नष्ट झाला, व वाघेला राजे राज्य करूं लागले. कुमारपाळानें आपला मावस भाऊ आनक ऊर्फ अर्णराज यास व्याघ्रपल्ली ऊर्फ वाघेला [ वाघाची गुहा ] नांवाचें खेडें दिलें होतें. त्यावरून या वंशास वाघेला हें नांव पडलें.

आनकचा मुलगा लवणप्रसाद व लवणप्रसादाचा मुलगा वीरधवल हे जरी वस्तुतः राज्य करीत होते, तरी त्यांनीं राजा हें पद धारण केलें नव्हतें. तें वीरधवलाचा मुलगा विशाळदेव यानें धारण केलें. लवणप्रसादाचा गुरु सोमेश्वर होता. सोमेश्वरानें कीर्तिकौमुदी व ' वस्तुपालचरित्र ' नांवाचे ग्रंथ केले आहेत. वस्तुपाल व तेजपाल हे दोघे बंधु लवणप्रसाद व वीरधवल यांचे प्रधान होते. त्यांनींच अबू, गिरनार व शत्रुंजय या पर्वतांवरील प्रसिद्ध जैन मंदिरें बांधलीं. अबूचे पहाडावरील मंदिरें शुद्ध संगमरवरी दगडांचीं आहेत. त्यावरील नक्षीकाम अप्रतिम आहे. काम करणाऱ्या कारागिरांना दररोज ते दगडाचा जितका भुसा काढतील, त्याच्या भारंभार चांदी दररोजच्या मजुरीबद्दल देत असत. काम करतांना थंडीच्या दिवसांत त्यांना शेगडच्या व सायंकाळीं त्यांना उत्तम प्रकारचें भोजन घालीत. या मंदिरांचें काम ताजमहालचे खालोखाल आहे असें तज्ज्ञांचें मत आहे.

लवणप्रसादाच्या राज्यांत त्याच्यावर देवगिरीचा यादव राजा सिंघण ऊर्फ सिंघण यानें दक्षिणेकडून व मारवाडचे चार राजे यांनीं उत्तरेकडून स्वाऱ्या केल्या. लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल हे प्रथम सिंहणाशीं लढाई करण्यास गेले. त्याचा त्यांनीं

पराभव केला किंवा त्याच्याशीं तह केला हे नक्की समजत नाहीं. परंतु एवढी गोष्ट खास आहे कीं, सिंहण आपल्या राज्यांत परत गेला. त्यानंतर मारवाडच्या राजांचा पराभव करून लवणप्रसाद स्तंभतीर्थ [ खंबायत ] एथें आला. तेथील लोकांनीं त्याचा मोठा सन्मान केला.[1] इ. स. १२३२ चे सुमारास लवणप्रसादानें राज्य-पद सोडलें व वीरधवल राज्यारूढ झाला.

वीरधवलाच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत त्याला तीन लढाया कराव्या लागल्या. त्यांपैकीं दोहोंत त्याला जय मिळाला. पहिली लढाई जुनागडच्या जवळ वामनस्थळी ऊर्फ वनस्थळीचे राजे संगण व चामुंड यांच्याशीं. ते त्याचे राणीचे बंधू होते. दुसरी लढाई कच्छांतील भद्रेश्वरच्या राजांशीं. त्यांत त्याचा पराभव झाला. तिसरी लढाई दिल्लीचा सुलतान महमद घोरी याशीं. त्यांत महमद घोरीचा पूर्ण पराभव झाला. वीरधवल इ. स. १२३८ त मरण पावला. तेव्हां त्याचे सेवकांपैकीं १८२ नोकरांनीं त्याचे बरोबर त्याचे चितेंत आपणांस जाळून घेतलें, आणखी पुष्कळ लोकही प्राण देणार होते,[2] परंतु तेजपाळ प्रधानानें त्यांस मनाई केली. [ १२४३–१२६१ ] वीरधवलानंतर त्याचा वडील मुलगा विशाळदेव गादीवर बसला.

विशाळदेवानंतर अर्जुनदेव [ १२६२–१२७४ ] शारंगदेव ( इ. स. १२७५–१२९६ ) व कर्णदेव [ १२९६–१३०४ ] याप्रमाणें राजे झाले. कर्णदेवाला घेलो [ भोळा ] असें म्हणत असत. त्याचे कारकीर्दींत अल्लाउद्दिन खिलजीचा भाऊ अलफखान

---

१ प्रो. आबाजी विष्णु काथवटे यांनीं छापलेली कीर्तिकौमुदी.

२ जपानचा मिकाडो राजा मरण पावला त्या वेळेस त्याच्या एका नामांकित सरदारानें प्राण दिल्याचें वाचकांचे स्मरणांत असेलच.

व सरदार नसरतखान यांनीं वाघेला यांचे राज्यावर स्वारी केली व त्यांचा पराभव करून त्यांचीं बायकापोरें, हत्ती, घोडे, वगैरे घेतले. कर्णदेव हा रामदेव यादव याजकडे पळून गेला. तेव्हां अन्हिलवाडयाचें राज्य नष्ट झालें. नसरतखान याचेजवळ मलिक-काफूर नांवाचा गुलाम होता. तो पुढें दिल्लीचे सुलतानाचा मुख्य सेनापति झाला, व त्यानें काठेवाड व गुजराथ हे प्रांत जिंकले.

---

# भाग १३

---

## महाराष्ट्र व तेलंगण देशांतील राज्यें.

या दोन्ही देशांत सुमारें ४९० वर्षें आंध्र राजांचा अंमल होता. या राजांचें वर्णन मागें दिलेंच आहे. तें राज्य सुमारें इ० स० २२९ सालपर्यंत चाललें. त्यानंतर २०० वर्षांचा खात्री-लायक इतिहास मिळत नाहीं. परंतु महाराष्ट्रांत राष्ट्रकूट वंशाचे राजे राज्य करीत असावे असा अजमास आहे. हा वंश पुढें ८व्या शतकाचे मध्याचे सुमारास दक्षिण हिंदुस्थानांत कांहीं काळपावेतों प्रबळ होता.

या प्रांताचा राजकीय इतिहास चालुक्य वंशापासून म्हणजे सहावे शतकाचे मध्य भागापासून सुरू होतो. हे चालुक्यवंशीय राजे उत्तरेकडील रजपूत लोकांपैकीं होते.

त्यांचा वंश पुलकेशी नांवाच्या राजानें स्थापन केला. सुमारें इ. स. ९९० सालीं त्यानें वातापी (विजापुर जिल्ह्यांतील बदामी) शहर घेतलें, व तेथें एक लहानसें संस्थान स्थापन केलें. परंतु त्याची महत्त्वाकांक्षा मोठी होती म्हणून त्यानें अश्वमेध यज्ञ केला.

त्याचें मुलगे कीर्तिवर्मा व मंगलेश यांनीं पूर्व व पश्चिम दिशेस आपलें राज्य वाढविलें. कीर्तिवर्म्यानें कोंकणांतील मौर्यांचा पराभव केला. मंगलेशाचे मृत्यूनंतर त्याच्या व कीर्तिवर्म्याच्या एका मुलाच्या दरम्यान गादीबद्दल तंटा पडला. शेवटीं कीर्तिवर्म्याचे मुलास जय येऊन तो दुसरा पुलकेशी या नांवानें इ. स. ६०८ सालांत वातापीचे गादीवर बसला. तो वीस वर्षें आसपासच्या संस्थानांशीं लढाया करण्यांत गुंतला होता. दक्षिण व उत्तर गुजराथ, व रजपुतस्थान, माळवा व कोंकण या प्रांतांपर्यंत त्याचे बाहुबळाचें वर्चस्व पसरलें.

पूर्वेस त्यानें वेंगी शहर ( कृष्णा व गोदावरी नद्यांचे दरम्यान ) घेतलें, व आपला भाऊ कुब्ज विष्णुवर्धन यास प्रतिनिधि नेमलें. ( इ. स. ६०९ ).

इ. स. ६१५ चे सुमारास पुलकेशी हा कनोजचे हर्ष राजाशीं लढाई करण्यांत गुंतला असतां, विष्णुवर्धनानें स्वतंत्र राज्य स्थापन केलें, व तेव्हां पूर्व चालुक्याचे वंशास आरंभ झाला.

चोल, पांड्य, केरल, व पल्लव या सर्वांच्या पुलकेशीशीं लढाया झाल्या. इ. स. ६३० चे सुमारास पुलकेशी हा दक्षिणेंत सर्वांत प्रबळ राजा होता.

इ. स. ६२० मध्यें पुलकेशीनें उत्तर हिंदुस्तानांतील हर्ष राजाचा पराभव केला. त्यामुळें नर्मदा नदी उत्तर व दक्षिण साम्राज्यांची मर्यादा झाली.

इ. स. ६२५ सालीं पुलकेशीनें इराणचा राजा दुसरा खुस्त्रु याजकडे वकील पाठविला, व त्या राजानेंही पुलकेशीकडे परत आपला वकील पाठविला. अजिंठ्याचे कोरीव लेण्यांत, पुलके-

---

१ भाग पांच यांतील शेवटचें कलम पहा.



पुलकेशीच्या दरबारांत इराणच्या राजाचा वकील आपल्या राजाकडून आणलेला खलिता पुलकेशी राजास देत आहे. ( पृ. १४६,१४७ ) ( अजिंठ्याचे कोरींव लेण्यावरून. आयंगार यांचे हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावरून हें चित्र घेतलें आहे. )

शीचे दरबारांत, इराणच्या राजाचा वकील आपल्या राजाकडून आणलेला खलिता राजास देत असल्याचें चित्र काढलें आहे. हि–उएन–त्संग हा पुलकेशीचे दरबारांत ६४० त आला होता. त्याला अजिंठ्याचीं कोरीव लेणीं पाहून आश्चर्य वाटल्याचें त्याच्या लेखावरून दिसतें. त्या वेळेस पुलकेशीची राजधानी वातापी येथें नसून नाशिक येथें होती असें दिसतें. पुलकेशीच्या सैन्याची तयारी फार उत्तम असल्याचें त्संग यानें लिहिलें आहे.

परंतु त्याची भरभराट फार दिवस टिकली नाहीं. इ. स. ६४२ त पल्लवांच्या लढाईचें स्वरूप अगदीं बदलून, पल्लवांनीं पुलकेशीचा पूर्ण पराभव केला. पल्लव राजानें त्याची राजधानी घेऊन लुटली व खुद्द पुलकेशीसही मारलें. पुढें तेरा वर्षेंपावेतों चालुक्याचे अमलास खंड पडला, व दक्षिण हिंदुस्थानांत पल्लवांचें प्राबल्य झालें.

इ. स. ६९९ त पुलकेशीचा मुलगा विक्रमादित्य यानें चालुक्यांच्या घराण्याचा पुनः उत्कर्ष केला व पल्लव राजाचा पराभव करून त्याची राजधानी कांची घेतली. चालुक्यांचें व पल्लवांचें युद्ध सारखें चालूच होतें. विक्रमादित्याचे कारकीर्दींत चालुक्याची एक शाखा गुजराथेंत जाऊन राहिली. पुढील शतकांत आरब लोकांचे हल्लचास या शाखेनें जोराचा प्रतिकार केला.

इ. स. ७९० चे सुमारास राष्ट्रकूट वंशापैकीं दंतिदुर्ग नांवाच्या सेनापतीनें चालुक्य राजा दुसरा कीर्तिवर्मा याचा पराभव केला. तेव्हांपासून चालुक्याच्या मुख्य शाखेचा अंत होऊन दक्षिण हिंदुस्थानचें स्वामित्व राष्ट्रकूट वंशाकडे गेलें, तें त्याचेकडे सुमारें २२९ वर्षें राहिलें.

चालुक्य वंशाचे कारकीर्दींत बौद्ध धर्माचें वर्चस्व जरी नाहींसें झालें नव्हतें, तरी जैन व हिंदुधर्म दिवसेंदिवस प्रबल होत चालले होते. मूर्तिपूजा व यज्ञयागादिकांचें महत्त्व वाढून विष्णु, शिव

वगैरे देवांचीं मंदिरें अधिकाधिक होऊं लागलीं होतीं. जैन व बुद्ध लोकांप्रमाणें हिंदुलोकही कोरीव लेणीं करूं लागले होते. प्रथमचें हिंदूचें लेणें इ. सनाच्या सहाव्या शतकाच्या शेवटीं मंगलेश राजानें वातापी नगरांत विष्णूचें मंदिर केलें तें होय.

इ. स. ७३९ त पारशी लोकांची हिंदुस्थानांतील पहिली वसाहत ठाणें जिल्ह्यांत संजान येथें स्थापन झाली.

दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें कांहीं जास्त प्रांत जिंकले, परंतु ७६० चे सुमारास त्याला त्याचा चुलता पहिला कृष्ण यानें पदच्युत केलें.

या कृष्णाचे वेळींच वेरूळ येथील डोंगरांत कोरलेलें प्रासिद्ध कैलास नांवाचें मंदिर तयार झालें. कोरीव लेण्यांत इतकें विस्तीर्ण व सुबक असें कैलासासारखें दुसरें कोणतेंही लेणें नाहीं.

कृष्णानंतर त्याचा मुलगा दुसरा गोविंद व पुढें ध्रुव हे त्याचे गादीवर आले. ( इ. स. ७७० )

ध्रुवाचा मुलगा प्रसिद्ध तिसरा गोविंद हा होता. त्यानें आपला अंमल विंध्याद्रीपासून कांची शहरापर्यंत बसाविला. पण त्याचें प्रत्यक्ष राज्य तुंगभद्रा नदीपर्यंतच होतें. त्यानें आपले भावास लाट ऊर्फ दक्षिण गुजराथ या प्रांताचा प्रतिनिधि केलें.

त्याच्या नंतरचा राजा अमोघवर्ष यानें ६२ वर्षें राज्य केलें. परंतु त्याचा बहुतेक काळ वेंगीचे पूर्व चालुक्याशीं लढण्यांतच गेला. त्यानें आपली राजधानी नाशिकाहून मान्यखेत ( मालखेड ) येथें नेली. त्याचे कारकीर्दींत दिगंबर जैनांचा चांगला उत्कर्ष झाला. त्यांचे मुख्य नायक जिनसेन व गुणभद्र हे होते. या प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या उद्योगामुळें जैन धर्माचा नवव्या व दहाव्या शतकांत उत्कर्ष होऊन बौद्ध धर्म मागें पडला. व बाराव्या शतकांत दक्षिण हिंदुस्थानांतून तो समूळ नाहींसा झाला.

पुढें तिसरे इंद्र राजानें कनोजवर स्वारी केली, व महिपालास

पदच्युत केलें. इ. स. ९४९ सालीं तिसरा कृष्ण राष्ट्रकूट याच्या लढाईंत चोलांचा राजा कृष्णादित्य रणभूमीवर मरण पावला.

सिंध प्रांतांत आठवे शतकांत आरब लोक आले व त्यांनीं आपला अंमल बसविला. राष्ट्रकूट राजे मोठे पराक्रमी असल्याचें त्यांचे ग्रंथकार लिहितात.

राष्ट्रकूट वंशांतील शेवटचा राजा दुसरा कक्क नांवाचा होता. त्याचा पराभव चालुक्य वंशांतलि दुसरा तैलप यानें ९७३ सालीं केला. या तैलप राजानें कल्याणीचे चालुक्य वंशाची स्थापना केली. तो वंश सुमारें २२५ वर्षें चालू राहिला होता. तैलप राजानें २४ वर्षें राज्य केलें. त्यानें धारच्या मुंज राजाचा पराभव केला. या मुंज राजानें तैलपाचा सहा वेळ लढाईंत पराभव केला होता. परंतु शेवटीं तो गोदावरी नदी उतरून आला तेव्हां तैलपानें त्याचा चांगला सूड उगविला. मुंज राजानें एकदां कैदेंतून सुटून जाण्याचा यत्न केला, ह्मणून त्याच्या जेवणाखाणाची व्यवस्था केली होती ती बंद केली. तैलपानें त्याला दारोदार भिक्षा मागावयास लावलें, व शेवटीं त्याचा शिरच्छेद केला (इ. स. ९९५ ).[१]

पुढें दोन वर्षांनीं तैलप मरण पावला. त्याचे नंतर त्याचा मुलगा सत्याश्रय हा गादीवर बसला. त्याचे राज्यांत चोलराजा राजराज हा सुमारें नऊ लक्ष फौज घेऊन आला, व त्यानें त्याच्या राज्यावर हल्ला केला. राजराजानें फारच लुटालूट केली व ब्राह्मण आणि बायकामुलें यांची सुद्धां कत्तल केली.

इ. स. १०५९ त सोमेश्वरानें राजाधिराजाचा पराभव करून त्यास ठार मारलें. त्यानें धार व कांची हीं शहरें घेतलीं व

---

१ पहा. भाग १२ अंक ७

चेदीचा राजा कर्ण याचा पराभव केला. इ. स. १०६८ त सोमेश्वराला असाध्य ज्वर आला तेव्हां त्यानें तुंगभद्रा नदींत जीव दिला. इ. स. १०७६ त बिल्हणच्या काव्याचा नायक सहावा विक्रमादित्य ऊर्फ विक्रमांक हा गादीवर आला. त्यानें सुमारें ५० वर्षें राज्य केलें. त्याचे कारकीर्दींत ह्मैसुरांतील दोरसमुद्र येथील होयसल वंशाचा राजा विष्णु याच्याशीं जरी लढाई झाली, तरी एकंदरीनें बरीच शांतता होती. त्याची राजधानी निजामसरकारचे राज्यांतील कल्याणी नांवाचें शहर होतें. मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर हा तेथील रहिवाशी होता.

विक्रमांकाचे मरणानंतर चालुक्य वंशास उतरती कळा लागली. इ. स. ११५६ ते ११६२ मध्यें सेनापति विज्जलकलचुरी यानें बंड केलें, व राज्याधिकार बळकाविला. पुढें ११८३ सालीं चौथ्या सोमेश्वरानें राज्याचा कांहीं भाग जरी परत घेतला, तरी देवगिरीचे यादव व दोरसमुद्राचे होयसल राजे यांच्यापुढें त्याच्यानें टिकाव धरवेना. शेवटीं इ. स. ११९० सालीं कल्याणीचा चालुक्य वंश समाप्त झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

विज्जलचे कारकीर्दींत शैव संप्रदायास विशेष जोर आला. व त्या वेळेस वीरशैव अथवा लिंगायत धर्माची स्थापना झाली. विज्जल हा स्वतः जैन होता. त्यानें लिंगायत संप्रदायाच्या दोन साधूंचे डोळे काढले. त्यावरून ११६७ त त्याचा स्वतःचा वध झाला. लिंगायत धर्माची स्थापना विज्जलाचा ब्राह्मण प्रधान बसव यानें केली होती. व्यापारी लोकांपैकीं पुष्कळांनीं लिंगायत धर्माचा स्वीकार केल्यामुळें बौद्ध व जैन धर्म अगदींच मागें पडले. बाराव्या शतकाचे मध्याचे पुढें दक्षिणेंत बौद्ध धर्माचा कांहीं मागमूसही सांपडत नाहीं.

बाराव्या व तेराव्या शतकांत ह्मैसूर प्रांतांत होयसल वंशाच्या

राजाचें बरेंच प्राबल्य होतें. बिट्टिदेव ऊर्फ बिट्टिग नांवाचा राजा इ. स. १११७ त प्रसिद्धीस आला. त्यानें दोरसमुद्र (सांप्रतचें हालेविद) येथें आपली राजधानी स्थापन केली. त्याचे राज्यांत त्याचा प्रधान गंगराज याच्या आश्रयामुळें जैन धर्मास चांगलें उत्तेजन मिळालें, व चोल राजानें जैनांचीं जीं देवळें पाडून टाकलीं होतीं त्यांचा जीर्णोद्धार झाला. परंतु पुढें रामानुज आचार्यांची गांठ पडल्यावर, बिट्टिदेव राजा वैष्णव झाला व विष्णु-वर्धन अथवा विष्णु असें नांव त्यानें धारण केलें. चोल, पांड्य व चेर राजांचा विष्णूनें पराजय केला. इ. स. ११९१–९२ मध्यें वीरबल्लाळ यानें देवगिरीच्या यादवांचा पराजय केला. इ. स. १३१० चे सुमारास मलिककाफर व ख्वाजाहाजी यांनीं होयसल प्रांतावर स्वारी केली, तेथील राजास कैद केलें व त्याची राजधानी लुटली. इ. स. १३२७ त या राजधानीचा मुसलमान फौजेनें समूळ नाश केला.

देवगिरीचा यादव वंश सुमारें ११९१ पासून १३१८ पर्यंत होता. त्या वंशांतील सिंघण नांवाच्या राजानें गुजराथ व इतर प्रांतांवर स्वाऱ्या केल्या. थोडा वेळपर्यंत त्याचें राज्य चालुक्य आणि राष्ट्रकूट यांच्याइतकेंच विस्तृत होतें. इ. स. १२९४ सालीं अल्लाउद्दीन खिलजानें या प्रांतावर स्वारी केली, तेव्हां रामचंद्र राजानें सहाशें मण मोतीं व दोन मण हिरे, माणकें पांच इ. मौल्यवान रत्नें देऊन आपला प्राण वांचविला, असें ह्मणतात. परंतु पुढें इ. स. १३०९ त मलिककाफरनें स्वारी केली तेव्हां रामचंद्र राजा शरण गेला व यादव वंशाचा शेवटचा स्वतंत्र राजा नाहींसा झाला.

त्याच्या मरणानंतर त्याचा जावई हरपाल यानें इ. स. १३१८ त बंड केलें. परंतु त्याचा पराभव होऊन तो कैद झाला. त्याचें

जिवंतपणींच कातडें काढून अखेर त्याचा शिरच्छेद केला. या रीतीनें यादव वंशाचा शेवट वाईट रीतीनें झाला.

हेमाद्रि ऊर्फ हेमांडपंत नांवाचा प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकर्ता रामचंद्र व महादेव यांच्या कारकीर्दींत होऊन गेला. त्यानें हिंदूंच्या कर्म-कांडाची व्यवस्था लावली. धर्मशास्त्रावर महत्त्वाचे ग्रंथ लिहिले. लंकेहून मोडी लिपी आणली, अशी दंतकथा आहे. परंतु त्याबद्दल कांहीं पुरावा मिळत नाहीं. त्यानें आपल्या अन्नदात्या राजांचें एक उत्तम चरित्र लिहिलें आहे.

---

# भाग १४

—:०:—

## दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यें.

कृष्णा व पंचगंगा नद्यांच्या दक्षिणेचा जो हिंदुस्तानचा प्रदेश आहे त्या प्रदेशाचा इतिहास ह्या भागांत देत आहों. साधारणपणें मद्रास इलाख्यांतील विजगापट्टम व गंजम हे दोन जिल्हे वगळून म्हैसूर, कोचीन आणि त्रावणकोर हे प्रांत मिळून जो भाग होतो तो हा प्रदेश होय. ग्रीक भूगोलवेत्ता टॉलेमी यानें या प्रांताला 'दमीरिके' असें नांव दिलें आहे. त्याचे वेळेस (इ.स. १४०) बिल्लवर ह्मणजे भिल्ल व मीनवर ह्मणजे कोळी या लोकांची या प्रांतांत वस्ती होती. तामील लोक हे येथें मागाहून आले. त्या सर्व लोकांत भूतपिशाचांची पूजा करण्याचा धर्म होता. पुढें ज्या तीन राज्यांची हकीकत सांगावयाची आहे, त्या राज्यांशिवाय सुमारें १२० लहान-मोठे राजे या प्रांतांत होते. त्यांच्या आप-आपसांत सारख्या लढाया होत असत.

पुढें कांहीं कालानें जैन, बौद्ध व हिंदु धर्मांचा या प्रांतांत प्रवेश झाला. इ. स. चे पू. ३०९ सालाचे सुमारास उत्तर हिंदुस्थानांत जेव्हां बारा वर्षांचा एक मोठा दुष्काळ पडला, त्या वेळेस तिकडून कांहीं लोक आले, व म्हैसूर प्रांतांत श्रवण बेलगोल येथें येऊन राहिले. त्यांच्यांतील भद्रबाहु नांवाचा जो मुख्य साधू होता तो जैन धर्माप्रमाणें उपोषणें करीत असतां मृत्यु पावला. श्रवण बेळगोल येथील सांप्रतचे मठाधिपति हे सदर भद्रबाहूचे वंशज आहेत असें मानितात.

अशोकराजानें आपला भाऊ महेंद्र व दुसरे बौद्ध उपदेशक या प्रांतांत ख्रि. पू. तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पाठविले. परंतु बौद्ध धर्माचें प्राबल्य दक्षिणेंत फारसें कधींच झालें नाहीं. इ. स. च्या सातवे शतकांत जैन व हिंदु धर्मांच्या तेजापुढें बौद्धधर्म मृतप्राय झाला होता.

मेग्यास्थिनीजनें लिहिले आहे कीं, तामिल लोकांत गुलामगिरी मुळींच नव्हती. हें म्हणणें जरी पूर्णपणें खरें नसलें तरी धंद्यांचा विभाग पूर्णपणें झाला असल्या कारणानें शेतकरी लोकांस लढाईचे वेळेस वगैरे जुलमानें आपलीं कामें सोडून देण्याचा प्रसंग येत नसे.

तामिल प्रांतांत मिरीं, मोतीं व बेरिल नांवाचीं रत्नें उत्तम होत असत. हे जिन्नस दुसरीकडे कोठेंही पैदा होत नसल्या कारणानें त्यांची किंमत युरोपांत फार येत असे. इ० स० ४०९ सालांत गॉथ लोकांचा पुढारी अलारिक यानें रोम शहरापासून जी खंडणी मागितली, त्यांत त्यानें तीन हजार रत्तल मिऱ्यांची मागणी केली. बेरिल रत्नांच्या तीन ठिकाणीं खाणी होत्या; ( १ ) कित्तूरनजीक पुन्नात. ( २ ) कोइमतूरजवळ पड्यूर; ( ३ ) सालेम जिल्ह्यांत बानियंबादि या तीन प्रदेशांत रोमन नाणीं अद्याप पुष्कळ ठि-

काणीं सांपडतात. यावरून त्या रत्नांचा तेथें मोठा व्यापार चालत होता हें सिद्ध होतें.

तामिल राजांजवळ मोठें आरमार होतें आणि युरोपकडील जहाजें त्यांच्या जवळून मिरीं, मोतीं व बेरिल रत्नें विकत घेण्यास येत व त्यांना युरोपांतील सोनें, चांदी वगैरे जिनसा देत. या वेळीं पुष्कळ रोमन लोक इकडे कायमचे येऊन राहिले, व तामिल राजांचे नोकरीस जे धिप्पाड यवन व न बोलणारे म्लेंच्छ असल्याचें वर्णन आहे ते हे युरोपियन लोक होत.

या प्रांताचा इ० स० चे नववे शतकाच्या पूर्वींचा खात्रीलायक इतिहास लिहिण्यापुरतीं साधनें उपलब्ध नाहींत. मि० एस कृष्णस्वामी आयंगार यांनीं ' प्राचीन हिंदुस्थान ' (Ancient India) नांवाचा इंग्रजींत ग्रंथ लिहिला आहे, त्यांत जरी पुष्कळ उपयुक्त माहिती आहे, तथापि ती सुद्धां अद्याप पुष्कळ अंशीं अपूर्ण आहे. त्याचा उपयोग मि० **स्मिथ** यांनीं **पांड्य, चोल** व **चेर** या राज्यांची हकीकत लिहितांना पुष्कळ केला आहे.

**तिनेवल्ली** जिल्ह्यांत **ताम्रपर्णी** नदीच्या मुखाशीं **कोकई** नांवाचें एक शहर होतें. तें **पांड्य** राजांचें राजधानीचें शहर होतें. तेथें तिघे भाऊ होते. या तिघां भावांनीं **पांड्य, चोल** व **चेर** अशीं तीन राज्यें स्थापन केलीं, अशी दंतकथा आहे. यांपैकीं **पांड्य** राज्य हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिण टोंकास होतें. चोल राज्य उत्तरेस **नेलोरपर्यंत** होतें व **चेर** राज्य पश्चिम किनाऱ्यास होतें. हीं तिन्हीं राज्यें द्राविडी लोकांचीं होतीं, व त्यांची भाषाही द्राविडी होती. **अशोकाचे** वेळेस **चोल** व **पांड्य** हीं राज्यें प्रसिद्ध होतीं; परंतु **चेर** राज्याच्या ऐवजीं **केरळ** आणि **सत्यपुत्र** अशीं राज्यें असल्याचें **अशोकाचे** लेखावरून दिसतें. परंतु हें **केरळ** राज्य म्हणजे

चेर राज्यच असावें व त्या राज्याची भाषा मल्याळम् ही होती. चोल व पांड्य राज्यांत तामिल भाषा होती.

या प्रांतांत आर्यांचे भाषेचा प्रवेश मुळींच झाला नाहीं व तेथील लोकांचें उत्तरहिंदुस्थानांतील लोकांशीं दळणवळण नव्हतें. परंतु दर्यावर्दी व्यापारामुळें त्यांचा संबंध दुसऱ्या देशाशीं येत होता. मानारचे आखाताचीं मोतीं, कोइमतूरचीं बेरिल नांवाचीं रत्नें व मलबारचीं मिरीं हे जिन्नस दुसरीकडे कोठेंही मिळत नसल्या कारणानें ते परदेशचे व्यापारी या प्रांतांतूनच नेत होते. इ० स० चे पूर्वीं सातवे अथवा आठवे शतकापासूनच या जिनसांना परदेशाकडून फार मागणी होती. दक्षिणहिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाची माहिती फारच थोडी आहे. परंतु द्राविडी लोकांत सुधारणा ही उच्च स्थितीप्रत पोंचली होती यांत शंका नाहीं. ब्राह्मणी धर्म व आर्य लोकांची संस्कृति या प्रांतांत कोणत्या काळीं आली हें कळण्यास मार्ग नाहीं. परंतु अजमासानें इ० स० पूर्वीं पांचवे शतकांत आली असावी असें साधारण मत आहे. इ० स० नंतरच्या दुसऱ्या शतकापूर्वींचे लेख तेथें मिळत नाहींत. त्या प्रांतांत ऐतिहासिक लेखांची जरी अगदीं गर्दी आहे तरी त्यांच्यांत फार प्राचीन लेख असे नाहींत. अशोकाचे उपदेशकांनीं बौद्ध धर्म या प्रांतांत आणला व त्याचा भाऊ महेंद्र यानें चोल प्रांतांत एक मठ बांधला.

चोल व पांड्य वंशांचा व्यवस्थित इतिहास इ० स० चे नववे दहावे शतकापर्यंतचा मिळत नाहीं. पुदुकोटाचे पल्लव राजांचा इतिहास दुसऱ्या शतकापासून थोडासा उपलब्ध आहे. परंतु हे पल्लव लोक द्राविडी लोकांपैकीं नव्हत.

---

## पांड्य.

पांड्य प्रांताचा विस्तार दक्षिण—उत्तर पुदुकोटाईपासून कन्याकुमारीपर्यंत व पूर्व—पश्चिम कारोमांडल किनाऱ्यापासून तों आच्छन्कोविल ( त्रावणकोरास जाणारा घाट ) पावेतों होता. म्हणजे साधारणपणें हल्लींच्या मदुरा व तिनेवल्ली या जिल्ह्यांइतका होता. या प्रांताचे पांच भाग केलेले होते. या राज्याची मुख्य राजधानी कोर्काई नांवाचें नगर होतें. पुढें कांहीं दिवसांनीं मदुरा नगरी त्याची राजधानी झाली.

कोर्काई अद्याप विद्यमान आहे. हल्लीं तें लहानसें एक खेडेगांव झालें आहे, परंतु प्राचीन काळीं तें मोठें बंदर होतें,व तेथें मोत्यांचा व्यापार मोठा चालत असे. कांहीं काळानें तेथील खाडी गाळानें भरून गेल्यामुळें कोर्काईपर्यंत जहाजें येतनाशीं झालीं. यामुळें या बंदरचा व्यापार कायल नांवाचे बंदराकडे गेला. तेराव्या शतकांत मार्कोपोलो या शहरीं आला होता, व त्याला तें फार भरभराटीचें स्थितींत असल्याचें दिसून आलें, परंतु पुढें कोर्काईप्रमाणें कायलची खाडी भरून आली, व त्यामुळें पोर्तुगीज लोकांना व्यापाराकरितां ट्युटिकोरिन बंदरास जावें लागलें. मदुरा ऊर्फ मधुरा शहरही कोर्काईप्रमाणें फार प्राचीन आहे.

पांड्य हें नांव प्रथम इ० स० पूर्वीं चवथ्या शतकांत रचिलेल्या कात्त्यायनाचे व्याकरणावरील ग्रंथांत आढळतें. अशोकाचे वेळेस तर पांड्य राज्य स्वतंत्र होतें. एका पांड्य राजानें रोमच्या आगस्टस सीझरचे दरबारांत वकील पाठविला होता. प्लिनीचे ग्रंथांत पांड्य राजा मदुरा शहरीं राहात असल्याचें लिहिलें आहे. रोमन लोकांचीं सहस्रावधि सोन्याचीं नाणीं दक्षिण हिंदुस्थानांत सांपडतात. मलबार किनाऱ्यावर क्यानानोरच्या जवळ इ० स० १८५१ सालीं पांच हमालांच्या ओझ्यांइतकीं सोन्याचीं नाणीं सांपडलीं.

तीं बहुतेक टायबीरीयस व नीरो बादशहाच्या टंकसाळींतील होतीं. यावरून पांड्य राजाच्या वेळेस या प्रांतांत सोन्याचें नाणें चालत होतेंसें दिसतें, आणि असें स्पष्ट सिद्ध होतें कीं, ख्रिस्ती शकाचे आरंभीं पांड्याचे राज्यांतून व मलबारांतील चेर राज्यांतून रोमन लोकांचे राज्यांत फार माल जात होता. त्या व्यापारामुळें चेर व पांड्य प्रांताचे लोकांना फार नफा होऊन रोमन लोकांचें नुकसान होतेंसें दिसतें. कारण टायबीरियस बादशहानें रोमच्या सीनेटला एक पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो, " आपला [ रोम लोकांचा ] मूळचा साधेपणा आपणांत कसा परत येईल ? कपड्यालत्त्यासंबंधानें लोकांत जे नवे नवे चार निघाले आहेत त्याला काय इलाज करावा ? बायकांमध्यें जी डामडौलाची, व विशेषेंकरून हिरे, माणिक, मोतीं वगैरेंची हाव उत्पन्न झाली आहे ती कशी बंद करितां येईल ? या चौचालपणाच्या ढंगामुळें आपल्या देशांतील संपत्ति हिंदुस्थानांत जाऊन त्याऐवजीं नकली पदार्थ आपल्या देशांत येतात. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, रोमन चलनी नाण्यांची किंमत कमी होऊन शेवटीं तें कोणी घेईनासें झालें आहे.[1] " समुद्रांतून मोतीं काढण्याचा धंदा या पांड्य राजाकडेच होता. प्रथम त्याचें ठिकाण कोर्काई येथें होतें, व नंतर कायल शहर झालें.

दुसरे शतकांतील नेडम चेल्यन नांवाचे राजाशिवाय दुसऱ्या कोणत्याही राजाचें नांव खात्रीनें कळत नाहीं. या वंशाचा पांचवे शतकानंतरचा व्यवस्थेशीर इतिहास लिहिण्यासारखी सामग्री उपलब्ध नाहीं. इ० स० ६४० त हि–उएन–त्संग या प्रांतांत आला तेव्हां त्याचे नजरेस असें आलें कीं, येथील लोकांचें लक्ष विद्येकडे

---

१ ( मॉडर्न रिव्हू, डिसेंबर १९१३ पान ५६७ ).

फार थोडें होतें. ते व्यापारधंद्यांत अगदीं निमग्न होऊन गेले होते. बौद्ध धर्माचे मठ सर्व पडून गेले होते. त्या धर्माचे अनुयायी फार थोडे राहिले होते. सर्व देशभर ब्राह्मणांचींच शेंकडों देवळें दिसत होतीं. जैन धर्माचेही बरेच लोक होते.

इ० स० ९९४ चे सुमारास **पांड्य** राज्य **चोल** राजा राज-राज याचें मांडलिक बनलें होतें. **पांड्य** राजांची **जैन** धर्मावर बरीच भक्ति होती. परंतु या संबंधानें एक कथा आहे ती अशी:– सुंदर नांवाचे **पांड्य** राजाशीं एका **चोल** राजपुत्रीचें लग्न झालें. तिनें त्या **पांड्य** राजाला जैन धर्मापासून परावृत्त करून शिवभक्त केलें. तेव्हांपासून सुंदर राजा आपल्या पूर्वींच्या सधर्मियांचा फार छळ करूं लागला. त्यानें या धर्माच्या आठ हजार निरपराधी माणसांस सुळावर चढवून ठार मारलें. अर्काट जिल्ह्यांतील त्रिवतूर गांवांतील देवळांत भिंतीवर कांहीं चित्रें खोदलीं आहेत. त्यांत या दंतकथेचा देखावा दाखविला आहे.

**पांड्य** वंशाचे कारकीर्दींत इ० स० ११६६ सालीं **सीलोनचा** राजा **पराक्रमबाहू** यानें **पांड्य** राजावर स्वारी केली. त्या स्वारीचीं दोन वर्णनें आहेत. एक **सीलोन** बेटांतील **महावंशनामक** ग्रंथांत, व दुसरें **कांचीनजीक आर्यक्कम** येथील **चोल** लेखांत. यापैकीं चोल लेखांत असें लिहिलें आहे कीं, **सीलोनच्या** सेनापतीस आरंभीं कांहीं जय मिळाला; परंतु शेवटीं दक्षिण प्रांतांतील राजे एकत्र झाल्यामुळें **सीलोनच्या सैन्यास** परत फिरावें लागलें. **वीर** व **सुंदर** ह्या नांवाच्या दोन वारसांमध्यें **पांड्य** राजाचे गादीवर वाद उत्पन्न झाला, म्हणून ही **सीलोनची** स्वारी झाली होती.

प्रो० **कीलहॉर्न** यांनीं इ० स० ११०० पासून १५६७ पावेतों सत्रा **पांड्य** राजांच्या नांवांचा पत्ता लावला आहे. त्यांत **जटावर्म** सुंदर नांवाचा राजा बराच प्रबळ होता. [ इ० स०

१२९१–१२७१ ]. इ० स० १३१० सालीं मलिककाफरनें जी या प्रांतांवर स्वारी केली त्या स्वारीचा अर्थात् बराच परिणाम झाला. परंतु हा वंश त्यामुळें अगदींच बुडाला नाहीं.

चेर, केरळ व सत्यपुत्र या वंशाबद्दल फार थोडी माहिती आहे. सत्यपुत्राचें नांव अशोकाचे लेखांत मात्र आढळतें.

केरळ हें नांव अद्याप प्रसिद्ध आहे. तो प्रांत कोंकणाच्या खालीं दक्षिणेस मलबार किनाऱ्यावर आहे. त्याची प्राचीन राजधानी वंजी हें शहर होतें. हल्लीं त्या ठिकाणीं कोचीनजवळचें तिरूकरूर हें गांव आहे. त्रावणकोरचे राजाची विश्वसनीय माहिती इ० स० ११२९ पासून पुढची मि० पी० सुंदरम–पिलई यांनीं मिळवून एक उपयुक्त ग्रंथ लिहिला आहे.

## २

## चोल राज्य.

चोल राज्य हें बरेंच विस्तृत होतें. तें पूर्व किनाऱ्यावर नेलूर शहरापासून पुदुकोटाई शहरापर्यंत व पश्चिमेस कुर्ग प्रांताचे सरहद्दीपर्यंत होतें. म्हणजे त्यांत मद्रास व पूर्वेकडील दुसरे जिल्हे व म्हैसूर संस्थान इतक्यांचा समावेश होतो. त्याची प्राचीन राजधानी उरयूर म्हणजे जुनी त्रिचनापल्ली ही होती.पाणिनी चोल राज्याचा उल्लेख करीत नाहीं, परंतु कात्त्यायन आपल्या ग्रंथांत त्याचा उल्लेख करितो. अशोक राजा यास स्वतंत्र संस्थान समजत असे.

चोल राजांपैकीं पहिला इतिहासप्रसिद्ध राजा म्हणजे करिकाल नांवाचा होय. तो इ. स. चे दुसरे शतकांत राज्य करीत असावा. त्यानें काविरिपट्टिनम नांवाचें नगर स्थापन केलें. त्याचे नंतर त्याचा नातू नेडुमुदि किल्ली गादीवर बसला. पुढें सातव्या शतकापावेतों चोल राजाचा इतिहास माहीत नाहीं.

इ. स. ६४० त हि-उएन-त्संग हा पल्हवांची राजधानी कांची

येथें आला, त्या वेळेस चोल राज्याचा विस्तार चार पांचशें मैल होता, असें तो म्हणतो. त्याच्या राजधानीचा विस्तार दोन मैलां-पेक्षांही कमी असून हा सर्व प्रदेश निर्जन होता. लोक रानटी व दरवडेखोर होते, बौद्ध धर्मांचे मठ फार थोडे होते, व जे होते ते गलिच्छ व मोडकळीस आलेले होते. त्यांत राहणारे यतींही असेच गलिच्छ होते. मुख्य धर्म जैन होता. परंतु कांहीं ब्राह्मणांचीं देवळेंही होतीं. अमरावतीचे नैर्ऋत्य दिशेस सुमारें दोनशें मैल अंतरावर हा प्रांत असावा असें त्यांचें म्हणणें आहे. ह्यावरून हल्लीं कडाप्पा जिल्हा जेथें आहे, तेथेंच हा प्रांत असावा असें अनुमान होतें. कारण इ. स. १८०० पर्यंत त्या प्रांतांत दरोडेखोर लोक पुष्कळ होते; व हि–उएन–त्संगानें वर्णन केल्याप्रमाणें या प्रांतांतील हवा फार उष्ण असून त्यांत दलदली व जंगलें पुष्कळ आहेत, व प्रांतही निर्जन आहे. हि–उएन–त्संगानें तेथील राजाचा उल्लेख केलेला नाहीं यावरून तो बलाढ्य पल्हव राजा नरसिंहवर्मा याचे ताब्यां-तील एक किरकोळ राजा असावा असें दिसतें.

नवव्या शतकांत मात्र परांतक नांवाचे राजानें आपल्या पराक्र-मानें चोल राजांचा अधिकार वाढविला. त्यानें सीलोनवर स्वारी करून जय मिळविला.पल्हव राज्याच्या मध्य भागापर्यंत त्यानें आपलें सैन्य नेलें असावें असें उत्तर अर्काट व चिंगलपट जिल्ह्यांतील लेखा-वरून दिसतें. त्या लेखांत ग्रामसंस्थांची पूर्ण माहिती दिली आहे. गांवोगांवचीं सर्व कामें पंचायतींमार्फत कशीं चालत होतीं, हें त्यावरून चांगलें समजतें.

परांतकाचा मुलगा राजादित्य हा गादीवर बसल्यानंतर दोन वर्षांतच राष्ट्रकूटाचा राजा तिसरा कृष्णराज याच्याशीं त्याची लढाई झाली, तींत तो मरण पावला ( इ. स. ९९४ ). त्यानंतर पुढें सुमारें ३६ वर्षें राज्यांत अव्यवस्था होती. त्या मुदतींत पांच

किरकोळ राजे झाले, परंतु त्यानंतर मात्र एकामागूनएक असे तीन पराक्रमी राजे गादीवर बसले. त्यांचीं नांवें राजराज देव, राजेंद्र चोलदेव व राजाधिराज अशीं होतीं.

यांपैकीं राजराज देव यानें बहुतेक सर्व मद्रास इलाखा, सीलोन व म्हैसूरचा बराच भाग इतके प्रांत आपले ताब्यांत आणले. त्यानें आपल्या कारकीर्दीच्या बाराव्या वर्षापासून चौदाव्या वर्षापर्यंत वेंगीचें पूर्व चालुक्याचें राज्य मिळविलें. पुढें तीन वर्षांत मलबार किनाऱ्यावरील क्किलोन ( कोल्लम ) व कलिंगाचें उत्तर राज्य हें त्याचे ताब्यांत आलें. त्यानें आपल्या राज्याच्या विसावें वर्षी सीलोन बेट घेतलें. चालुक्यांशीं चार वर्षें लढाई करून त्यांनाही त्यानें जिंकलें.

राजराजाजवळ प्रबळ आरमारही होतें व त्यानें लकदिव व मालदिव हीं बेटें घेतलीं.

तंजावरचें भव्य मंदिर त्याच्याच आज्ञेवरून बांधलें. त्या मंदिराचे भिंतीवर त्याचे विजयाचे इतिहासाचीं चित्रें खोदलीं आहेत. तें मंदिर अद्यापपावेतों उत्तम स्थितींत राहिलें आहे.

राजराज हा स्वतः जरी शिवभक्त होता तरी निगापट्टम बंदरावरील ब्रह्मी लोकांच्या बुद्धाचे मंदिरास त्यानें उदार देणग्या दिल्या. या मंदिराचे दर्शनास दूरदूरचे यात्रेकरू पंधराव्या शतकापर्यंत येत होते. इ. स. १८६७ सालापर्यंत यांपैकीं एक मंदिर पडक्या स्थितींत उभें होतें. त्या सालीं तें जेसूट फादर्स नांवाच्या ख्रिस्ती पाद्र्यांनीं पाडून टाकलें, व ख्रिस्ती इमारती बांधण्याकडे त्याच्या दगडांचा उपयोग केला. राजराजाचा मुलगा राजेंद्र चोलदेव हा आपले बापाप्रमाणें शूर व महत्त्वाकांक्षी होता. तो इ. स. १०१८ त गादीवर बसला. तो ओरिसा व बंगाल प्रांतापर्यंत देश जिंकीत गेला व त्यानें आपलें आरमार

दक्षिण ब्रह्मदेशांत असलेल्या कादारम बंदरावर पाठविलें. तो इ. स. १०३५ त मरण पावला. त्यानें सोळा मैल लांबीचा बंधारा बांधून प्रचंड तलाव बांधला व गंगैकोंड चोलपुरम् नांवाची राजधानी स्थापन केली. राजराजानंतर त्याचा मुलगा राजाधिराज गादीवर बसला.

इ. स. १०५२ त चालुक्यांशीं म्हैसुरांत कोप्पम येथें लढाई करीत असतां तो मरण पावला. त्याच्या नंतर त्याचा भाऊ राजेंद्र दुसरा हा गादीवर बसला. त्यानंतर वीरराजेंद्र चोल यानें चालुक्यांचा पराभव केला पुढें अधिराजेंद्र नांवाचा राजा झाला. त्याचे राज्यांत प्रसिद्ध रामानुजाचार्य हे झाले अधिराजेंद्र शैव असल्याकारणानें रामानुजाचार्य म्हैसूर प्रांतांत राहावयास गेले.त्याचे मरणानंतर ते श्रीरंगला परत आले. नांव घेण्यासारखा शेवटचा चोल राजा म्हणजे कुलोत्तुंग चोल तिसरा हा होय. त्यानें इ. स. १२८७ पासून १३२७ पावेतों चाळीस वर्षें राज्य केलें. परंतु मलिक काफरच्या स्वारीमुळें सर्व हिंदु राज्यें बलहीन झालीं. पुढें इ. स. १३७० सालीं विजयानगरचें राज्य उदयास आलें.

## पल्हव राजे.

पल्लव व पल्हव हे दोन शब्द फार सारखे असले करणानें ते एकाच जातीचे दर्शक असून ते लोक दक्षिण हिंदुस्थानांत इराणांतून आले अशी आजपर्यंत बहुतेक विद्वानांची समजूत होती. परंतु अलीकडील शोधावरून असें दिसतें कीं, दाक्षिण हिंदुस्थानांतील पल्हव लोक हिंदुस्थानांतीलच मूळचे रहिवाशी होते. ते व कुरुंब नांवाचे लोक एकच आहेत किंवा नाहींत हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. परंतु ते तामिल लोकांपासून भिन्न असावेत. कारण त्यांच्या व तामिल लोकांच्या वारंवार लढाया होत असत. कल्लर व मर्वर या रामोशांच्या जाती व पल्ली ही जात पल्लव जातीपैकींच आहेत.

पुदुकोट्टाईचा राजा हा कल्लर जातीचा मुख्य आहे व तो आप-ल्यास पल्लव राजा म्हणवून घेतो. तेव्हां कल्लर व मर्वर जातींप्रमाणेंच पल्लव ही लुटारू लोकांची एक जात असावी. यांचे राज्यास इ० स. चे तिसरे शतकापासून म्हणजे आंध्र साम्राज्य मोडल्यापासून आरंभ झाला असावा. समुद्रगुप्तानें इ. स. ३५० त ज्या विष्णुगोप नांवाच्या राजाचा पराभव केला तो कांचीचा पल्लव राजाचा होता. हस्तिवर्माही पल्लव राजाच होय.

इ. स. ५५० पासून इ. स. ७५२ सालापर्यंत पल्लव व चालुक्य यांच्या एकसारख्या लढाया चालूच होत्या. इ. स. ५७५ सालीं सिंह विष्णु नांवाचा पल्लव राजा होता. त्यानें सीलोनचे राजे व तीन तामिल राजे यांचा पराभव केला.

सिंहविष्णूचा मुलगा महेंद्रवर्मा ( इ. स. ६०० ते ६२५ ) यानें त्रिचनापल्ली, चिंगलपट, व उत्तर व दक्षिण अर्काट प्रांतांत पुष्कळ कोरींव लेण्याचीं मंदिरें बांधलीं. महेंद्रवाडी नांवाचे शहराजवळ त्यानें बांधलेल्या इमारतींच्या व तलावांच्या खुणा दिसतात. चालुक्य राजा दुसरा पुलकेशी यानें महेंद्रवर्माचा इ. स. ६०९ किंवा ६१० या सालीं एका मोठ्या लढाईत पराभव केला. त्या सुमारास चालुक्य राजानें पल्लवांचा उत्तरेकडील वेंगी प्रांत घेतला, व त्या प्रांताचा कारभार त्यानें आपल्या धाकट्या भावाकडे सोंपविला. महेंद्रवर्म्यानें दक्षिणेकडे त्रिचनापल्ली वगैरे प्रांत घेतले. तो आरंभीं जैनधर्माचा होता, परंतु पुढें शैव झाला.

महेंद्रवर्माचा इ० स० ६०९ किंवा ६१० या सालीं एका मोठ्या लढाईत पराभव केला. त्या सुमारास चालुक्य राजानें पल्लवांचा उत्तरेकडील वेंगी प्रांत घेतला, व त्या प्रांताचा कारभार त्यानें आपल्या धाकट्या भावाकडे सोंपविला. त्यानंतर महेंद्र-

वर्म्यानें दक्षिणेकडे त्रिचनापल्ली वगैरे प्रांत घेतले. तो आरंभीं जैन धर्माचा होता, परंतु पुढें शैव झाला.

पल्लव वंशाचा विशेष उत्कर्ष महेंद्रवर्म्यानंतरचा राजा नरसिंह-वर्मा याचे कारकीर्दींत झाला ( इ० स० ६२६ ते ६४५ ). इ० स० ६४२ त त्यानें दुसऱ्या पुलकेशीची वातापी नांवाची राजधानी काबीज केली व दक्षिण हिंदुस्थानांत पल्लव राजा सर्व राजांत प्रबळ झाला. त्याचा अंमल म्हैसूरपासून महाराष्ट्रा-पर्यंत झाला.

त्याचे कारकीर्दींत हिउएनत्संग हा कांचीस आला होता ( इ० स० ६४० ). त्यानें जें वर्णन दिलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, कांची शहराचा विस्तार पांच सहा मैलांचा होता. पल्लवाचे राज्यांत शंभर बौद्ध मठ असून त्यांत दहा हजारांवर भिक्षु रहात असत. ते सर्व महायान पंथापैकीं स्थविर संप्रदायाचे होते. हिंदु व जैन लोकांचीं सुमारें ऐशीं मंदिरें होतीं. दिगंबर जैनही बरेच होते. पांड्य देशांत बौद्ध धर्म बहुतेक नष्ट झाला होता. प्रसिद्ध नालंद पाठशाळेचा मुख्य अध्यापक धर्मपाल याचा जन्म कांची येथें झाला होता. कांची हें क्षेत्र हिंदुस्थानांतील सात प्रसिद्ध क्षेत्रांपैकीं आहे हें सांगावयास नको. तेथील कैलास नांवाचें भव्य मंदिर दुसरा नरसिंहवर्मा यानें बांधलें.

इ० स० ६५५ चे सुमारास विक्रमादित्य चालुक्यानें परमे-श्वरवर्मा नांवाचे पल्लव राजाचा पराभव करून कांची शहर घेतलें, व तें चालुक्यांकडे कांहीं दिवस राहिलें.

या दोन राष्ट्रांच्या लढाया वर लिहिल्याप्रमाणें सारख्या चालूच होत्या. इ० स० ७४० त दुसरा विक्रमादित्य चालुक्य यानें नंदीवर्मा पल्लवाचा पराभव करून कांची शहर घेतलें. तेव्हांपासून पल्लव राज्याला जी उतरती कळा लागली ती कायमचीच लागली.

चालुक्यांनंतर राष्ट्रकूटांनीं पल्लव राजाशीं लढाया सुरू केल्या. इ० स० ७७५ त ध्रुव राजानें पल्लवांचा पराभव केला, व इ० स० ८०३ सालीं तिसरा गोविंदराजा यानें पल्लव राजा दंतिग याचे पासून खंडणी घेतली.

दहावे शतकांत गंगवाडी ऊर्फ म्हैसूरचे गंग राजे व पल्लव यांच्या लढाया झाल्या. या गंगांना पश्चिमेकडील गंग म्हणतात, व कलिंगांतील गंगांना पूर्वेकडील गंग म्हणतात. यांच्यापैकीं अनंतवर्मा छोडगंग नांवाचे राजानें इ० स० १०७६ पासून इ० स० ११४७ पावेतों राज्य केलें. त्यानेंच पुरी येथील जगन्नाथाचें प्रसिद्ध मंदिर बांधलें.

शेवटीं शेवटीं पल्लव राजे केवळ सरदार व जहागिरदार असे बनले.

सत्रावे शतकापर्यंत पल्लव सरदारांचीं नांवें ऐकूं येतात. त्यानंतर त्यांची स्वतंत्र जात राहिली नाहीं. कल्लर, पल्ली व वेल्लाळ जातींत ते मिसळून गेले. पाहिले पल्लव राजे बौद्ध धर्माचे होते. हस्तिवर्मा, विजयस्कंदवर्मा व विष्णुगोपवर्मा हे विष्णुभक्त होते. महेंद्रवर्मा आरंभीं जैन होता. परंतु पुढें तो शैव झाला. शेवटचे पल्लव राजे शिवभक्त होते.

---

## महाराष्ट्राचा संक्षिप्त प्राचीन इतिहास.

—:०:—

विंध्याद्रीचे दक्षिणेस आर्यांचें प्रथमचें स्थान विदर्भ ( वऱ्हाड ) होतें असें दिसतें. अगस्ति ऋषीचा आश्रम त्या प्रदेशांत होता. रामायणांत सुग्रीवानें सीतेचा शोध करण्याकरितां ज्या देशांत

आपले दूत पाठविले त्यांपैकीं विदर्भ हा एक होता. महाभारतांत अगस्ति ऋषीनें तपोबलानें उत्पन्न केलेली मुलगी विदर्भ देशाचे राजाजवळ ठेवल्याचा उल्लेख आहे.[2] रामायणांतील पंचवटी नाशकासच असल्याचें अद्याप बहुमत आहे. पांड्य, चोल, केरळ या देशांचा उल्लेख रामायणांत आहे. पाणिनीचे ग्रंथांत कच्छ, अवंति, कोसल, करूष व कलिंग देशांचा उल्लेख आहे. त्यांचे दक्षिणेकडील प्रदेशांचा उल्लेख नाहीं. कात्यायनाचे वार्तिकांत पांड्य व चोल लोकांचा व महिष्मान देशाचा (महिष्मति नर्मदातीरीं होती) व नाशिक्य नगराचा उल्लेख आहे. पतंजलीनें महिष्मति, वैदर्भ, कांचीपूर, केरळ ऊर्फ मलबार यांचा उल्लेख केला आहे. पातंजलीचा काळ ख्रि० पू० १५० असल्याचें आतां निश्चित झालें आहे. पाणिनीचा काल खि० पू० सातवे किंवा आठवे शतकांत असावा. कात्यायन त्यानंतर तीन चार शतकांनीं झाला.

अशोकवर्धनाचें आज्ञापत्रांत राष्टिक, पेटेनिक ( पैठण ) व अपरांत ( उत्तर कोंकण ) लोकांकडे धर्मोपदेशक पाठविल्याचें लिहिलें आहे. हे राष्टिक ऊर्फ राष्ट्रिक म्हणजे महाराष्ट्राचे रट्ट नांवाचेच लोक असावेत. या रट्ट लोकांपैकीं एका संघानें राष्ट्रकूट हें नांव धारण केलें होतें व ते चालुक्यांपूर्वीं महाराष्ट्रावर राज्य करीत होते. तीनशें वर्षांनीं पुन्हा एकवार त्यांनीं आपली सत्ता बसविली होती, परंतु पुनरपि चालुक्यांचेंच वर्चस्व झालें. कांहीं काळानंतर रट्ट राजे सुगंधवर्ती ऊर्फ सौंदत्ति येथें राज्य करीत होते. विदर्भ देशांतील भोज लोक ज्याप्रमाणें आपल्यांस महाभोज म्हणवूं लागले, त्याप्रमाणें राष्ट्रिक, रट्टि, रठ्ठि, रट्ठ हे आपल्याला

---

१ रामायण, चवथें काण्ड, अ. ४१. २ महाभारत, पर्व ३, अध्या. ९६।९७.

महारठ्ठ असें म्हणवूं लागले. अशोकाचे दुसरे व तेरावे राजाज्ञेंत चोल, पांड्य, केतलपुत्र ( चेर अथवा केरळ ) आंध्र व पुलिंद यांचीं नांवें आहेत. यावरून पतंजलीचे कालाचे पूर्वीं शंभर वर्षें तरी निदान महाराष्ट्राचें उत्तर हिंदुस्थानाशीं निकट दळणवळण होतें, व महाराष्ट्रांत रट्ट व भोज राजे राज्य करीत होते असें स्पष्ट होतें.

भाजें, बेडसा व कार्ली या ठिकाणच्या कोरीव लेण्यांत महारठी व महारठिणी अशीं दानें करणारांचीं नांवें सांपडतात. तसेंच नानाघाट येथील गुहेंत महारठी वीराचें नांव लिहिलें आहे. हे लेख इ० स० चे दुसरे शतकांतील आहेत. प्राकृत भाषांपैकीं मुख्य भाषेचें नांव महाराष्ट्री असें होतें. सेतुबंध नांवाचें प्राकृत भाषेंतील काव्य कालिदासानें लिहिल्याचा लौकिक आहे. वराहमिहिरानें महाराष्ट्राचा उल्लेख केला आहे. अइहोल येथील लेखांत महाराष्ट्रांत तीन देश व नव्याणव हजार खेडीं असल्याचें लिहिलें आहे. हिउएनत्संग यानें चालुक्याचे राज्यास महोलोच असें म्हटलें आहे; तोच महाराष्ट्र देश होय.

---

## राजकीय इतिहास.

चंद्रगुप्त मौर्याचे राज्याचा विस्तार काठेवाडच्या दक्षिणेस झाला नव्हता. अशोकानें कलिंग देश जिंकला. त्याचे पांचवे शासनपत्रिकेवरून राष्ट्रिका, पेटेनिक व अपरान्त देश जरी त्याचे प्रत्यक्ष राज्याचे बाहेरचे होते तरी ते त्याचे मांडलिक होते असें दिसतें. विदर्भ देशांत त्या वेळेस स्वतंत्र राज्य होतें. शुंगवंशीय पुष्पमित्र राजाचा मुलगा अग्निमित्र यानें विदर्भपति यज्ञसेन याचा चुलत भाऊ माधवसेन याचे मध्यस्तीनें त्याची बहीण मालविका आपल्याला द्यावी अशी मागणी केल्याचें मालविकाग्निमित्र नाटकांत आहे. प्रतिष्ठान ऊर्फ पैठण एथें स्वतंत्र राज्य होतें.

नाशकाजवळचे नानाघाटचे गुहेंतील लेखांवरून व नाशीक आणि कार्लि एथील लेखांवरून व कांहीं दानपत्रांवरून व कोल्हापूर येथील स्तूपांत सांपडलेल्या तांब्याच्या व शिशाच्या नाण्यांवरून जीं राजांचीं नांवें निघतात तीं हीं आहेतः—कृष्णराज, शातकर्णी, क्षहरांत, नहपान व त्याचा जांवई उषवदात, गौतमीपुत्रशातकर्णी, वशिष्ठीपुत्रपुळमाइ, गौतमीपुत्रश्रीयज्ञशातकर्णी, वशिष्टीपुत्रचतुष्पर्णशातकर्णी, व मधरीपुत्रशाकसेन.

यांपैकीं नहपान व उषवदात हे शक होते व त्यांचें राज्य शातकर्णी व गौतमीपुत्रशातकर्णी या दोन राजांचे काळाचे दरम्यान होतें. कारण गौतमीपुत्रानें शक, यवन, पल्लव, यांना हाकून देऊन आपल्या वंशाचें राज्य पुनः स्थापन केल्याचें नाशिक एथील गुहेचे लेखांत लिहिलें आहे.

वायु, विष्णु इत्यादि पुराणांत मौर्य, शुंग, काण्व यांचे वंशानंतर आंध्रभृत्यांचा वंश झाल्याचें लिहिलें आहे. तो आंध्रभृत्य वंश व वर सांगितलेला शातवाहन वंश एकच होय.

या शातवाहनाचे राजांची यादी व शकावली येणेंप्रमाणें आहे—

### महाराष्ट्रांतील राजे.

| | | |
|---|---|---|
| पुलुमायी | इ० स० | १३०—१५४ |
| यज्ञश्री | ,, | १५४—१७२ |
| चतुःष्पर्ण ऊर्फ चतुरपन | ,, | १७२—१८९ |
| मधरिपुत्र | ,, | १९०—१९७ |

१ शालिवाहन हें शातवाहन या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप आहे. पैठणच्या शालिवाहनानें उज्जनीचे विक्रमराजाचा पराभव केला ही दंतकथा उज्जनीच्या क्षत्रपाचा गोतमीपुत्रशातवाहनानें पराभव केला त्यावरून निघाली असावी. ( Ekrly History of the Dekkan )

## तेलंगणांतील राजे.

| | |
|---|---|
| पुळुमायी | १५४—१५८ |
| शिवश्री | १५८—१६५ |
| शिवस्कंद | १६५—१७२ |
| यज्ञश्री | १७२—२०२ |
| विजय | २०२—२०८ |
| चंद्रश्री | २०८—२११ |
| पुलोमवि | २११—२१८ |

शालिवाहनाची जी आख्याइका प्रचारांत आहे ती अशी आहे. पैठणास एका कुंभाराचे घरीं एक दोन वर्षांची ब्राह्मणाची लहान मुलगी आपल्या दोन भावांसुद्धां रहात होती. एके समयीं ती गोदावरी नदीवर स्नानास गेली असतां शेष तिच्या रूपास मोहित होऊन तिच्याशीं रममाण झाला. योग्य कालानंतर तिला शालिवाहन नांदाचा मुलगा झाला. तोही अर्थात् कुंभाराचेच घरीं राहूं लागला. इकडे उज्जयनीस विक्रमराजा राज्य करीत होता. त्याला एका देवतेनें असें भाविष्य सांगितलें कीं, तुझा मृत्यु एका दोन वर्षांचे मुलीचे मुलाचे हातानें होईल. विक्रम राजानें असा मुलगा कोठें आहे याचा तपास करण्याकरितां देशोदेशीं दूत पाठविले. त्यांपैकीं एकानें त्यास या शालिवाहनाची खबर दिली. त्यावरून राजा सैन्य घेऊन पैठणावर स्वारी करण्यास आला. शालिवाहनानें चिखलाचे हत्ती, घोडे, व सैनिक तयार केले व त्याचा जनक शेष यानें त्याला मंत्र दिला होता त्या मंत्राचे बलानें त्यानें आपल्या मृण्मय सेनेची प्राणप्रतिष्ठा केली व त्यानें विक्रमाचा पराभव केला.

शालिवाहनानें प्राचीन मराठी भाषेंत सप्तशति नांवाचा ग्रंथ केल्याची आख्याइका आहे. वास्तविक तो ग्रंथ हाल नांवाचे आं-

ध्रभृत्य राजानें केला. तो आर्याछंदांत आहे व त्यांत बहुतेक शृंगाराच्या गोष्टी आहेत.

पैशाची भाषेंत बृहत्कथा नांवाचा ग्रंथ याच वंशाचे वेळेस झाला. त्याच नांवाचा दुसरा ग्रंथ क्षेमेंद्र यानें केला आहे. तो व सोमदेवाचा कथासरित्सागर हे दोन्ही ग्रंथ मूळच्या पैशाची ग्रंथावरून लिहिले आहेत. शातवाहनाचा प्रधान गुणाढ्य याला या गोष्टी काणभूती नांवाच्या पिशाच्यानें सांगितल्या व त्या रक्तानें लिहिल्या असून त्याचीं सात पुस्तकें होतीं. तीं तो राजास देत असता राजानें घेण्याचें नाकारल्यावरून त्यांपैकीं सहा त्यानें जाळून टाकलीं. पुढें राजाची इच्छा ते ग्रंथ घेण्याची झाली, तेव्हां त्यांपैकीं एकच शिल्लक होतें. तेंच तें हें होय.

कथा सरित्सागरांत कातंत्र व्याकरणाची हकीकत दिली आहे.

## आंध्रभृत्यांचे कारकीर्दींत महाराष्ट्राची धार्मिक, सामाजिक व सांपत्तिक स्थिति.

बौद्ध व ब्राह्मणी लोकांत परस्पर द्वेष अथवा वैर असल्याचें दिसत नाहीं. राजाकडून दोघांनाही आश्रय व उत्तेजन मिळत असे. उषवदातानें लक्षावधि ब्राह्मणांस अन्नदान दिलें. गोतमीपुत्र हा ब्राह्मणांचा आश्रयदाता असल्याचें वर्णन आहे. हे दोघेही बौद्ध धर्माचे अनुयायी होते. शक व यवन हे या देशांत येऊन कायमचे रहिवासी झाले. शकांनीं ब्राह्मण धर्म स्वीकारला. महाभोज, महारठी, सुवर्णकार, वर्धक, ( सुतार ) धान्यकश्रेणी ( भुसारी ), गांधिक ( औषधी विकणारे ), वगैरे गृहस्थ पुष्कळ खर्च करून मोठमोठालीं मंदिरें बांधीत; भिक्षूंकरितां मठ बांधीत. श्रावण महिन्यांत नवीं वस्त्रें परिधान करण्याचा विधि होत असे. त्याचे खर्चाकरितां धार्मिक लोक मोठमोठ्या पेढ्यांवर रकमा ठेवीत असत; त्याचे व्याजांतून पिढ्यानुपिढ्या हा खर्च केला जात असे. बरूगझ

अथवा भरूकच ( भडोंच ), कल्याण, सोपारा, सेमुला ( चेंबूर किंवा चौल ), मंदगोर ( राजापुरचे खाडीवरील मांदाड ), पलई-पटमई, ( महाडा जवळील पाल ) वगैरे बंदरें होतीं. पैठण, नगर, जुन्नर, नाशिक, कऱ्हाटक ( कऱ्हाड ), टालेमीचे हिपोकरा ( कोल्हापूर ) वगैरे व्यापाराचीं शहरें होतीं.

व्याजाचा दर दरसाल दर शेंकडा पांच पासून साडे सात टक्के होता असें उषवदातानें दोन हजार कारशापणाचें व्याज शंभर धरलें होतें; व दुसरें एका ठिकाणीं एक हजाराचें पाउणशें धरलें होतें, यावरून दिसतें.

दूरदूरच्या ठिकाणीं दानें दिल्याचीं उदाहरणें आहेत यावरून जाण्यायेण्याचे मार्ग बरेच सोईचे होते असे होतें. कार्लीचे लेण्यांत वैजयंती व सोपारा येथें राहणारांनीं दानें दिल्याचें; नाशिकच्या व्यापाऱ्यांनीं बेदसा येथें; भरूकच्छ व कल्याणचे लोकांनीं जुन्नरास; उत्तर हिंदुस्थानचे दात्यानें नाशिक येथें दानें दिल्याचे लेख आहेत.

निगम सभा ( ग्राम स्वराज्य ) असल्याचें उषवदाताचे नाशिकचे लेखांत आहे.

---

आंध्र भृत्यानंतर तीनशें वर्षांचा इतिहास बरोबर समजत नाहीं. कांहीं वर्षें अमीर ( गौळी ) राजांचें राज्य नाशिक व खानदेश या प्रांतांवर होतें. तें सुमारें इ० स० ३०२ पावेतों होतें. बाकीच्या भागावर चालुक्यांचें राज्य होईपर्यंत राष्ट्रकूटांचें राज्य होतें. हे राष्ट्रकूट म्हणजे महारठ्ठी रजपूत होत. फार प्राचीन काळापासून हे महाराष्ट्रांत आले होते. आंध्रभृत्याचे अमलांत त्यांचा अधिकार लुप्तप्राय होता. आंध्रभृत्यांची सत्ता कमी झाल्यावर पुन्हा त्यांची सत्ता सुरू झाली. मध्यंतरीं त्रैकूठ नांवाचा एक वंश होतासें दिसतें. परंतु त्याबद्दल खात्रीची माहिती उपलब्ध नाहीं.

बिल्हण कवीनें विक्रमांक चरित्रांत चालुक्यांची उत्पत्ति दिली आहे, ती अशी- एके समयीं इंद्र ब्रह्मदेवासन्निध प्राप्त झाले, व त्यांना सांगितलें कीं, पृथ्वीवर पाप फार झालें आहे; कोणी यज्ञ-याग करीत नसल्यामुळें देवांना हवि मिळत नाहीं. ब्रह्मदेव त्या वेळेस संध्या करीत होते. अर्घ्यप्रधानाकरितां ओंझळींत पाणी घेतलें होतें. त्यांनीं ओंझळी ( चुळक ) कडे पाहिलें तों त्यांतून एक दिव्य पुरुष उत्पन्न झाला. तोच चालुक्य वंशाचा मूळ पुरुष होय.

या वंशापैकीं नांवलौकिकास आलेला प्रथम राजा म्हणजे जयसिंह हा होय. त्यानें राष्ट्रकूटांचा पराभव केला व त्यांचा देश घेतला. त्यानंतर रणराग व पुलकेशी राजे झाले. पुलकेशीनें अश्वमेध यज्ञ केला. त्यानें वातापीपूर ( बदामी ) ही नगरी आपली राजधानी केली. त्याचें पूर्ण नांव सत्याश्रमश्रीपुलकेशीवल्लभ-महाराज असें होतें. त्याचे नंतर त्याचा मुलगा कीर्तिवर्मा हा गादीवर बसला. त्यानें नळ ( हे कोठें होते हें समजत नाहीं ) लोकांचा व उत्तर कोंकणांतील मौर्य राजे व उत्तर कानड्याचे वनवाशीचे कदंब राजाचा पराभव केला.

कीर्तिवर्म्याला तिघे मुलगे होते. परंतु ते तिघे लहान असल्यामुळें त्याचा भाऊ मंगलीश हा राज्य करूं लागला. त्यानें कलचुरी लोकांचा पराभव केला. त्यांचे देशाचें नांव चेदी असें होतें. त्यांची राजधानी जबलपुराजवळ त्रिपुर ऊर्फ तेवूर नांवाचें नगर होतें.

मंगलीशानंतर कीर्तिवर्म्याचा मुलगा पुलकेशी गादीवर बसला. हा दुसरा पुलकेशी शूर व बुद्धिमान् राजा होता. त्यानें राष्ट्रकुटांचा राजा गोविंद याचा पराभव केला, व मौर्य व कदंब यांना जिंकलें. शेंकडों जहाजें बरोबर घेऊन त्यानें पुरी शहर घेतलें. लाट, माळवा, व गुरजर देशांचे राजे जिंकले. कनोजचा प्रसिद्ध राजा हर्षवर्धन याचा त्यानें पराभव केला. कोसल व कलिंग दे-

शांचे राजांना त्याची नेहमीं भीति वाटे. कांचीपुर नगरीला त्यानें वेढा दिला. चोल, पाण्ड्य व केरळ देशांचे राजे त्याचे मित्र झाले.

या राजाचेच कारकीर्दींत हुएनत्संग प्रवाशी या प्रांतांत आला. त्यानें महाराष्ट्राचें वर्णन दिलें आहे. त्यांत तो म्हणतो कीं, या राज्याचा विस्तार १२०० मैल होता. त्याचे राजधानीचा विस्तार सहा मैल होता. तेथील जमीन सुपीक असून हवा उष्ण आहे. लोक साधे व प्रामाणिक आहेत. ते कृतज्ञ आहेत, परंतु त्यांच्या कोणी वाटेस गेल्यास ते त्याचा सूड उगविण्याकरितां आपल्या प्राणाकडेही पहावयाचे नाहींत. लढाईंत पळणारांचा ते पाठलाग करतात. परंतु शरणागताचें रक्षण करतात. त्यांचा सेनापति लढाई खाईल तर त्याला ते बायकांचीं लुगडीं नेसावयास लावतात व त्याला ते प्राण द्यावयास लावतात. लढाईस जाण्याच्या वेळेस ते स्वतः दारू पिऊन धुंद होतात, व ते आपल्या हत्तींनाही दारू पाजून धुंद करतात.

या पुलकेशीनें इराणच्या खुसरू राजाकडे आपला वकील पाठविला, व त्या राजानेंही त्याजकडे परत आपला वकील पाठविला. त्यानें आपला भाऊ विष्णुवर्धन ऊर्फ विषमसिद्धी याजकडे सातारा व पंढरपुरचा कारभार सांगितला होता. त्या विष्णुवर्धनानें कृष्णा व गोदावरी नद्यांचे दरम्यान वेंगी येथें एक चालुक्यांची शाखा स्थापन केली. पुलकेशीचा दुसरा भाऊ जयसिंग हा नाशिकचा प्रतिनिधि होता, पुलकेशीचा ज्येष्ठ चिरंजीव चंद्रादित्य हा सांवंतवाडी जिल्ह्याचा अधिकारी होता, पुलकेशीचा दुसरा मुलगा आदित्यवर्मा याजकडे कृष्णा व तुंगभद्रा नद्यांचे संगमाजवळील प्रांतांचा कारभार होता.

पुलकेशीनंतर त्याचा दुसरा मुलगा विक्रमादित्य हा त्याचे

गादीवर बसला, त्याचे राज्याचे आरंभीं कांचीचा पल्लव राजा व चोल, पाण्ड्य व केरळ देशांचे राजांनीं त्याचा अंमल झुगारून देण्याचा प्रयत्न केला, परंतु विक्रमादित्यानें त्यांचा पराभव करून त्यांना शरण येण्यास लाविलें.

विक्रमादित्यानें गुजराथेंतील राज्यावर आपला भाऊ जयसिंहवर्मा धाराश्रय यास नेमिलें.

विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा विनयादित्य व विनयादित्यानंतर त्याचा मुलगा (म्हणजे विक्रमादित्याचा नातू) विजयादित्य हे गादीवर बसले.

विजयादित्याचा मुलगा दुसरा विक्रमादित्य इ० स० ७३३ मध्यें गादीवर बसला. राज्याभिषेकानंतर लवकरच त्याला पल्लव राजा नंदिपोतवर्मा याच्याशीं युद्ध करावें लागलें. त्याचा पराभव झाल्यानंतर चोल, पाण्ड्य, व केरळ यांच्याशीं त्यानें लढाया करून त्यांचा पराभव केला. विक्रमादित्यानें चौदा वर्षें राज्य केलें. त्याचे पश्चात् त्याचा मुलगा कीर्तिवर्मा हा गादीवर बसला. त्याचे कारकीर्दींत चालुक्यांची महाराष्ट्रावरील सत्ता नाहींशी होऊन ती राष्ट्रकुटांचे राजाकडे गेली.

या राष्ट्रकूट राजाचे नांव दंतिदुर्ग असें होतें. त्याचे पश्चात् कृष्ण नांवाचा राजा झाला. या चालुक्यांचे वेळेस बौद्ध धर्मापेक्षां जैन धर्माचें प्राबल्य ज्यास्त होतें, व पौराणिक धर्महीं वाढत्याप्रमाणावर होता. पहिल्या पुलकेशीनें अश्वमेध यज्ञ केल्याचें वर लिहिलेंच आहे. रेवास्वामी दीक्षिताचा नातू दासस्वामी, नंदिस्वामी, लोहस्वामी, भल्लस्वामी, देवस्वामी वगैरेंना दानें केल्याचे उल्लेख आहेत. कापालिकेश्वराचे मंदिरास एक गांव दान दिल्याचें नाशिकचे लेखावरून समजतें. मंगलीशानें बदामीस विष्णूचें मंदिर बांधलें.

## राष्ट्रकूट वंश.

( इ. स. ७४८–९७३ )

राष्ट्रकूट हे यदूचे वंशांतील सात्यकी शाखेचे होते अशी दंत-कथा आहे. परंतु या म्हणण्यास खात्रीलायक आधार नाहीं. मागें लिहिलेंच आहे कीं, रजपुत कुळीपैकीं रठ्ठ नांवाचा एक संघ होता. व राष्ट्रकूट हें नांव रठ्ठ या नांवावरूनच पडलें. राष्ट्रकूट वंश महाराष्ट्रांतील राजवंश होता. शातवाहन व चालुक्यांसारखें परदेशी राजांच्या स्वाऱ्यांमुळें त्यांचे राज्याचा कांहीं दिवस लोप होत होता. परंतु पुनः ते आपलें राज्य चालवीत असत. त्यांचा माहीत असलेला प्रथमचा राजा दंतिवर्मा नांवाचा होता. या वंशाचे एकंदर एकोणीस राजे झाले. त्यांचा वंशवृक्ष येणेंप्रमाणें आहेः—



१ दंतिवर्मा.
|
२ इंद्रराज.
|
३ गोविंद
|
४ कर्क
- ५ दुसरा इंद्र
  - ६ दंतिदुर्ग
- ७ कृष्ण ऊर्फ अकालवर्ष ऊफ शुभतुंग
  - ८ दुसरा गोविंद
  - ९ ध्रुव
    - १० तिसरा गोविंद ऊर्फ जगत्तुंग ऊर्फ प्रभूतवर्ष.
      - ११ शर्वनृपतुंग ऊर्फ अमोघवर्ष
        - १२ दुसरा कृष्ण उर्फ अकालवर्ष.
          - जगत्तुंग
            - १३ तिसरा इंद्र ऊर्फ नित्यवर्म.
              - १४ दुसरा अमोघवर्ष
              - १५ चवथा गोविंद
            - १६ बद्दिग उर्फ तिसरा अमोघवर्ष.
              - १७ तिसरा कृष्ण. ऊर्फ अकालवर्ष
              - १८ खोटिक निरूपण
                - १९ कक्कल.
    - इंद्र
      - कर्क
      - गोविंद
        - गुजराथेंतील राजे.

सहावा राजा दंतिदुर्ग यानें दुसरा कीर्तिवर्मा चालुक्य याचा पराभव करून महाराष्ट्राचें आधिपत्य मिळविलें. त्यानें कांची, कलिंग, कोसल, श्रीशैल, मालव, व लाट देशांचे राजांचा पराभव केला. तो इ. स. ७५३ नंतर मेला. त्याला मुलगा नसल्यामुळें त्याचा मामा कृष्णराज ऊर्फ अकालवर्ष ऊर्फ शुभतुंग हा गादीवर बसला. त्यानेंही बराच पराक्रम केला. वेरूळ येथील कैलास लेण्याचें मंदिर त्यानेंच बांधलें. तो सुमारें इ० स० ७७५ त मरण पावला. नववा राजा ध्रुव ऊर्फ धारावर्ष यानें कांचीचे पल्लव राजाचा, प्रयागाजवळील वत्सांचे राजाचा, व कोसल राजाचा पराभव केला. त्याचा मुलगा तिसरा गोविंद याचे कारकीर्दींत राष्ट्रकूट वंशाची ख्याती फार वाढली. एके समयीं बारा राजांनीं मिळून त्याच्यावर स्वारी केली. त्या सर्वांचा त्यानें मोड केला. त्यानंतर त्यानें गुजराथ व माळवा प्रांतांवर स्वाऱ्या केल्या. तेथून तो विंध्याद्रीपर्वताकडे वळला. तेथील माराशव नांवाचा राजा त्याला शरण आला. पर्जन्य काळानंतर तो तुंगभद्रा नदीकडे आला, व पल्लव राजाचा पुरा मोड केला. तेथून त्यानें वेंगीचे राजास आज्ञापत्र पाठविल्यावरून तो राजा त्यास शरण आला. लाटदेश त्यानें आपला भाऊ इंद्र यास दिला. याच गोविंद राजाला प्रभूतवर्ष व पृथ्वीवल्लभ असें म्हणतात.

या वंशांतील शेवटचा राजा कक्कल नांवाचा होता. तो शूर योद्धा होता. परंतु चालुक्य वंशाचा तैलप राजा यानें त्याचा पराभव केला व राष्ट्रकूट वंशाचें राज्य चालुक्याचे हातीं गेलें. (इ.स.९७३)

या वंशाचे राज्यांत शिव, विष्णु वगैरे पौराणिक देवांचीं पुष्कळ भव्य मंदिरें बांधण्यांत आलीं. बौद्ध धर्माची महती कमी झाली. जैन धर्मास बरेंच उत्तेजन मिळालें. अमोघवर्षानें तो धर्म कदाचित् स्वीकारलाही असावा.या वंशांतील एका कृष्ण राजाचें

वर्णनात्मक कविरहस्य नांवाचें काव्य हलायुध नांवाचे कवीनें रचिलें आहे.

## नंतरचे चालुक्य राजे.

राष्ट्रकूटांनीं दुसरा कीर्तिवर्मा चालुक्य याचा पराभव करून ज्या चालुक्य वंशाची समाप्ति केली तोच वंश पुढें चालू राहिला असें मानण्यापेक्षां तैलपानें वेगळ्याच चालुक्य वंशाची स्थापना केली हें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. कारण पूर्वींचे चालुक्य राजे आपली पूर्वपीठिका हारितराजापावेतों पोचावितात, तर हे नवे चालुक्य फक्त सत्याश्रयापर्यंतच लावतात. शिवाय हे नवे चालुक्य आपल्याला जगदेकमल्ल, त्रिभुवनमल्ल अशा पदव्या धारण करतात. पूर्वींचे चालुक्य अशा पदव्या धारण करीत नव्हते.

राष्ट्रकूटांचा पराभव केल्यानंतर तैलपानें चोल व चेदीचे राजांवर स्वाऱ्या केल्या, व अन्हिलवाड्याचे मूळ राजाशीं लढाई केली. परंतु त्या राजानें तैलपाचा पराभव केला, असें गुजराथी इतिहासकारांचें म्हणणें आहे. परंतु तें खरेंच असेल असें खात्रीनें सांगवत नाहीं. तैलपानें धारचे मुंज राजाचा पराभव करून त्यास बंदींत टाकलें, व त्यानें सुटून जाण्यास यत्न केला तेव्हां त्याचा शिरच्छेद केला.

तैलपानंतर त्याचा मुलगा सत्याश्रय गादीवर बसला. सत्याश्रयानंतर त्याचा पुतण्या विक्रमादित्य गादीवर बसला. त्याचे नंतर विक्रमादित्याचा भाऊ जयसिंह; जयसिंहानंतर त्याचा मुलगा सोमेश्वर हा राजा झाला. त्यानें आपलें वंशाचे वहिवाटीप्रमाणें चोल राजावर स्वाऱ्या केल्या. या सोमेश्वरास आहवमल्ल असेंही म्हणतात. त्यानें कल्याण ( सांप्रतचे निजाम सरकारचे राज्यांत ) नगरी स्थापन केली. त्याला तीन मुलगे होते. त्यांपैकीं विक्रमादित्य हाच विशेष प्रसिद्ध आहे.

दुसऱ्या मुलांचीं **सोमेश्वर** व **जयसिंह** अशीं नांवें होतीं. त्यांपैकीं विक्रमादित्य हा सर्वांत ज्यास्त पराक्रमी होता म्हणून राजाचे मनांत त्यास युवराज नेमावयाचें होतें. परंतु त्यानें तो मान घेण्याचे नाकारलें. सबब **सोमेश्वरास** युवराज नेमिलें. परंतु सर्व अधिकार विक्रमादित्याचे हातीं होता.

विक्रमादित्यानें **माळव्याचे** राजास मदत करून त्यास पुन्हा गादीवर बसविलें. **गौड** देशावर ( **बंगाल** ) व **कामरूप** ( **आसाम** ) देशावर त्यानें स्वाऱ्या केल्या; **केरळ** राजाला जिंकलें; **सिंहल** राजा त्यास शरण आला; **गांगकुंड** नगरी घेतली; व **चोल** राजा तो आल्याबरोबर पळून गेला. त्यानंतर विक्रमादित्यानें **कांची** नगर घेऊन तें लुटलें व **वेंगी** व **चक्रकोट** नगराकडे तो वळला.

याप्रमाणें विक्रमादित्य पराक्रम करीत होता तों इकडे राजास फार भयंकर ज्वर आला व त्यानें **तुंगभद्रा** नदींत जलसमाधि घेतली ( इ. स. १०६९ ). तेव्हां त्याचा ज्येष्ठ चिरंजीव **सोमेश्वर** हा सिंहासनारूढ झाला. विक्रमादित्य परत आला तेव्हां त्यानें मिळविलेली सर्व संपत्ति आपले वडील भावाचे स्वाधीन केली. परंतु **सोमेश्वर** हा मत्सरी व दुर्बल राजा होता. आपले भावाचे विरुद्धच तो कपट करूं लागला. विक्रमादित्याचें तो ऐकेना. तेव्हां तो आपला कनिष्ठ भाऊ **जयसिंह** यास बरोबर घेऊन राजधानी सोडून गेला. **सोमेश्वरानें** त्यांच्यावर सैन्य पाठविलें. परंतु विक्रमादित्यानें त्या सैन्याचा पराभव केला, व **चोल** देशाकडे गेला. तेथून तो **मलय** देशाकडे वळला. **कोंकणचा** राजा **जयकेशी** यानें त्यास अपार संपत्ति दिली. त्याची राजधानी **गोपकपट्टण** ( गोंवें ) होती.

विक्रमादित्यानें आणखी देश जिंकले व बहुत पराक्रम केला. शेवटीं त्याचा भाऊ **सोमेश्वर** यानें त्याच्यावर स्वारी केली. दोघां बंधूंचें मोठें युद्ध झालें. त्यांत **सोमेश्वराचा** पराभव झाला व तो

विक्रमाचे हातीं सांपडला. विक्रमादित्यानें त्यास पदच्युत केलें व आपण राज्यारूढ झाला. आपला धाकटा भाऊ जयसिंह यास त्यानें वनवाशीचा [ सांप्रतचे उत्तर कानड्यांतील ] प्रांत दिला [ इ० स० १०७८ ].

या विक्रमादित्यानें पन्नास वर्षें उत्तम रीतीनें राज्य केलें. त्यास त्रिभुवनमल्ल, कलिविक्रम, व परमादिराव अशींही नांवें आहेत. त्यानें करहाटक ( कऱ्हाड ) चे शिलाहार राजाची कन्या चंद्रलेखा इच्याशीं विवाह केला.

विक्रमादित्याचे राज्यारोहणानंतर कांहीं वर्षांनीं त्याचा भाऊ जयसिंह याचे मनांत आपले वडील बंधूचें राज्य घेण्याचें येऊन त्यानें एक मोठें बंड उभारलें. विक्रमादित्यानें त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तो सर्व व्यर्थ गेला. व शेवटीं जयसिंह पुष्कळ राजांचें साह्य घेऊन कृष्णानदीचे तीरावर मोठी सेना घेऊन आला. आसपासचीं गांवें त्यानें लुटलीं. पुष्कळ लोकांना कैदेंत टाकलें व प्रत्यक्ष राजालाही अपमानकारक निरोप पाठविले. शेवटीं नाइलाज होऊन राजा त्याशीं लढण्यास आला. जयसिंहाची फौज फार मोठी आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें.तथापि त्यानें युद्ध करण्याचा निश्चय केला. प्रथमारंभीं जयसिंहाचे हत्ती विक्रमाचे सेनेवर चाल करून आले, तेव्हां त्याच्या सेनेचा बराच घोटाळा झाला. त्याचे घोडे, हत्ती व लोक परत फिरूं लागले. ही गोष्ट विक्रमाचे दृष्टीस पडली तेव्हां तो एकटाच आपल्या बेफाम झालेल्या हत्तीवर बसून शत्रूचे सैन्यावर तुटून पडला, व सारखा आपले दोन्ही बाजूंचे शत्रूचे लोकांचा संहार करीत चालला. हें त्याचे अचाट कृत्य पाहून शत्रूचे लोक भयभीत झाले व सैरावैरा पळूं लागले. जयसिंह अरण्यांत लपून बसला असतांना विक्रमाचे लोकांनीं त्यास धरून राजापुढें आणलें. परंतु राजानें त्यास क्षमा केली.

विक्रमाचे कारकीर्दीचे अखेरीचे सुमारास यादव कुळींतील होयसल शाखेचे राजानें त्याचे राज्यावर स्वारी केली. हा राजा द्वारसमुद्र येथें राज्य करीत होता. म्हैसुरांतील सांप्रतचें इळेबीद नांवाचें जें गांव आहे त्यासच तेव्हां द्वारसमुद्र म्हणत असत. विक्रमाचा अच ऊर्फ अचगी नांवाचा शूर मांडलिक राजा होता त्यानें होयसल राजाचा पूर्ण पराभव केला.

विक्रमानें विक्रमपूर नांवाचे नगराची स्थापना केली व त्याचे जवळच एक भव्य विष्णु मंदीर बांधलें व त्याचे समोर एक मोठा तलाव बांधला. त्यानें आपल्या प्रजेचा उत्तम रीतीनें सांभाळ केला. तो फार उदार होता. विद्वान् लोकांना त्याचा मोठा आश्रय होता, हें बिल्हणसारख्या काश्मिर इतक्या दूर देशाहून आलेल्या पंडितास आश्रय मिळाला यावरून सिद्ध होतें. बिल्हणास त्यानें विद्यापतीचे जागेवर नेमलें. मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर हा त्याचेच कारकीर्दींत होता. तो कल्याणासच रहात असे. विक्रमादित्याचे राज्याची माहिती बहुतेक बिल्हणाचें विक्रमांकचरित्रावरूनच मिळते. दुसरे चालुक्य वंशांत त्याच्यासारखा दुसरा मोठा राजा झाला नाहीं.

विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा सोमेश्वर गादीवर बसला (इ०स० ११२७). त्यानें अकरा वर्षें राज्य केलें. त्याच्या राज्यांत विशेष म्हणण्यासारखीं युद्धें वगैरे झालीं नाहींत, परंतु त्यानें मानसोल्लास ऊर्फ अभिलाषितार्थचिंतामणि नांवाचा एक अलौकिक संस्कृत ग्रंथ लिहिला. हा एक विलक्षण ग्रंथ आहे. अमक्या एका विषयासंबंधानें यांत माहिती नाहीं, असा विषय क्वचितच. राजनीति, ज्योतिष, फलज्योतिष, तर्कशास्त्र, अलंकार शास्त्र, कविता, संगीत, चित्रकला, शिल्पशास्त्र, वैद्यक, घोडे, हत्ती, कुत्रे वगैरे जनावरांस शिकविण्याची विद्या, वगैरे विषय यांत आले आहेत. त्याचे पांच

भाग आहेत. पहिल्या भागांत नवें राज्य कोणच्या उपायांनीं मिळतें हें लिहिलें आहे. दुसऱ्या भागांत राज्य मिळाल्यानंतर त्याचें रक्षण कसें करावें; तिसऱ्या भागांत राज्य स्थाइक झाल्यानंतर राजास कोणच्या प्रकारचे भोग भोगण्यास सवड आहे; चवथ्यांत मानसिक सुखें मिळून करमणूक कशी होते; पांचव्यांत बागेंत, शेतांत वगैरे ठिकाणीं खेळण्याचे खेळ, स्त्रियांचे सहवासांत खेळण्याचे खेळ इत्यादि अनेक विषय आहेत. या दरएक भागाचे वीस पोट भाग आहेत. अनतापासून अलिप्त राहणें, परपीडा न करणें, शुद्ध आचरण, औदार्य, सहानुभूति, परमेश्वराचे ठिकाणीं पूर्णश्रद्धा, अनाथांस अन्नदान करणें व त्यांचें संरक्षण करणें वगैरे सद्गुणांचें विवेचन आहे.

या राजाचे अपार विद्वत्तेमुळें त्यास सर्वज्ञानभूप असें नांव मिळालें. त्याचे नंतर त्याचा मुलगा जगदेकमल्ल गादीवर बसला ( इ० स० ११३८ ). त्यानें बारा वर्षें राज्य केलें. नंतर त्याचा भाऊ दुसरा तैलप आला. या दोन्ही राजांचे कारकीर्दींत चालुक्यांची सत्ता क्षीण झाली. ही संधि पाहून कलचुरी वंशांतील विज्जल ऊर्फ विज्जन यानें चालुक्य राज्य हस्तगत करून घेण्याचा घाट घातला. त्यानें कोल्हापुरचा विजयार्क नांवाचा महामंडलेश्वर राजा व दुसरे आणखी राजे यांचे सहाय्यानें तैलपास त्याची कल्याण राजधानी सोडून जावयास लावलें. तेव्हां तैलप धारवाड जिल्ह्यांतील अन्निगिरि नगरांत जाऊन राहिला ( इ० स० ११५७ ). कांहीं दिवसांनीं विज्जलाचा कोणीं वध केला व तैलपाचा मुलगा सोमेश्वर आपल्या ब्रह्म नांवाच्या शूर सरदाराच्या मदतीनें राजा झाला. परंतु हा त्यांचा जय त्यांना फार दिवस लाभला नाहीं. दक्षिणेंतील यादवांनीं ब्रह्माचा पराभव केला व चालुक्य वंशाच्या राज्याची समाप्ति झाली ( इ० स० ११७९ ).

या वंशाच्या लहान लहान पुष्कळ शाखा झाल्या होत्या. त्यांपैकीं एकीचा पत्ता कोंकणांत लागला आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील संगमेश्वर तालुक्यांत चाळके उपनांवाचीं अद्याप मराठ्यांचीं घराणीं आहेत.

---

## कलचूरी वंश.

विज्जनानंतर त्याचा मुलगा सोम हा गादीवर बसला. सोमानंतर त्याचा [ सोमाचा ] भाऊ संकम हा बसला. त्याचे राज्यापैकीं कांहीं भाग चवथा सोमेश्वर चालुक्य यानें घेतला व कलचूरी वंश नष्ट झाला ( इ० स० ११८२ ). विज्जनाचें राज्य जाण्यास व त्याचा वध होण्यास बसव नांवाचा ब्राह्मण कारण झाला. त्याजकडे राजाचे द्रव्याच्या निधीच्या व्यवस्थेचें काम होतें. त्याचा भाचा चेन्नबसव नांवाचा होता. त्या दोघांनीं शिवाचे अर्चनाचा एक नवा प्रकार काढला. त्यांत लिंग व नंदी यांचें प्रामुख्य होतें. त्यांना लवकरच पुष्कळ अनुयायी मिळाले. त्यांपैकीं कांहींना त्यांनीं या नव्या धर्माचे धर्माधिकारी नेमले. त्यांना जंगम म्हणत. या जंगमांना बसव पुष्कळ द्रव्य देऊं लागला. विज्जनाचा मचण्णा नांवाचा प्रधान होता. त्याचें व बसवाचें हाडवैर होतें. मचण्णानें बसव्याच्या कागाळ्या सांगितल्यावरून विज्जनानें बसवाला कैद करण्याचा यत्न केला परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. बसवाचे हल्लेमग व मधुवेय्य नांवाच्या दोन परम एकनिष्ठ अनुयायांचें क्रूरपणानें विज्जनानें डोळे काढले. सर्व जंगमांना राजाच्या या कृतीनें फार त्वेष आला व त्यांनीं राजाचा प्राण घेण्याचा निश्चय केला. जगदेव मल्लय व बोम्मय हे सशस्त्र राजवाड्यांत घुसले व राजाचे मंत्री, प्रधान, राजपुत्र यांचे समक्ष राजाचा तलवारींनीं प्राण घेतला. याप्रमाणें विज्जनराजाचा अंत

झाला ( इ० स० ११६१ ). त्याचे पश्चात् वर सांगितल्याप्रमाणें सोमल व संकम यांनीं राज्य केलें, व इ० स० ११८२ त कलचूरी वंश संपला.

---

## दुसरे चालुक्यांची वंशावळ.

१ तैलप ( ९७३—९९७ )

२ सत्याश्रय. ( ९९७—१००८ )

दशवर्मा.

३ विक्रमादित्य. ( १००८--१०१८ )

४ जयसिंह. ( १०१८—१०४० )

५ सोमेश्वर आहवमल्ल. ( १०४०—१०६९ )

६ दुसरा सोमेश्वर. ( १०६९--१०७६ )

७ दुसरा विक्रमादित्य. ( १०७६--११२६ )

जयसिंह.

८ तिसरा सोमेश्वर. ( ११२६--११३८ )

९ जगदेकमल्ल. ( ११३८--११५० )

१० दुसरा तैलप.[1] ( ११५०--११६५ )

११ चवथा सोमेश्वर. ( ११८२--११८९ )

---

१ इ. स. ११६५ त कल्चुरी विज्जनाच्या बंडामुळें चालुक्य राजसत्तेस खंड पडला.

## देवगिरीचे यादव.

या वंशाची माहिती मुख्यत्वें करून हेमाद्रीनें व्रतखंड नांवाचा ग्रंथ लिहिला आहे त्यावरून मिळते. हा हेमाद्री यादव वंशांतील महादेव नांवाचे राजाचा प्रधान होता. तोच हेमाडपंत या नांवानें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे.

यादव हे मूळचे मथुरेचे राजे होते.श्रीकृष्णाचे वेळीं ते द्वारकेस आले. त्यांनीं दृढप्रहार नांवाचे राजाचे वेळेपासून दक्षिणेंत राज्य संपादन केलें. हा दृढप्रहार सुबाहु नांवाचे सम्राटाचे चार मुलांपैकीं दुसरा मुलगा होता. दृढप्रहाराची राजधानी चंद्रादित्यपूर [ नाशकाकडील चांदोर ] नांवाची नगरी होती. दृढप्रहराचा मुलगा सेऊणचंद्र नांवाचा होता. त्यानें सेउणपूर नांवाचें नगर बसविलें. तो ज्या देशावर राज्य करीत होता त्याला सेउण देश ( सांप्रतचा खानदेश ) म्हणत होते. मूळचें संस्कृत नांव बदलून गुजराथच्या अहमद बादशाहानें या देशास खानदेश असें नांव ठेवलें.

यादव वंशाची वंशावळ येणेंप्रमाणें आहे:—

दृढप्रहार.
|
सेउणचंद्र.
|
धादियप्प.
|
भिल्लम.
|
राजगी ऊर्फ श्रीराज.
|

( पान १८६ पहा. )




यादवांच्या दोन शाखा होत्या; एक म्हैसुराकडील हाळेबीडची व दुसरी उत्तरेकडील. दुसरे विक्रमादित्य चालुक्याचे कारकीर्दीत दक्षिणेकडील विष्णुवर्धन यादवानें चालुक्य राजावर स्वारी केली. परंतु त्याचा पराभव झाला. पुढें त्याचा नातू

वीरबल्लाळ यानें चालुक्य चवथा सोमेश्वर याजवर स्वारी केली. त्यांत त्याला जय प्राप्ति झाली. कांहीं काळानंतर उत्तरेकडील यादव व दक्षिणेकडील यादव यांचीं आपसांत युद्धें झालीं व शेवटीं दक्षिणेकडील वीरबल्लाळ याची सरशी झाली. उत्तरेकडील भिल्लम याचा पराभव झाला ( इ० स० ११९१ चे कांहीं दिवस पूर्वीं ).

इ० स० ११९१त भिल्लमाचा मुलगा जैत्रपाळ हा गादीवर बसला. याचे राज्यांत ज्योतिषी भास्कराचार्यांचा मुलगा लक्ष्मीधर हा मुख्य पंडित होता. जैत्रपाळाचा मुलगा प्रसिद्ध सिंघण हा होता. तो इ० स० १२१० त गादीवर बसला. त्यानें जज्जल नांवाचे राजाचा पराभव केला व त्याचे हत्ती तो घेऊन आला. कक्कूल राजाचा त्यानें पराभव केला, माळव्याचा राजा अर्जुन यास त्यानें जिंकलें व भोजराजास कैद केलें. गंगाधराचा मुलगा जनार्दन यानें त्यास हस्तिशिक्षण विद्या शिकविली. वर लिहिलेला जज्जल हा छत्तिसगड देशांतील चेदि वंशाचा राजा असावा. कक्कूल हा त्याच वंशाचे पश्चिम शाखेपैकीं राजा आसावा; भोज हा पन्हाळ्याचे शिलाहार वंशापैकीं होता. या भोजाचे पराभवानंतर कोल्हापुरचें राज्य यादवांनीं आपल्या राज्यांत सामील केलें. सिंघणानें गुजराथेंत दोन तीन स्वाऱ्या केल्या.

दक्षिणेकडे सिंघणाचा सेनापति बीचण ऊर्फ बीच यानें रट्ट, गोव्याचे कदंब, कोंकणांतील गुत्त ( गुप्ताचे वंशज ) पांड्य, होयसल वगैरे राजांचा पराभव केला.

याप्रमाणें सिंघणाचें राज्य बरेंच विस्तृत झालें. हे यादव श्रीकृष्णाचे वंशज असल्यामुळें ते आपल्यास विष्णुवंशोद्भव व द्वारावतीपुरवर्धीश्वर म्हणवीत असत. सिंघण व त्याचे पूर्वींचे दोन राजांचे कारकीर्दींत श्रीकर्णाधिपाचे ( म्हणजे मुख्य चिटणीसाचे ) कामावर सोढल नांवांचा मनुष्य होता. पुढें याच कामावर हेमाद्रि यास

नेमलें. सोढलाचा मुलगा शारंगधर यानें संगीतरत्नाकर नांवाचा संगीत शास्त्रावर ग्रंथ लिहिला आहे. सिंघण राजानें या ग्रंथावर टीका लिहिली आहे. सिंघणचा मुख्य ज्योतिषी भास्कराचार्याचा नातू चांगदेव हा होता. त्यानें आपल्या आजाच्या सिद्धांत शिरोमणि नांवाचे ग्रंथांचा अभ्यास करण्याकरितां चाळिसगांव भागांत पाटणा येथें एक मठ बांधला.

सिंघणानंतर त्याचा नातू कृष्ण गादीवर बसला. त्याचा लक्ष्मीदेव नांवाचा मंत्री होता. तो हत्तीपथकाचा सेनापतिहि होता. शिवाय त्यानें सूक्तिमुक्तावलि नांवाचा निवडक संस्कृत कवितांचा संग्रह केला आहे. त्याचा ज्येष्ठ बंधु मल्ल ऊर्फ मल्लिसेठी नांवाचा होता. ह्यानें कृष्णराजाचे संमतीनें बागेवाडी गांवांतील जमीनी वेगवेगळ्या गोत्रांच्या बत्तीस ब्राह्मणांस दान दिल्या. या ब्राह्मणांपैकीं कांहीं पटवर्धन व वैसास या उपनांवांचे आहेत व कांहीं घळिसास, घळिस, व पाठक उपनावाचे आहेत. अमलानंदानें याच राज्यांत वेदांत कल्पतरु नांवाच्या वाचस्पतिमिश्राचे भामति ग्रंथावर टीका लिहिली. हा भामति ग्रंथ शंकराचार्यांचे वेदांत सूत्रभाष्यावर टीकात्मक आहे.

कृष्णानंतर त्याचा भाऊ महादेव हा इ० स० १२६० त गादीवर बसला. त्यानें कोंकणचा राजा सोम ऊर्फ सोमेश्वर याचा पराभव करून कोंकण आपले राज्यांत सामील केलें. महादेवानंतर त्याचा मुलगा जरी कांहीं वेळ राज्य करीत होता, तरी थोड्याच काळानें गादीचा योग्य स्वामी म्हणजे कृष्णराजाचा मुलगा रामचंद्र हा सिंहासनारूढ झाला. त्याला रामदेव किंवा रामराजा असें म्हणतात. त्यानें सत्तावन ब्राह्मणांना तीन गांवें अग्रहार दिलीं. दानपत्रांत लिहिलें आहे कीं, दान दिलेली जमीन कोणास गहाण देऊं नये;

गांवांत वेश्यांना राहूं देऊं नये; द्यूत होऊं देऊं नये; शस्त्रांचा उपयोग करूं नये; व आपला कालक्षेप सत्कार्यांत करावा.

हेमाद्रि हा महादेव व रामदेव या दोघांचाहि प्रधान होता. त्यानें आपल्या धर्मशास्त्राचे ग्रंथांत आपल्यास महादेवाचा श्रीकर्णाधिप अथवा श्रीकर्णप्रभू असें म्हटलें आहे. हा अधिकारी अलिकडील संस्थानांतील फडणिसाप्रमाणें होता. त्याचे बापाचें नांव कामदेव, आजाचें नांव वासुदेव, व पणजाचें नांव वामन होतें. त्याचें गोत्र वत्स होतें. तो विद्वान् असून शूरही होता. तो फार उदार होता. त्यानें ब्राह्मणांचे धर्मविधीची व्यवस्था लावली. त्याचे ग्रंथांचें नांव चतुर्वर्गचिंतामणि असें आहे. त्यांत चार भाग आहेत. ( १ ) व्रतकांड; ( २ ) दानकांड; ( ३ ) तीर्थकांड; व ( ४ ) मोक्षकांड. पांचवे कांडांत परशिष्ट म्हणून दिलें आहे. त्यांत ( १ ) पूजार्ह देवता; ( २ ) श्राद्ध; ( ३ ) व्रतपालनाचे दिवस; व ( ४ ) प्रायश्चित्त असे भाग आहेत. त्यानें दोन टीका लिहिल्या आहेत, असा लौकिक आहे. एक वाग्भटाचे ग्रंथावर आयुर्वेदरसायन नांवाची, व दुसरी बोपदेवाचे मुक्ताफल नांवाचे वैष्णव मतांचे ग्रंथावर. हा बोपदेव वऱ्हाडांतील सार्थ नांवाचे वर्दानदीवर एक गांव आहे तेथील राहणारा होता. त्यानें मुग्धबोध नांवाचा व्याकरण ग्रंथ लिहिला आहे व हरिलीला नांवाचें भागवतसार लिहिलें आहे. त्याचा धनेश नांवाचा गुरु होता व त्याचा बाप केशव नांवाचा वैद्य होता. हेमाडपंती मंदिरें प्रसिद्धच आहेत. लंकेहून त्यानें मोडी लिपी आणल्याची गोष्टही महाराष्ट्रांत सर्वश्रुत आहे. या रामचंद्राचेच वेळेस ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी झाली ( इ० स० १२९० ).

हा रामचंद्र दक्षिणेंतील अखेरचा स्वतंत्र हिंदू राजा होय. अल्लाउद्दिन खिलजी इ० स० १२९४ त आठ हजार सैन्यानिशीं दक्षिणेंत आला व एकाएकीं थेट देवगिरीवर येऊन थडकला.

रामचंद्राची कांहींच तयारी नव्हती सबब त्यानें तहाचें बोलणें लावलें. अल्लाउद्दिननेंही तें कबूल केलें. परंतु रामचंद्राचा मुलगा शंकर हा कांहीं सैन्य एकत्र करून अल्लाउद्दिनावर चाल करून आला. अल्लाउद्दिन त्याला सामना देण्यास गेला. शंकरचे सैन्य जास्त होतें व त्याला जय मिळण्याचा संभव होता. परंतु अल्लाउद्दिननें गडाजवळील सैन्यापैकीं कांहीं सैन्य आपल्या मदतीस बोलाविलें. शंकराला वाटलें कीं, अल्लाउद्दिनचें मोठें सैन्य दिल्लीकडून येण्याचा त्यानें जो बोभाटा ऐकला होता तेंच हें सैन्य असावें. यामुळें हिंदु सैन्य घाबरून गेलें व सैरावैरा पळूं लागलें व शंकराचा पूर्ण पराभव झाला. तेव्हां अल्लाउद्दिननें आपल्या मागण्या वाढविल्या व शेवटीं रामचंद्रानें त्याला सहाशें मण मोतीं, दोन मण रत्नें, एक हजार मण चांदी, चार हजार रेशमी कपडे व दुसऱ्या मौल्यवान जिनसा दिल्या व दरसाल दिल्लीस खंडणी पाठविण्याचें कबूल केलें, तेव्हां अल्लाउद्दिन परत फिरला. ही खंडणी न आल्यामुळें अल्लाउद्दिनानें तीस हजार सैन्य बरोबर देऊन मलिककाफरला देवगिरीवर पाठविलें. त्यानें रामचंद्राचा पराभव करून त्यास दिल्लीस आणलें. तेथें त्यास सहा महिने ठेऊन सोडून दिलें.

रामचंद्रानंतर त्याचा मुलगा शंकर गादीवर बसला. तो खंडणी देईना तेव्हां त्याजवर स्वारी करून मलिककाफरनें त्यास ठार मारलें व आपली देवगिरी येथें कायमची वस्ती केली.

अल्लाउद्दिनचे मरणानंतर रामचंद्राचा जांवई हरपाळ यानें बंड केलें. परंतु अल्लाउदिनचा मुलगा मुबारिक यानें त्यास कैद केलें, व त्यास जिवंत जाळलें. याप्रमाणें दक्षिणेंतील हिंदु राज्यांचा शेवट झाला. ( इ० स० १३१८ ).

---

## देवगिरीचे नंतरचे यादवांची वंशावळ.




---

## कोल्हापुरचे शिलाहार.

शंखचूड नांवाचे सर्पास गरूड भक्षण करणार होता. तेव्हां विद्याधरांचा राजा जीमूतकेतु यानें गरुडाची प्रार्थना केली कीं, शंखचूडाचा प्राण वांचवून त्याचे ऐवजीं माझें भक्षण कर. त्यावरून गरुडानें शंखचूडास सोडून दिलें. अशी कथा नागानंद नाटकांत

आहे. या जीमूतकेतूचा मुलगा जीमूतवाहन नांवाचा होता. त्या जीमूतवाहनापासून शिलार ऊर्फ शिलाहार वंश उत्पन्न झाला अशी दंतकथा आहे. या वंशाच्या तीन शाखा झाल्या. या सर्व शाखांचे राजास तगरपुरवराधीश्वर असें विरुद होतें. हें तगर नगर पूर्वी फार प्रसिद्ध होतें. परंतु तें कोठें होतें हें अद्यापि खात्रीनें निश्चित झालेलें नाहीं.

या तीन शाखांपैकीं एक शाखा उत्तर कोंकणांत होती. दुसरी दक्षिण कोंकणांत होती. तिसरी शाखा कोल्हापुर, मिरज व कऱ्हाड या भागावर राज्य करीत होती. पुढें दक्षिण कोंकणही त्यांचे सत्तेखालीं आलें. या शाखेंतील पहिला राजा जतिग नांवाचा होता; व त्या शाखेची वंशावळ येणेंप्रमाणें आहे:—



यांपैकीं गोंक हा बेळगांव जिल्हांतील गोकळहाटकुंडी व मैरिंज ( मिरज ) या भागावर राज्य करीत होता. त्याच्या तीन बंधूं- पैकीं गूवल हा त्याचे मागाहून गादीवर बसला. गूवलानंतर गोंकचा मुलगा मारसिंह हा राज्यारूढ झाला. त्यानें पुष्कळ मंदिरें बांधलीं. त्याची राजधानी खिलिजिळी नांवाचे किल्ल्यांत होती. हें पन्हाळ्याचें तेव्हांचें नांव होतें.

मारसिंहाचें मुलांपैकीं गण्डरादित्य हा विशेष प्रसिद्ध होता. तो मिरिंज भागावर व कोंकणावर राज्य करीत होता. यावरून कोल्हापुरचे शिलाहारांनीं कोंकणप्रांत १०३२ वे वर्षापूर्वीं जिंकला असावा. गंण्डरादित्यानें प्रयाग नांवाचे गांवीं एक लक्ष ब्राह्मण- भोजन घातलें. हें प्रयाग गांव कोल्हापुराजवळ होतें. त्यानें आंजरें येथें एक जैन मंदिर बांधलें; मिरज प्रांतांतील हरकुडी गांवीं गण्ड- समुद्र नांवाचा एक मोठा तलाव बांधल्या व त्याचे कांठीं शिव, व बुद्ध, व अऱ्हत ( जिन ) यांच्या मूर्ति स्थापिल्या व त्या प्रत्येक देवाकरितां जमिनी दिल्या. तो फार उदार व धार्मिक होता. तो प्रथम तिरवाड येथें व नंतर बलवाट नांवाचे गांवीं रहात होता. या गांवाचें सांप्रतचें नांव बलवडें असें आहे.

गण्डरादित्याचा मुलगा विजयार्क यानें बिज्जन कलचूरी यास साह्य केलें व त्या योगानें त्यास स्वतंत्र सत्ता मिळाली ( इ० स० ११९७ ).

विजयार्कानंतर दुसरा भोज हा पन्हाळ्याचा महामंडलेश्वर झाला. त्यानें त्याचा मुलगा गण्डरादित्य याचे विनंतीवरून ब्राह्म- णांचे अन्नछत्राकरतां कोंकणांतील खारेपाटणाजवळील कशेळी हा गांव इनाम दिला. हिंदु व जैन मंदिरास त्यानें जमिनी दिल्या. ज्या ब्राह्मणांस त्यानें दानें दिलीं त्यांत दोघांस कऱ्हाटक असें म्हटलें आहे. यावरून तेव्हां ब्राह्मणांतील कऱ्हाडे हा वर्ग पूर्णपणें स्थापन

झाला होता असें दिसतें. दुसरे दोन ब्राह्मणांचीं उपनांवें घैसास अशीं आहेत. या राजाचे कारकीर्दींत सोमदेव नांवाचे जैन पंडितानें पूज्यपादाचे व्याकरणावर शब्दार्णवचंद्रिका नांवाची टीका लिहिली आहे. कोल्हापुरचे राजे बहुतेक स्वतंत्र होते. परंतु त्यांना आपले मांडलिक करण्याचे उद्देशानें विज्जनानें आपले वधापूर्वीं भोजावर स्वारी केली. देवगिरीस यादवांची सत्ता कायम झाल्यावर भोजानें पूर्णपणें स्वतंत्र होण्याचा यत्न केला. परंतु सिंघणानें त्याचा पूर्ण पराभव केला व त्याचें राज्य आपल्या राज्यांत सामील केलें. ही कोल्हापुरची शाखा इ०स० ९५९ त स्थापन झाली असावी. त्या वेळेस तिसरा कृष्ण हा राष्ट्रकूट राजा होता.

या शिलाहारांची भक्ति पुराण व वेद यांतील देवतांवर विशेष होती. त्यांच्या बिरुदांपैकीं श्रीमन्महालक्ष्मीलब्धवरप्रसाद हें एक होतें. यावरून महालक्ष्मी हें त्यांचें कुलदैवत होतें असें दिसतें. तथापि ते ब्राह्मण, जैन व बौद्ध या सर्व धर्मांचा परामर्ष घेत होते, हें त्यांच्या वर दिलेल्या वर्णनावरून दिसून येईल.

हल्लीं शेलार उपनांवाचीं पुष्कळ मराठी कुटुंबें आहेत. पुण्याजवळील चिंचवड क्षेत्रापुढील शेलारवाडी नांवाचें आगगाडीचें जें स्टेशन आहे, तें कदाचित् प्राचीन तगर राजांचे वंशजाचे नांवावरून पडलें असावें.

## महत्त्वाच्या गोष्टींचीं अजमासानें सालें.

खि० पू०

६०२—शैशुनाग वंशाच्या राज्याची स्थापना.

५३०—बिंबसाराचें राज्यारोहण.

५९९—५२७—जैनधर्माचा संस्थापक वर्धमान महावीर.

५६०—४८७—गौतमबुद्ध बौद्ध धर्माचा संस्थापक.

६०२—अजातशत्रूचें राज्यारोहण; पाटलिपुत्राला दुर्ग बांधला.

४७९—४१८—दर्शक, उदय, नंदिवर्धन व महानंदी राजे; पाटलिपुत्रसन्निध कुसुमपुर नगराची स्थापना.

३७२—नंद वंश.

३५०—वैय्याकरण पाणिनी+

३२७—अलकचंद्र ऊर्फ अलेक्झांडर ऊर्फ शिकंदर याची स्वारी.

३२२—चंद्रगुप्त मौर्याचें राज्यारोहण.

३०५—३०३—सेल्यूकसची हिंदुस्थनावर स्वारी. चंद्रगुप्ता मौर्याकडून त्याचा पराभव.सेल्यूकसनें चंद्रगुप्तास हिंदुकुशपर्यंतचा पर्वताचा प्रांत दिला.

३०२—चंद्रगुप्ताचे दरबारांत मेगॅस्थिनीजची नेमणूक.

३००—चाणक्याचा अर्थशास्त्रावर ग्रंथ?

२९८—चंद्रगुप्ताचा मृत्यु किंवा राज्यत्याग;बिंदुसाराचें राज्यारोहण.

२७३—अशोकाचें राज्यारोहण.

२६९—अशोकाचा राज्याभिषेक.

२६१—कलिंग प्रांतावर अशोकाची स्वारी.

२५९—अशोकानें शिकार बंद केली.

२५७—अशोकाच्या राजशासनांच्या प्रसिद्धीचा प्रारंभ.

२४९—अशोकाची तीर्थयात्रा; लुंबिनी बागेंतील स्तंभ; ललित पाटणाची स्थापना; त्याची मुलगी चारुमती बुद्धोपासक झाली.

२४०—पाटलिपुत्र येथें तिसरी बौद्ध परिषद् ?

२३२—अशोकाचा मृत्यु.

---

+ रंगस्वामी आयंगार यांचा हिंदुस्थानचा इतिहास. त्या इतिहासांत पाणिनीचा काळ इ०स० पूर्वी ३५० दिला आहे. परंतु प्रो० का० बा० पाठक वगैरेंनीं पाणिनी खि० पू० निदान ६०० पासून ८०० चे सुमारास झाला असावा असें निश्चित केलें आहे.

२२४—१९१ संगत, सालिशूक, सोमशर्मा; शतधन्वा, बृहद्रथ इत्यादि मौर्य राजे.

२००—मनु संहितेचें सांप्रतचें स्वरूप. ( डॉ० बुल्हर )[१]

१८९—पुष्पमित्र शुंग हा मौर्य यास मारून आपण गादीवर बसला.

१७०—यूएची लोक चिनांतून हांकून दिले. १

१६८—कलिंग देशाचा खारवेल नांवाचा जैन राजा.

१६९—मेन्यांडर.

१६०—शक लोकांना यूएची लोक मध्य एशियांतून दाक्षिणेकडून हाकून लावतात.

१४०—१२९—शक लोक सीस्तान प्रांतांत येतात. तक्षशिला व मथुरेचे क्षत्रप. १

१४०—पतंजलि.

७२—कण्व वंश.

९८—९७—मालव अथवा विक्रमशक.

२७—कण्व वंशाची समाप्ति.

खि० नं०

१९—कुशान कद्फिसीज.

२१—६०—गोंडेफेरीज.

४९—दुसरा कद्फिसीज.

४९—७०—इंडो–पार्थियन अमलाचा कद्फिसीजनें अंत केला.

७८—शक ऊर्फ शालिवाहन शक; दुसरा कद्फिसीज याचा मृत्यु. कनिष्काचें राज्यारोहण.

८९—दिगंबर जैनांचा उत्कर्ष.

---

१ रंगस्वामी आयंगर यांचा हिंदुस्थानचा इतिहास.

१००—रोमचा बादशहा ट्रेजन याजकडे कनिष्कानें वकील पाठविला. बौद्ध परिषद्.
१२३—कनिष्काचा मृत्यु. हविष्क कुशान.
१४०—वसुदेव कुशान.
१७८—वसुदेव कुशानाचा मृत्यु.
१७८—२२६—कुशान वंशांतील शेवटचे राजे.
१५०—रुद्रदामा क्षत्रप.
३२०—चंद्रगुप्ताचें राज्यारोहण.
३३०—समुद्रगुप्ताचें राज्यारोहण;अमरकोशाचा कर्ता अमरसिंह.
३७५—याज्ञवल्क्य. द्वितीय चंद्रगुप्ताचें राज्यारोहण.
३००—४००—बौद्धधर्माचा ऱ्हास; ब्राह्मणांचा उत्कर्ष; धर्मशास्त्र, ज्योतिष, न्याय इ० विषयावर ब्राह्मणांचे ग्रंथ.
४०५—४११फा–हि–एनचा प्रवास.
४१३—कुमारगुप्ताचें राज्यारोहण.
४५५—स्कंदगुप्त. हूण लोकांशीं पहिली लढाई.
४७०—४८०—हूण लोकांशीं दुसरी लढाई.
४७६—आर्यभट्टाचा जन्म; कालिदास.
४९०—५१०—तोरमाण.
५१०—५४०—मिहिरकुल.
५२८—बालादित्य व यशोधर्म यांजकडून मिहिरकुलाचा पराभव.
५७८—वातापीचे चालुक्य राजे.
५८०—वराहमिहिर सुबन्धु.
५९५—६१५—मोलापो आणि वल्लभीचा शिलादित्य राजा.
६००—कादंबरीचा कर्ता बाण.
६०५—स्थानेश्वरचा म्हणजे ठाणेश्वरचा राजा राज्यवर्धन.
६०६—कनोजचा हर्षवर्धन.

६०६—६१२—हर्षाची उत्तर हिंदुस्थानावर स्वारी.
६०८—चालुक्यवंशीय दुसरा पुलकेशी याचें राज्यारोहण.
६१२—हर्षाचें राज्यारोहण व त्याचा शक.
६२०—दुसरा पुलकेशी याजकडून हर्षाचा पराभव.
६२२—मुसलमानांचा हिजरी सन.
६२९—चिनी हि-उ-एनत्संग यांचे प्रवासाचा आरंभ.
६३५—हर्षाची वल्लभीवर स्वारी.
६४१—हर्षानें चीनचे बादशाहाकडे वकील पाठविला.
६४२—दुसऱ्या पुलकेशीचा मृत्यु.
६४३—हर्षाची गंजमवर स्वारी; हर्षाच्या कनोज व प्रयाग येथील बौद्ध परिषदा.
६४७—हर्षाचा मृत्यु.
६६४—हि-उ-एन त्संग याचा मृत्यु.
६७१—६९५—चिनी प्रवासी इतसिंग याचा हिंदुस्थानांत प्रवास.
७००—मीमांसक कुमारिल भट्ट*
७३०—काश्मीरचे ललितादित्य राजानें भवभूति कवीस आश्रय दिला.
७११—७५०—सिंध प्रांतांत अरब लोकांचा अम्मल*
७६०—वेरुळ येथील कैलास नांवाचें कोरीव लेणें; अरबांची वल्लभीवर स्वारी*
८००—श्रीशंकराचार्य, माघ आणि विशाखदत्त कवि.

* रंगस्वामी आयंगार यांचा हिंदुस्थानचा इतिहास.

९१५—राष्ट्रकूटवंशीय तिसरा कृष्ण यानें दक्षिण हिंदुस्थान जिंकला
९८५—१०१७—चोल राजा राजराज.
१०००—तंजावरचें प्रसिद्ध मंदीर.
१०१०—१०५०—प्रसिद्ध परमारवंशीय भोजराजा.

१०२२—मुसलमानांनीं लाहोर शहर घेतलें.
१०३२—विमलशा नांवाचे सावकारानें अबूचे पहाडावरील जैन मंदिरें बांधलीं.
१०६०—चंडेलावंशीय कीर्तिवर्मा राजा; बंगाल्यांतील सेनराजवंशाची स्थापना.*
१०७०—१११८—चोल राजा कुलोत्तुंग; तामिल वाङ्मयाचा उत्कर्ष.*
१०७६—११२६—सहावा विक्रमादित्य[१].
१०८६—दक्षिण हिंदुस्थानांतील शेतांची पहाणी.*
१०९०—मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर.*
११००—रामानुजाचार्य; जयदेव कवि.*
१११०—११४१—होयसल राजा विष्णुवर्धन.
१११८—श्रीमध्वाचार्यांचा जन्म.*
११४९.—कल्हणानें राजतरंगिणी ग्रंथ लिहिला.*
११७०—११९३—कनोजचा राजा जयचंद,व पृथ्वीराज चव्हाण.*
१२००—१३००—चोल व चालुक्य वंशांचा ऱ्हास; देवगिरीचे यादव, वारंगळचे काकतीय राजे.*
१२६८—व्यंकटनाथ ऊर्फ वेदांतदेशिक, दक्षिण हिंदुस्थानांतील प्रसिद्ध वैष्णव ग्रंथकार.*
१२७०—महाराष्ट्रांतील साधू ज्ञानेश्वर, नामदेव.*
१३०९—१३१०—मलिक काफुरची दक्षिणेवरील आणि दक्षिण हिंदुस्थानावरील स्वारी.
१३३६—विजयानगरची स्थापना.*

---

१ डॉ. सर रामकृष्ण भांडारकरांचे मताप्रमाणें दुसरा चालुक्य वंश वेगळा धरला तर हा विक्रमादित्य दुसरा धरला पाहिजे.

* रंगस्वामी आयंगर यांचा हिंदुस्थानचा इतिहास.

( मि. विन्सेट स्मिथ यांचे ग्रंथावरून. )

## शैशुनाग व नंद वंशाची शकावली ( अजमासानें ).

| अ. श. | राजांचें नांव. | राज्यारोहणाचें साल | विशेष |
|---|---|---|---|
| १ | शिशुनाग | इ.स.पूर्वीं ०२ | कांहीं माहीत नाहीं. |
| २ | शाकवर्ण | ,, | कांहीं माहीत नाहीं. |
| ३ | क्षेत्रधर्म | ,, | कांहीं माहीत नाहीं. |
| ४ | क्षेमजित ऊर्फ क्षत्रौज | | |
| ५ | बिंबिसार | ५३० | नवें राजगृह स्थापन केलें महावीर व गौतमबुद्ध यांचा समकालीन. |
| ६ | अजातशत्रु | ५०२ | बुद्धाचा मृत्यु ४८७; पाटलीपुत्राचा दुर्ग बांधिला. |
| ७ | दर्शक | ४७५ | |
| ८ | उदासीन ऊर्फ उदय | ४५१ | पाटली पुत्राजवळ कुसुमपूर नगर वसविलें. |
| ९ | नंदिवर्धन | ४१८ | कांहीं माहीत नाहीं. |
| १० | महानंदी | ४१८ | कांहीं माहीत नाहीं. |
| | नंदवंश | | |
| ११ | महापद्म इ० | ३७२ | |
| १२ | ९; २ पिढ्या | ३७२ | |
| | मौर्य | | |
| १३ | चंद्रगुप्त | ३२२ | |

**आंध्र राजांची यादी.**

पहिले १८ राजेः—

१ सिशूक ऊर्फ सिमूक, २ कृष्ण, ३ शातकर्णी, ४ पूर्णोत्संग. ५ स्कंदस्तंभी, ६ शातकर्णी, ७ लंबोदर, ८ आपीलक, ९ मेघस्वाती, १० स्वाती, ११ स्कंदस्वाती, १२ मृगेंद्रस्वातिकर्ण, १३ कुंतलस्वातिकर्ण, १४ स्वातिकर्ण, १५ पुलोमावी, १६ अरिष्टकर्ण, १७ हाल, १८ मंतलक,

| | इ. स. |
|---|---|
| १९ पुरिकसेन | ५९ |
| २० सुंदरशातकर्णी | ८० |
| २१ चकोरशातकर्णी | ८१ |
| २२ शिवस्वाति | ८१ |
| २३ गौतमीपुत्र | १०९ |
| २४ पुलोमावी | १३५ |
| २५ शिवश्रीपुलोमावी | १६३ |
| २६ शिवस्कंधशातकर्णी | १७० |
| २७ यज्ञश्रीशातकर्णी | १७३ |
| २८ विजय | २०२ |
| २९ चंडश्रीशातकर्णी | २०८ |
| ३० पुलोमावी | २१८ |

२२५ त हा वंश नष्ट झाला

| महाराष्ट्रांतील क्षत्रप | इ. स. |
|---|---|
| भूमक | ७० किंवा ५० |
| नहपान | ९० |
| ऋषभदत्त ऊर्फ उषवदात | |

**उज्जनीचे क्षत्रप व महाक्षत्रप.**

| | इ. स. |
|---|---|
| चष्टन. | ८० |
| \| | |
| जयदामन | ११० |
| \| | |

( पान २०२ पहा.

रुद्रदामन ११८

|

दामजदश्री १५५

|

जीवदामन १७८

|

रुद्रसिंह १८०

|

रुद्रसेन १९९

|

संगदामन २२२

|

दामसेन २२३

## गुप्त कारकीर्दीची शकावली.

| वर्ष इ. स. | |
|---|---|
| ३२० | पहिला चंद्रगुप्त स्वतंत्र राज्य स्थापन करतो. |
| ३३० | समुद्र गुप्ताचें राज्यारोहण. |
| ३५१ | अश्वमेध यज्ञ. |
| ३७५ | दुसऱ्या चंद्रगुप्ताचें राज्यारोहण. |
| ४१३ | पहिल्या कुमारगुप्ताचें राज्यारोहण. |
| ४५५ | स्कंदगुप्ताचें राज्यारोहण. |
| ४८० | पूरगुप्त. |
| ४८५ | नरसिंहगुप्त बालादित्य. |
| ४९०–५१० | तोरमाण. |
| ४९०–७७० | वल्लभीवंश |
| ५१०–५४० | मिहिर–गुल. |
| ५३० | दुसरा कुमारगुप्त. |

६३९—७२० मगधचा नंतरचा गुप्त वंश.
६९९—६?९ वल्लभीचा शिलादित्य.

## मोर्य वंश.

| वर्ष ( खि. पू ) | विशेष गोष्ट. |
|---|---|
| ३२६ किंवा ३२५ | चंद्रगुप्ताची व शिकंदराची भेट. |
| ३२५ सप्टें. किंवा अक्टोबर | शिकंदर हिंदुस्तानांतून गेला. |
| ३२४ फेब्रुवारी | क्षत्रप फिलिपोस याचे वधाची बातमी शिकंदरास लागली;युदामोस व तक्षिलेचा राजा अंभी यांची शिकंदरानें हिंदुस्तानचे आपलें राज्यावर नेमणूक केली. |
| ३२३ जून | बाबिलोन येथें शिकंदराचा मृत्यु. |
| ३२३—३२२ | चंद्रगुप्त हिंदुस्तानचा सम्राट् होतो. |
| ३०५—३०४ | हिंदुस्तानावर सेल्यूकसची स्वारी. |
| ३०३ | चंद्रगुप्तानें सेल्यूकसचा पराभव केला. |
| ३०२ | मेग्यास्थिनीजची पाटलीपुत्रास वकील म्हणून नेमणूक. |
| २९८ | बिंदुसार अमित्रघात सम्राट् होतो. |
| २७३ | अशोकवर्धनाचें राज्यारोहण. |
| २६९ | अशोकाचा राज्याभिषेक |
| २६१ | अशोकानें कलिंग प्रांत घेतला. |
| २५९ | अशोकानें शिकार बंद केली; उपदेशक देशोदेशीं पाठविले. |
| २५७ | १-३-४ राजाज्ञा पाषाणावर खोदल्या;बराबर येथील गुहा आजिविक नांवाचे लोकांस दिल्या. |
| २५६ | १४ राजाज्ञा पाषाणावर प्रसिद्ध केल्या. अशोक ' धर्म महामात्रा 'नांवाचे धर्माधिकारी नेमतो. |
| २४९ | अशोकाची तीर्थयात्रा; लुंबिनी उद्यानांतील स्तंभ |

स्थापन केले; नेपाळांत गेला; ललितपाटण नगराची स्थापना; त्याची मुलगी चारुमती योगिनी होते.

२४३ सहावें स्तंभशासन पत्रक.

२३२ अशोकाचा मृत्यु.

१८५ पुष्यमित्र शुंग बृहद्रथ मौर्यांचा वध करतो; मौर्या साम्राज्याची समाप्ति.

---

## प्राचीन लेखांत आलेले देश, पर्वत, नद्या, नगरें, गांवें, इत्यादिकांपैकीं कांहीं कांहीं मुख्यमुख्यांची माहिती.[1]

१ **अचिरावती**—राप्ती नदी—शक लोकांच्या प्रांतांच्या पश्चिम आणि दक्षिण सीमेवरील नदी.

**अपरांत**—उत्तर कोंकण; याची राजधानी शूर्पारक (ठाणे जिल्ह्यांत वसई जवळ सोपारें हें गांव).

**अमरावती**—मद्रास इलाख्यांतील गुंतुर जिल्ह्यांतील कृष्णातीरावरील एक गांव. त्याचे जवळ आंध्र देशाची धान्यकटक नांवाची राजधानी होती. बुद्धाचा एक प्रसिद्ध स्तूप अमरावतीस होता. त्यावरील कांहीं संगमरवरी दगडाचीं कामें ब्रिटिश व मद्रास पदार्थसंगृहालयांत ठेविलीं आहेत.

**अयोध्या**—घोग्रा ( शरयू ) नदीचे तीरावर, फैजाबद जिल्ह्यांत, **कोसल** राज्याची राजधानी; **दशरथ** राजाचें स्थान.

---

१ या भागांतील माहिती मुख्यत्वें करून प्रो० ऱ्याप्सन यांचें Ancient India या पुस्तकाचे व डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांचें History of the DeKKan ग्रंथाचे आधारानें दिली आहे. ज्यास्त माहितीसाठीं कनिंघ्यामचें Ancient Geography of India व रा. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचें भारतवर्षीय भूवर्णन पहावें.

बौद्ध ग्रंथांत साकेत ही कोसल राज्याची राजधानी असल्याचें लिहिलें आहे. अयोध्या आणि साकेत हीं एकच असावींत.

**अवंती**—पश्चिम मालव ऊर्फ माळवा ह्या देशाची राजधानी; हिलाच उज्जयिनी अथवा उज्जनी असें म्हणतात. ही प्रसिद्ध सप्तपुऱ्यांपैकीं एक होय.

**असिक्नी**—वेदांतील काळी नदी. तिला पुढें चंद्रभागा म्हणूं लागले. शिकंदराच्या वेळचें नांव अकिसिनी ( चिनाब ); चंद्रभागा नांवाचे ग्रीक रूप सँड्रोफेगस ( शिकंदराचे भक्षण करणारी ) असें असल्यामुळें शिकंदरानें तें बदलून प्राचीन नांव असिक्नी असें ठेवलें. त्याचे ग्रीक रूप असेसिनीज असें होतें, व त्याचा अर्थ आरोग्यदायक असा होता.

**अंग**—उत्तर बंगाल्यांतील मोंगीर व भागलपूर प्रांत; राजधानी चंपा ( भागलपुरा नजीक )

**आकार**—पूर्व मालव ऊर्फ मालवा देश.

**आर्यावर्त**—हिमालय आणि विंध्य पर्वत यांच्या मधील पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंतचा देश.

**आंध्र**—कृष्णा व गोदावरी ह्या नद्यांचे दरम्यान हे लोक रहात होते. ऐतरेय ब्राह्मणांत त्यांचें नांव आढळतें. अशोक राजाचे ते मांडलिक होते. त्या राजाच्या मरणानंतर त्यांची सत्ता वाढली; ती पश्चिम दिशेकडे नाशिकापर्यंत वाढली. त्यांच्यांत शातवाहन वंश प्रसिद्ध होता. त्यांचे राजास शातकर्णी म्हणत असत. त्या वंशाचें राज्य खि०पू०२२० वर्षांपासून तों इ० स० २४० वर्षांपावेतों होतें. एवढ्या काळांत त्यांचे तीस राजे झाले. त्यांची एक शाखा आंध्रभृत्य म्हणून झाली. तेव्हांपासून आंध्र सत्ता कमी होऊं लागली. आंध्रभृत्यांचे पश्चिमेकडील राज्य अभीर लोकांकडे

गेलें, व दक्षिण आणि पश्चिम यांच्या दरम्यानचें राज्य कदंब लोकांकडे गेलें. आंध्रांचीं मुख्य शहरें अमरावती, प्रतिष्ठान, व वैजयंति हीं होतीं.

**इरावती**—परुष्णी ( ऋग्वेद ); हैड्राओटीज ( ग्रीक ), इरावती ( संस्कृत ) सांप्रतचें नांव रावी.

**उज्जनी**--क्षिप्रा नदीचे कांठीं; ही नदी चंबळा नदीला मिळते; अवंती ऊर्फ पश्चिम माळव्याची राजधानी; मौर्य व गुप्त साम्राज्याचे प्रतिनिधींची राजधानी; शूर्पारक ( सोपारा ). भृगुकच्छ ( भडोच ) व श्रावस्ती यांपासून येणारे मोठे रहदारीचे रस्ते या ठिकाणीं मिळत असल्याकारणानें हें मोठें व्यापाराचें शहर होतें. विद्या व शास्त्र यांचेंही पीठ होतें; हिंदु ज्योतिषी रेखांश येथून मोजीत असत.

**कच्छ**--तीर किंवा किनारा; मूळ संस्कृत शब्द कक्ष ( सरहद्द ).

**कपिलवस्तू**—शाक्यांची राजधानी; बुद्धाचे जन्मस्थान; लुंबिनी वनाजवळ सन १८९६ वर्षांत नेपाळच्या तराई प्रांतांत रुम्मिनदेई नांवाचे गांवीं अशोकानें स्थापिलेला एक स्तंभ सांपडला. त्यावरील प्रत्येक अक्षर अद्यापपावेतों पूर्णपणें स्पष्ट सुवाच्य आहे. त्यावरून कपिलवस्तू व लुंबिनी वनाची जागा निश्चित होते.

**कलिंग**--महानदी व गोदावरी ह्या नद्यांचे दरम्यानचा पूर्वेकडील किनाऱ्यावरील प्रांत. हा अशोकानें घेतला होता. पुढें मौर्य साम्राज्य क्षीण झाल्यानंतर तो प्रांत स्वतंत्र झाला असें कलिंग देशाचा राजा खारवेल याचे कटकजवळील हाथिगुंफा गुहेंतील लेखावरून समजतें. खारवेल हा इ. स. पू. १५० वे वर्षीं राज्य करीत होता.

**कऱ्हाटक**—सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड.

**क्रिवी**—पांचालांचे ऋग्वेदांतील नांव.

**कृष्णा**—प्रसिद्ध नदी.

**कांपिल्य**—दक्षिण पांचाळ देशाची राजधानी; फरकाबाद जिल्ह्यांतील कांपिलगांवांत प्राचीन राजधानीच्या खुणा आहेत; द्रुपद राजाची राजधानी.

**कामरुप**—आसाम.

**कावेरी**—दक्षिण हिंदुस्थानांतील प्रसिद्ध नदी.

**काशी**—ह्या राज्यासंबंधानें कोसल व विदेह राजांचे दरम्यान नेहमीं लढाया होत असत.

**कुभा**—ऋग्वेदांतील काबूल नदीचें नांव.

**कुरु**—ब्राह्मण ग्रंथांचे वेळचे प्रसिद्ध लोक; कुरुक्षेत्र म्हणजे पतिआला संस्थान व दिल्ली प्रांताचा पूर्वेकडील निमा भाग. ब्रह्मावर्त प्रांत याचे वायव्य सरहद्दीवर होता; पूर्वेस यमुना नदी होती. त्याची प्राचीन राजधानी हस्तिनापूर होती; दुआबचा उत्तर भाग त्यांचेकडे होता. पूर्वेस उत्तर पाञ्चाळ व दक्षिणेस दक्षिण पाञ्चाळ लोक होते. त्यांची नंतरची राजधानी इंद्रप्रस्थ होती. इंद्रप्रस्थ पांडवांनीं यमुनेच्या कांठीं स्थापन केलें.

**केरळ**—मलबार, कोचीन व त्रावणकोर प्रांत. केरळपुत्र हे त्या देशाच्या राजाचें नांव असल्याचें अशोकाच्या लेखावरून दिसतें; यासच चेर म्हणतात.

**कोंगूदेश**—मद्रास इलाख्यांतील सालेम व कोइमतूर जिल्हे.

**कोसल**—पांचालाचे पूर्वेचा व विदेहाचे पश्चिमेचा देश; सांप्रतचा अयोध्याप्रांत; यांत अयोध्या ऊर्फ साकेत व श्रावस्ती हीं मुख्य शहरें होतीं.

**कौशांबी**—वत्स प्रांताची राजधानी; अलाहाबाद जिल्ह्यांतील कोसम इनाम व कोसम खिराज नांवांचीं गांवें.

**क्रुमु**—सिंधुनदीस पश्चिमेकडून मिळणारी कुरमनदी.

**खिळिजिळि**—कोल्हापुराजवळील पन्हाळा किल्ला.

**गंगा**—प्रसिद्ध नदी; ऋग्वेदाच्या शेवटच्या शेवटच्या मंत्रांत हें आढळतें. यावरून आर्य लोक, ऋग्वेदाचे बहुतेक मंत्र झाले तेव्हां गंगेपावेतों आले नव्हते असें दिसतें.

**गांधार**—पेशावर व रावळपिंडी जिल्हे मिळून झालेला प्रांत; काबूलही त्यांत येतें. लोकांचेंही हें नांव आहे. तें ऋग्वेद व अथर्व वेदांत आहे, गांधार देश फार प्राचीन आहे. दोनशें वर्षें तो इराणचे ताब्यांत होता. इ. स. पू. ३३१ सालांत हा प्रांत शिकंदर बादशाहाचे ताब्यांत आला. प्रथम तो इराणचे राज्याचा संस्थापक सायरस ( इ. स. पू. ५५८–५३० ) यानें घेतला.

**गिरीनगर**—गिरनार ( जुनागड संस्थानांत ); या पर्वताचे पायथ्याशीं एक मोठी शिला आहे. ती बारा फूट उंच व पंचाहत्तर फूट घेराची आहे. तिजवर तीन वेगळ्या वेगळ्या वंशांच्या तीन राजांचे लेख आहेत. त्या राजांचीं नांवें:—( १ ) अशोक ( इ. स. पू. २५० ); ( २ ) रुद्रदामा, सुराष्ट्र व माळवा प्रांताचा महाक्षत्रप ( इ. स. १५० ); ( ३ ) स्कंदगुप्त ( इ. स. ४५५–४५६ व ४५७ चे तीन लेख ). अशोकाचा लेख ईशान्य दिशेस आहे; रुद्रदाम्याचा लेख शिखरावर आहे; स्कंधगुप्ताचे लेख पश्चिम दिशेस आहेत. अशोकाचे लेखांत योनराज ( ग्रीक राजा ) अँटिओकस याचे व चोल, पांड्य, सतियपुत्र, केरळपुत्र, तंबपम्मी ( सीलोन ) यांचीं नांवें आहेत व

त्या राजानें मनुष्य व पशु यांचेकरितां औषधालयें बांधल्याचें, झाडें लावल्याचें व विहिरी बांधल्याचें लिहिलें आहे.

**गिरिव्रज**—ऊर्फ राजगृह; मगध देशाची प्राचीन राजधानी;पाटणा जिल्ह्यांतील राजगिर गांवांत या राजधानीच्या पडझडीच्या खुणा आहेत.

**गोदावरी**—प्रसिद्ध नदी.

**गोमती**—सिंधु नदीस मिळणाऱ्या गुमल नदीचें ऋग्वेदांतील नांव.

**गोपकपट्टण**—गोवें ( पोर्तुगीज लोकांचें ).

**चंद्रभागा**—असिक्नी नदीचें नांव.

**चंद्रादित्यपुर**—नाशीक जिल्ह्यांतील चांदोर गांव.

**चंपा**—अंग देशाची राजधानी.

**चर्मण्वती**—चंबळा नदी; जी यमुनेला मिळते.

**चेदी**—ऋग्वेदांत या लोकांचें नांव आढळतें. पुढें ते मध्य प्रांताचे उत्तर भागांत राहत होते.

**चेर**—केरळ प्रांत.

**चोल**—दक्षिण हिंदुस्थानांतील तामिल लोक. चोलमंडल यावरून पुढें कारोमांडेल किनारा हें नांव पडलें. अशोकाचे शिलालेखांत त्यांचें नांव आहे. महाभारतांतही त्यांचें नांव आहे. या प्रांताचा व्यापार आलेक्झांड्रिया, युरोपखंड व रोम शहर ह्यांशीं होता. दक्षिण हिंदुस्थानांत जीं नाणीं सांपडलीं त्यांत क्लॉडिअस बादशाहानें ब्रिटन देश काबीज केला ( इ. स. ४१–९४ ) तेव्हां जीं नाणीं पाडलीं त्यांपैकीं नाणें सांपडलें. इंग्रजी शब्द पेप्पर ( मिरी ) हा तामिल पिप्पली ( ग्रीक पेपरी ) या शब्दापासून निघाला आहे. यावरूनही हा व्यापार चालू असल्याचें सिद्ध होतें.

**तक्षशिला**—ग्रीक नांव तक्षिला; रावळपिंडी जिल्ह्यांत शहाढेरी-

जवळ त्या शहराच्या पडझडीच्या खुणा आहेत. या ठिकाणीं प्राचीन प्रसिद्ध पाठशाळा होती. तेथें वेद व कला शिकवीत असत; हें शिकंदराचे वेळेस एक स्वतंत्र संस्थान होतें. कधीं कधीं गांधार देशाचा भाग असे.

**तापी**—प्रसिद्ध नदी.

**ताम्रपर्णी**—सीलोनमधील एक शहर; कधीं कधीं संबंध बेटालाही हें नांव लावतात. अशोकाचे लेखांत व पालिभाषेंत तंबपण्णी हें त्याचें रूप आहे. ग्रीक व लॅटिन ग्रंथांत ट्याप्रोबेन हें रूप आहे. ताम्रपर्णी म्हणून एक तिनेवल्ली जिल्ह्यांत नदी आहे.

**दाक्षिणापथ**—दक्षिण देश; डेक्कन.

**दृषद्वती**—सिरहिंद प्रांतांतील नदी; सांप्रतची चऊतुंग.

**धान्यकटक**—आंध्रदेशाच्या राजधान्यांपैकीं एक राजधानी. अमरावतीनजीक.

**द्वारसमुद्र**—म्हैसुरांतील हळेबीड गांव.

**नर्मदा**—प्रसिद्ध नदी.

**निषध**—विंध्याद्रीचे दक्षिणेस प्राचीन राज्य होतें. माळव्याचे दक्षिणेस व विदर्भाचे वायव्येस; नळ राजाचें राज्य.

**परुष्णि**—ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत आढळतें. अलीकडील संस्कृत ग्रंथांत हिला इरावती म्हणतात. ग्रीक हैड्रोआटीज्. सुदासाचे युद्धासंबंधानें ऋग्वेदांत तिचें नांव आढळतें. हल्लीं तिला रावी हें नांव आहे.

**परोपानिसस**—अथवा परोपामिसस; हिंदुकूशचें ग्रीक नांव. इ० स० ५१६ चे बेहिस्तून येथील दरायसचे लेखांत, गांधार लोकांचें नांव आहे; सुशिअन व बाबिलोनचे लेखांत परुपरेसन्न असें नांव आहे.

**पलइपटमई**—पाल ( महाडाजवळ ).

**पल्लव**—दक्षिण हिंदुस्थानांतील लोक; राजधानी कांची ऊर्फ कांचीपुरम् ; यास इंग्रज लोक कांजीवरम् असे म्हणतात.

**प्रतिष्ठान**—पैठण; गोदावरी नदीचे कांठीं; आंध्र राज्याच्या पश्चिम भागाची राजधानी.

**प्रयाग**—गंगा, यमुना व सरस्वती नद्यांचा प्रसिद्ध त्रिवेणी संगम; अक्षय वटाचें स्थान. मुसलमान ह्या स्थलास अलहाबाद म्हणतात.

**पाटलिपुत्र**—पाटणा; ह्याचें वर्णन मेगेस्थेनीजनें दिलें आहे.

**पेटेनिक**—पैठण.

**पांचाळ**—ऋग्वेदांतील कृवी लोक;नांवावरून पांच लोक मिळून एक लोकझाले असावेत असें दिसतें. यांत दक्षिण पांचाळ व उत्तर पांचाळ असे दोन देश होते;गंगेच्या पूर्वेस अयोध्येच्या वायव्येस असणारे ते उत्तर पांचाळ, यमुना व गंगा नदीचे दरम्यान व कुरु व शूरसेन यांचे पूर्वेस व नैर्ऋत्येस असणारे ते दक्षिण पांचाळ. उत्तर पांचाळांची राजधानी अहिच्छत्र. अद्याप बरेली जिल्ह्यांत रामनगरजवळ त्या नांवाची जागा आहे. दक्षिण पांचाळांची राजधानी कांपिल्य होती. फरकाबाद जिल्ह्यांत कांपील गांवाजवळ तें होतें.

**पांड्य**—मदुरा व तिनेवल्ली जिल्ह्यांत हे लोक राहात होते. अशोकाचे लेखांत व ग्रीक व लॅटिन ग्रंथांत त्यांचें नांव आहे.

**ब्रह्मर्षिदेश**—कुरु, मत्स्य, पांचाळ व शूरसेन लोकांचा प्रांत; ब्रह्मर्षिचा देश; गंगा व यमुना या नद्यांच्या दरम्यानचा प्रांत; पातिआला व दिल्ली भागाचा पूर्व भाग.

जवळ त्या शहराच्या पडझडींच्या खुणा आहेत. या ठिकाणीं प्राचीन प्रसिद्ध पाठशाळा होती. तेथें वेद व कला शिकवीत असत; हें शिकंदराचे वेळेस एक स्वतंत्र संस्थान होतें. कधीं कधीं गांधार देशाचा भाग असे.

**तापी**—प्रसिद्ध नदी.

**ताम्रपर्णी**—सीलोनमधील एक शहर; कधीं कधीं संबंध बेटालाही हें नांव लावतात. अशोकाचे लेखांत व पालिभाषेंत तंबपण्णी हें त्याचें रूप आहे. ग्रीक व लॅटिन ग्रंथांत त्याप्रोबेन हें रूप आहे. ताम्रपर्णी म्हणून एक तिनेवल्ली जिल्ह्यांत नदी आहे.

**दक्षिणापथ**—दक्षिण देश; डेक्कन.

**दृषद्वती**—सिरहिंद प्रांतांतील नदी; सांप्रतची चऊतुंग.

**धान्यकटक**—आंध्रदेशाच्या राजधान्यांपैकीं एक राजधानी. अमरावतीनजीक.

**द्वारसमुद्र**—म्हैसुरांतील हळेबीड गांव.

**नर्मदा**—प्रसिद्ध नदी.

**निषध**—विंध्याद्रीचे दक्षिणेस प्राचीन राज्य होतें. माळव्याचे दक्षिणेस व विदर्भाचे वायव्येस; नळ राजाचें राज्य.

**परुष्णि**—ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत आढळतें. अलीकडील संस्कृत ग्रंथांत हिला इरावती म्हणतात. ग्रीक हैड्रोआटीज्. सुदासाचे युद्धासंबंधानें ऋग्वेदांत तिचें नांव आढळतें. हल्लीं तिला रावी हें नांव आहे.

**परोपानिसस**—अथवा परोपमिसस; हिंदुकूशचें ग्रीक नांव. इ० स० ५१६ चे बेहिस्तून येथील दरायसचे लेखांत, गांधार लोकांचें नांव आहे; सुशिअन व बाबिलोनचे लेखांत परुपरैसन्न असें नांव आहे.

पलइपटमई—पाल ( महाडाजवळ ).

पल्लव—दक्षिण हिंदुस्थानांतील लोक; राजधानी कांची ऊर्फ कांचीपुरम् ; यास इंग्रज लोक कांजीवरम् असे म्हणतात.

प्रतिष्ठान—पैठण; गोदावरी नदीचे कांठीं; आंध्र राज्याच्या पश्चिम भागाची राजधानी.

प्रयाग—गंगा, यमुना व सरस्वती नद्यांचा प्रसिद्ध त्रिवेणी संगम; अक्षय वटाचें स्थान. मुसलमान ह्या स्थलास अलहाबाद म्हणतात.

पाटलिपुत्र—पाटणा; ह्याचें वर्णन मेगेस्थेनीजनें दिलें आहे.

पेटेनिक—पैठण.

पांचाळ—ऋग्वेदांतील क्रृवी लोक;नांवावरून पांच लोक मिळून एक लोकझाले असावेत असें दिसतें. यांत दक्षिण पांचाळ व उत्तर पांचाळ असे दोन देश होते;गंगेच्या पूर्वेस अयोध्येच्या वायव्येस असणारे ते उत्तर पांचाळ, यमुना व गंगा नदीचे दरम्यान व कुरु व शूरसेन यांचे पूर्वेस व नैर्ऋत्येस असणारे ते दक्षिण पांचाळ. उत्तर पांचाळांची राजधानी अहिच्छत्र. अद्याप बरेली जिल्ह्यांत रामनगरजवळ त्या नांवाची जागा आहे. दक्षिण पांचाळांची राजधानी कांपिल्य होती. फरकाबाद जिल्ह्यांत कांपील गांवाजवळ तें होतें.

पांडय—मदुरा व तिनेवल्ली जिल्ह्यांत हे लोक राहात होते. अशोकाचे लेखांत व ग्रीक व लॅटिन ग्रंथांत त्यांचें नांव आहे.

ब्रह्मर्षिदेश—कुरु, मत्स्य, पांचाळ व शूरसेन लोकांचा प्रांत; ब्रह्मर्षिंचा देश; गंगा व यमुना या नद्यांच्या दरम्यानचा प्रांत; पातिआला व दिल्ली भागाचा पूर्व भाग.

**ब्रह्मावर्त**—सरस्वती व दृषद्वती नद्यांचे दरम्यानचा प्रांत; हल्लींचा सिरहिंद प्रांत; कुरुक्षेत्राचा भाग.

दक्षिणेन सरस्वत्या दृषद्वत्युत्तरेण च ।
ये वसंति कुरुक्षेत्रे ते वसंति त्रिविष्टपम् ॥

**भृगुकच्छ**—भृगु राजाचा किनारा; ( किंवा भृगु ऋषींचें नजीकचें स्थान; ) भडोच; ग्रीक बरूगझ.

**मगध**—दक्षिणबहार; मौर्य वंशाचें राज्य, हा देश पुन्हां गुप्त कारकीर्दींत उदयास आला; पूर्वींची राजधानी राजगृह होती. नंतर पाटलिपुत्र झाली.

***मथुरा**—आग्रा भागांतील प्रसिद्ध नगर; यमुनेच्या कांठीं; शूरसेनांची राजधानी; इ० स० पू० दुसरे शतकांत वेगळे वेगळे राजांचे ताब्यांत होतें. इ०स० पू०१०० वे वर्षीं शके क्षत्रपांचे ताब्यांत गेलें. कुशनाचे कारकीर्दींत जैन धर्माचें महत्त्वाचें स्थान होतें.

**मध्यदेश**—आर्यावर्ताचा भाग; हिमालय व विंध्या पर्वताचे दरम्यानचा देश; त्याचे पूर्वेस प्रयाग व पश्चिमेस विनशन म्हणजे जेथें सरस्वती वालुकायम प्रदेशांत गुप्त होते, तें ठिकाण.

**महानदी**—प्रसिद्ध नदी; कलिंग राज्याची उत्तर सीमा.

**महाराष्ट्र**—अशोकाचे लेखांत त्यांना रथिक ( संस्कृत राष्ट्रिक ) असें म्हटलें आहे. पिटेनी ( पैठणचे लोक ) यांचे जोडीनें त्यांचा उल्लेख आहे.

**मंगलवेष्टक**—मंगळवेढें ( पंढरपुराजवळ ).

**मरू**—राजपुतान्यांतील थरचें मोठें वाळवंट.

---

* ' मधु ' राक्षसास ठार मारून शत्रुघ्नानें हें शहर वसविलें म्हणून मधुरा. ' द्विरूप कोशांत " मधुरा मथुरा समे " असा चरण आहे.

**मंदगोर**—मादापुर ( राजापुरचे खाडीवर ).

**मत्स्य** ऋग्वेदांत या लोकांचें नांव आढळतें. महाभारताचे वेळेस मत्स्य लोक कुरूंचे दक्षिणेस व शूरसेनाचे पश्चिमेस राहात असत. हल्लींचे अलवार संस्थानच्या जागीं ते होते.

**मालव** ऊर्फ माळवा—याचे पश्चिम व पूर्व असे दोन भाग आहेत. पश्चिम म्हणजे अवंति ( राजधानी उज्जनी ); पूर्व ऊर्फ आकार ( राजधानी विदिशा ऊर्फ भेलसा ); पूर्वीं पंजाबांत मालव व मलय या नांवांचे लोक राहत असत. शिकंदर बादशहाचे वेळचे माली लोक.

**मिथिला** विदेहाची राजधानी; जनक राजाचें स्थान.

**मैरिंज** मिरज.

**यमुना** प्रसिद्ध नदी; ऋग्वेदांत तीन वेळ तिचा उल्लेख आहे.

**राजगृह**—पहा **मगध**.

**रोहिणी**—पहा **शाक्य**.

**लंका**—हा शब्द कधीं सर्व सीलोन बेटास लावतात, कधीं कधीं फक्त राजधानीस लावतात.

**लिछवी**—वृजी लोकांपैकीं एक पोटभाग.

**वलवाट**—वलवडें ( कोल्हापूर भागांत ).

**वंग**—बंगाल प्रांत.

**वत्स**—प्रयाग प्रांत; त्याची राजधानी कौशांबी होती.

**वातापीपुर**—बदामी.

**विदर्भ**—वऱ्हाड प्रांत; दमयंतीचा पिता भीमराजा याचें राज्य. कालिदासाचे मालविकाग्निमित्रांत मगध व विदर्भ यांचे दरम्यानच्या युद्धाची हकीकत आहे. इ० स० पू० दुसरे शतकांत मगध देशाचा राजा पुष्पमित्र शुंग हा होता.

मालव प्रांताचा प्रतिनिधि त्याचा मुलगा अग्निमित्र होता. त्या वेळेस विदर्भ प्रांत आंध्र राजाकडे होता.

**विदिशा**—पूर्व मालव ऊर्फ आकर प्रांताची राजधानी.

**विदेह**—तिरहुत ऊर्फ बहार, त्याचे नैर्ऋत्य कोपऱ्यांत वैशाली संस्थान होतें. विदेह व मगध प्रांताचे दरम्यान गंगा नदी होती, व कोसल प्रांताचे दरम्यान सदानीरा (गंडक नदी) होती; राजा जनकाचें राज्य; त्याची राजधानी मिथिला होती.

**वितस्ता**—झेलम ( ग्रीक हायदास्पीज नदी ) चें ऋग्वेदांतील नांव.

**विपाश अथवा विपाशा**—ग्रीक हायफेसिस; बिया नदी.

**विंध्याद्री**—उत्तर व दक्षिण हिंदुस्थानची मर्यादा.

**वृजी**—विदेह व वैशाली मिळून झालेला प्रांत.

**वैजयंती**—उत्तर कानडा जिल्ह्यांतील वनवासी शहर; आंध्रांचे नैर्ऋत्य प्रांताची राजधानी; नंतर शाटकर्णीचे चुटू कुळाकडे गेलें. त्यानंतर कदंबाकडे गेलें.

**वैशाली**—बंगाल्यांतील मुझपरपूर जिल्ह्यांत हाजीपूर तालुक्यांत बसार नांवाचें गांव. हल्लीं वैशाली शहराचे ठिकाणीं एक मोठा उंचवटा व अशोकाचा एक स्तंभ आहे. त्या स्तंभाचे डोक्यावर एक सिंह खोदलेला आहे. त्यावर लेख नाहीं. सातव्या शतकाचे आरंभीं हि--उएन--त्संग आला होता, तेव्हां त्यानें हा स्तंभ पाहिल्याचें लिहिलें आहे. इ० स० पू० सहावे शतकांत वैशाली शहर लिछवी कुळांपैकीं सरदारांचे राज्याची राजधानी होती. हें कूळ वृजी जातीच्या शाखेपैकीं होतें. विदेह राज्य ह्या जातीपैकीं होतें. वैशालीजवळ कुंडापुर (वसुकुंड) नांवाचें ठिकाण आहे. तेथें जैन धर्माचा संस्थापक वर्धमान, ज्ञानपुत्र याचा जन्म झाला. बुद्धाचे मरणानंतर

शंभर वर्षांनीं जी बौद्ध परिषद् झाली, ती येथेंच झाली. हें शहर गंगा नदीचे कांठावर पाटलीपुत्राचे समोरचे तीरावर होतें. पाटलीपुत्राला याचें नेहमीं भय असे, व मगध राज्याचे विस्तारास हें शहर आडवें येत असे. सबब बुद्धाचे मरणानंतर लवकरच मगध देशाचा राजा अजातशत्रु यानें तें काबीज केलें. त्यामुळें मगधाचें राज्य विदेह व कोसल या प्रांतांवर पसरण्यास सोय झाली.

**शतद्रु**—सतलज नदीचें वेदांतील नांव; ग्रीक झाडाड्रस अगर झाराड्रस; पंजाबच्या इतर नद्यांप्रमाणें हिचाही प्रवाह बदलला आहे. शिकंदरबादशहाचे वेळेस ती कच्छाचे रणास मिळत होती. आतां सिंधू नदीला मिळते.

**शूर्पारक**—अपरांतांची राजधानी; सोपारें.

**शूरसेन**—मथुरेनजीकचा प्रांत.

**श्रावस्ती**—कोसल राज्यापैकीं एक शहर; बौद्धाचे उपदेशासंबंधानें प्रसिद्ध अयोध्या प्रांतांतील गोंडा जिल्ह्यांतील सेतमहेत नांवाचें गांव. अनाथपिंडिक नांवाचें श्रीमंत सावकारानें जेत राजापासून जेतवन नांवाचा बगीचा विकत घेऊन तेथें एक मठ बांधला. तेथें राहून गौतमबुद्ध उपदेश करीत असे. जी जमीन विकत घेतली तिची किंमत त्या जमिनीवर तेव्हांचीं नाणीं पसरून जितकीं नाणीं भरलीं तितकीं दिलीं. मध्य हिंदुस्थानांतील नागोद संस्थानांतील भारहूत येथील बौद्ध स्तूपावर या गोष्टीचें चित्र कोरून काढलें आहे.

**शाक्य**—हिमालयाचे पायथ्याशीं ( म्हणजे सांप्रतचा नेपाळ तराई प्रांत ) राहणारी क्षत्रियांपैकीं एक कुळी. गौतमबुद्ध याच कुळीपैकीं होता. त्याचे उत्तरेस हिमालय पहाड; पूर्वेस रोहिणी नदी, पश्चिमेस व दक्षिणेस अचिरावती ( राप्ती )

नदी; त्याची राजधानी कपिलवस्तू होती. त्याचे शेजारी बुद्धाचें जन्मस्थान लुंबिनीवन आहे. कोसल राजांचे शाक्य मांडलिक होते.

शाकल—पंजाबांतील सियालकोट शहर; मद्र लोकांची राजधानी. शाकलद्वीप म्हणजे चंद्रभागा ( * चिनाब ) व इरावती ( रावी ) यांचे दरमानचा दुआब प्रांत. शाकलही ग्रीक लोकांचे युथिडेमस वंशाचे राजांची राजधानी. मिनांडर राजाचें राहण्याचें शहर; पांचवे शतकाचे शेवटीं हूण लोकांचे स्वारीनंतर तोरामान व त्याचा मुलगा मिहिरकुल याची राजधानी झाली.

सदानीरा—विदेह व कोसल या दोन प्रांतांमधील नदी.

सरस्वती—प्रसिद्ध नदी.

समतट—गंगानदीचे मुखाचे दरम्यानचा प्रदेश.

सिंधुसौवीर—सिंधु प्रांत.

सुगंधवती—सौंदत्ती.

सुराष्ट्र—काठेवाड व गुजराथ भाग सुरत हे नांव यापासूनच निघाले आहे.[1]

सुवास्तु—ऋग्वेदांतील स्वात नदीचें नांव,ही काबूल नदीला मिळते.

सेऊणदेश—खानदेश.

सेमुला—चेंबूर किंवा चोल.

हस्तिनापूर—धृतराष्ट्राची राजधानी, भागीरथीच्या काठीं.

हिमालय—हिमवंत [ ऋग्वेद ], इमाऊस, हिमाऊस, हेमोडस हीं ग्रीक नांवें होत. भारतवर्षांतील मुख्य पर्वत महेंद्र मउय,

---

१असें प्रो० ऱ्याप्सन् यांचें मत आहे. परंतु याबद्दल शंका आहे.

सह्य, शुक्तिमान, ऋक्षवान, विंध पारियात्र आणि हिमवान हे होत.२

हिपोकरा—कोल्हापूर

क्षिप्रा—उज्जनी शहर या नदीवर आहे.



---

२महेंद्र कलिंग देशांत; मलय दक्षिणसमुद्राजवळ; शुक्तिमान व ऋक्षवान कोणचे हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. ( शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत भारतवर्षीय भूवर्णन पा० ५० ).

# सूची.



छ.